॥ श्रीराम ॥

गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ।

महाराष्ट्र–कुटुंब–माला



पुष्प ३१ वें

महाराजा छत्रसालचा

# - ग जें द्र मो क्ष -

( कमल दुसरें )

[ मोक्ष ]

— लेखक —

आबा चांदोरकर



प्रथमावृत्ति

जुलै १९४०.

किंमत १॥ रुपया.

पुष्प ३१ वें

# महाराजा छत्रसालचा

# गजेन्द्रमोक्ष

लेखक

आबा चांदोरकर

संपादक

नारायण विनायक कुलकर्णी

प्रकाशक

विठ्ठल रामचंद्र खाडिलकर

मुद्रक

लक्ष्मण भाऊराव कोकाटे

३०० सदाशिव पेठ, हनुमान प्रिंटिंग प्रेस, पुणें २.

चित्रकार

पु. श्री. काळे आर्टिस्ट, पुणें.

ब्लॉक मेकर

कला प्रोसेस – पुणें २.

प्रमुख एजंट

मेसर्स–परचुरे पुराणिक आणि मंडळी, मुंबई.

प्रमुख प्रचारक

त्रि. बा. मोडक, शाहुपुरी–कोल्हापूर.

प्रकाशन-स्थळ

महाराष्ट्र–कुटुंब–माला, कचेरी.

३९२ नारायण पेठ, पुणें २.

---

## प्रिय आश्रयदाते,

श्री. आबा चांदोरकर यांच्या " गजेंद्रमोक्ष " या ऐतिहासिक कादंबरीचा उत्तरार्ध आज आम्हीं आपल्या हातीं देत आहोंत. सांप्रत जागतिक महायुद्ध चालू आहे. महायुद्धाच्या वार्ता नियतकालिकांतून वाचण्यास वाचक उत्कंठीत असतात; अशाच वेळीं आपल्या पूर्वजांनीं अपूर्व पराक्रम केले आहेत, त्याचें स्मरण करून देण्यांतही एक प्रकारचें औचित्य व मौज आहे, असें वाटूनच आम्हीं मुद्दाम सदर ऐतिहासिक कादंबरी वाचकांच्या हातीं देण्याचें धाष्टर्य केलें. वाचक या कादंबरीचें मनःपूर्वक स्वागत करतील असा भरंवसा आहे.

प्रस्तुत कादंबरी रसाळ तशी विचारगंभीर आहे. गंभीर प्रसंग आवडला तरी त्याचा ताण वाचकांच्या मनावर पडतोच. अशा वेळीं गंभीर प्रवेश पाहिल्यानंतर चटकदार विनोदी प्रवेशाची गरज जशी नाट्यप्रेक्षकांना असते, तसाच प्रकार याही बाबतींत असणार हें उघड आहे. हें जाणूनच मालेचें ३२ वें पुष्प " मुका मार " हें चटकदार-खेळकर असें, श्री. ना. वि. कुलकर्णी हे आपल्या हातीं देणार आहेत. ही आनंददायक वार्ता याच वेळीं आपल्या कानीं आम्हीं घालीत आहोंत.

गजेंद्रमोक्षाच्या पहिल्या भागावर नवयुग, नवाकाळ, विविधवृत्त, धनुर्धारी, मौज, लोकशक्ति, चित्रा, इत्यादि नियतकालिकांनीं वेळींच आणि यथायोग्य अभिप्राय प्रकट करून लेखकाला तसे ' माले ' ला उपकृत केलें याबद्दल त्या सर्वांची माला ऋणी आहे. मंदाईच्या, महागाईच्या काळांत ' माला ' चालविणें अशक्यप्राय असलें तरी ग्राहक रसिकांच्या प्रेमाच्या जोरावरच आम्हीं प्रयत्न धडाडीनें करीत आहोंत व करीत राहणार. यावेळीं सर्वांनीं संभाळून घेतलें पाहिजे. आधार दिला पाहिजे. गजेंद्रमोक्ष-उत्तरार्ध पहिल्या भागापेक्षांही जास्त मोठा झाला आहे. कागदादिकांची महागाई यावेळीं जास्तच आहे तरीही पुस्तकाची किंमत वाढविणें जरूर असतांना वाढविण्यांत आलेली नाहीं. वाचकांनीं व आश्रयदात्यांनीं याकडे जरूर लक्ष पुरवून ' कार्याकडे व हेतुकडे ' पाहून 'माले'वर लोभ करावा ही विनंती.

सोमवार, ता. ८ जुलै. १९४०
३९२, नारायण, पुणें २.

सर्वांचा नम्र
वि. रा. खाडिलकर

# चार शब्द

" भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें । समर्थकृपेचीं वचनें ॥ तो हा गजेन्द्रमोक्ष ॥ "

या प्रमाणें हें कथानक लिहिण्याची स्फूर्ति देऊन संपूर्ण लेखन श्रीसमर्थांनीं करून घेतल्या वर, प्रस्तावना लिहिणार मीं कोण ? तथापि खुलासे दाखल चार शब्द लिहितों.

बुंदेलखंडाचा व मस्तानीचा इतिहास निःसंदिग्धपणें आज घटके पर्यंत पुढें आला नाहीं; जो आला आहे त्या सर्वांचा परामर्श घेऊन हें कथानक सजविलें ! अर्थात् सजविण्या साठीं थोडासा फेरफार केला आहे. तथापि ही सजावट सोडल्यास कथानकाचा पाया व वरील इमारत हि ऐतिहासिक आहे. भाषा—चालीरीती—पोषाक—व्यष्टीसमष्टींचें मन—व्यक्ती—राजकीय व सामान्य आचार—व्यवहार इत्यादि बहुतेक सर्व तत्कालीन आहे.

भट—भानु व जोशीद्वय या घराण्यांचा व भोंसले घराण्याचा संबंध शहाजी राजां पासून आहे व त्या मुळें च " चतकोर भाकरीची " गोष्ट पुढें आली; ही ऐतिहासिक कथा असून तिचें मूळ, या कथानकांतील प्रमुख व्यक्ति भाऊ-साहेब ( बाबूजी नाईक जोशी ) यांचे प्रपौत्र व माझे वडील बंधू समान ती० श्री० आबाजी बाबूराव जोशी यांचे घरांतील ऐतिहासिक सामग्रींत आढळलें ! ही सामग्री पुढें आणूं दिल्या बद्दल मी ती० आबासाहेब यांचा ऋणी आहें.

केवळ मनोरंजन करणें हा माझा हेतु नसल्यानें, तत्कालीन इतिहासाचीं व तत्त्वज्ञानाची, विशेषतः ज्या तत्त्वांच्या पाया वर हिंदवी स्वराज्य स्थापन झालें त्या तत्त्वांची, माझ्या अल्प समजुती प्रमाणें चिकित्सा व कथन या कथानकांत केलें आहे. या तत्त्वज्ञानास आपापल्या प्रकृती प्रमाणें कोणीं सन्मुख होतील कोणीं विन्मुख होतील ! दैवी—संपत्तिमानांना बरें वाटेल तर आसुरी—संपत्ति-युक्त रजनीचरांना क्रोध येईल ! तथापि या दोघांचा आनंद व क्रोध श्री चरणीं अर्पण करून मी मुक्त होत आहें !

हें कथानक प्रसिद्ध केल्या बद्दल महाराष्ट्र—कुटुंबमालेचे संपादक व चालक रा० नाना कुलकर्णी तथा रा० विठुकाका खाडीलकर यांचा मी आभारी आहें. दोघे हि माझे मित्र; दोघांनीं हि हें मित्रकार्य शेवट पर्यंत उत्तम प्रकारें पार पाडलें ! येथील वाडिया महाविद्यालयाचे प्राध्यापक व माझे मित्र श्री०

तुकारामपंत देवरे यांनीं, मीं कुराणे-शरीफ मधून निवडून काढलेल्या कांहीं आयतांचें मूळचें आरबी वाचन देवनागरींत लिहून देऊन मला सहाय्य केलें त्या मुळें त्यांचा हि मी आभारी आहें. नाशीकचे चित्रकार श्री० कुलकर्णी व येथील चित्रकार श्री० काळे यांचा परिचय, नाना कुळकर्णी यांचे मुळें झाला. या दोघां चित्रकारांनीं अनुक्रमें या कथानकाच्या पूर्वार्ध-उत्तरार्धा साठीं उत्कृष्ट अशीं दर्शनीं चित्रें काढून दिल्या बद्दल त्यांचे आभार मानतों. माझे मित्र रा० नाना खरे ( संदेश एजन्सी ) यांनीं "शैवांना शिव...... तुर्कां सर्वें श्रीहरी" हा श्लोक संपूर्ण सांगितल्या बद्दल त्यांचे हि आभार मानतों.

कथानकांतील बहुतेक उर्दु व हिंदी पदें, प्रख्यात स्वामी रामतीर्थ यांचीं असोन, बाकींचीं निरनिराळ्या कवींचीं आहेत. भूषणकवि व त्यांचे गुरु श्रीप्राणनाथ यांची माहिती "भूषण-विमर्श" या चिकित्सक प्रबंधांतील आहे.

या प्रमाणें या कथानकांतील जें कांहीं आहे तें सर्व पूर्वाचार्यांचें व मित्रांचें आहे ! माझें असें कांहीं नाहीं ! फार च झाल्यास लेखनपरिपाठी माझी आहे ! तथापि श्रींच्या वचना प्रमाणेंः— "सकळ करणें जगदीशाचें । आणि लेखन ( मूळांत कवित्व ) चि काय मानुशाचें ?॥" सारांश, हें लेखन हि माझें नाहीं ! देवाचें आहे. लेखन च काय पण "तुम्ही आम्ही सकळ देवाचें आहों ! !"

पुणें, ज्येष्ठ वद्य ११।१८६२

श्रीसमर्थचरणरज
आबा चांदोरकर

# पितृ–ऋण–स्मरण

## श्रीशंकर

" गजेन्द्रमोक्ष " या ऐतिहासिक कादंबरीचा द्वितीय खंड आज वाचकांचे हातीं पडत आहे! श्रीवर्धनकर भट– पेशवे यांच्या कारकीर्दीतील एका महत्त्वाच्या प्रसंगावर ही कादंबरी आधारलेली आहे हें आतां सर्वांस परिचित झालेंच आहे.

पेशव्यां वर आलेल्या प्रत्येक महासंकटाचे वेळीं, त्यांस, या प्रसंगाची व तो यशस्वी करणाऱ्या महाराष्ट्रधर्मधुरीण वीरश्रेष्ठ ती० बाबूराव भाऊसाहेब सदाशिव ( विश्वनाथ सदाशिव ) बारामतीकर जोशी यांची, आठवण, पेशव्यांतील प्रमुखांस होत रहावी इतकें या प्रसंगाचें महत्त्व होतें ( पहा– म. इ. सा. खंड १, ले० १९५ ).

माझे प्रख्यात प्रपितामह ती० " धीर– वीर– हीर " विश्वनाथभाऊसाहेब नाईक ( श्रेष्ठी ) यांचा, श्रीवर्धनकर भटांशीं जुना व घनिष्ठ आणि प्रेमाचा संबंध पूर्वापारचा होता. मध्यंतरीं राजकीय उलाढालींत या स्मृतविर जरी पेशव्यां कडून विस्मृतीचें आवरण पडलें तरी हा प्रेमसंबंध नात्याच्या रूपानें ती. भाऊसाहेबां पासून श्री. बाळाजी विश्वनाथ ते श्री. अमृतराव रघुनाथ पेशवे यांच्या पर्यंत अखंडित चालू होता, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्या सारखी आहे.

ती. भाऊसाहेब यांनीं केलेल्या हिंदवीसाम्राज्याच्या सेवेचा प्रसंग मुख्य धरून माझे आप्त आबा चांदोरकर यांनीं हा प्रसंग वर्णन करून माझे घराण्यावर व मराठ्यांच्या इतिहासावर उपकाराचें ओझें लादलें आहे. कथानकांतील गुणदोषांची चर्चा करीत न बसतां मजवरील हें ऋण मान्य करून सुहृदुत्तम आबांचे व म० कु० मालेचे संपादक आणि चालक यांचे अंतःकरणापासून आभार मानतों.

पुणें, बावडेकर– वाडा<br>ज्येष्ठ वद्य ११।१८६२

आबाजी बाबूराव जोशी<br>बारामतीकर

# कमल दुसरें

सावध साक्षेपी आणि दक्ष । तयासी तत्काळ ची " मोक्ष " — ॥

— श्रीसमर्थ

# मोक्ष !!!

गजेंद्रू महा संकटीं वास पाहे ।
तया कारणें श्रीहरी धांवताहे ।
उडी घातली जाहला जीवदानी ।
तुपेक्षी कदां राम भक्ताभिमानी ॥

— श्रीसमर्थ

॥ श्री राम प्रसन्न ॥

# वैनतेय वैकुंठास निघाला! [पाकळी पहिली]

पहिल्या कमळाच्या अकराव्या पाकळींत सांगितलेले प्रसंग घडत असतां, महाराज छत्रसाल आपल्या धवळ्या शुभ्र दरबारी शामियान्यांत निवडक मंडळीसह गुप्त मसलती करण्यांत गुंतले होते. सायंकाळचा समय होत आल्यानें शामियान्यांत मोठमोठ्या समया तेवत होत्या. शामियान्याच्या दारांजवळ पहारेकरी पहारा देत होते व एक दोन चोपदार उभे होत. कनाथी पाशीं दोन तीन हुजरे उभे होते.

आंत एका शुभ्र चादर असलेल्या गादीवर, पांढरा अभ्रा असलेल्या लोडास टेकून महाराज बसले होते. महाराज गोरेपान होते. त्यांचें वय ऐंशीच्या पुढें असल्यानें त्यांची दाढी पांढरी शुभ्र झाली होती; ती त्यांच्या शुभ्र अंगरख्यावर छातीपर्यंत रुळत होती. त्यांचे मस्तकाचे केस शुभ्र, त्या वरील बुंदेली पागोटें शुभ्र, अंगरखा शुभ्र व पायांतील पायजमाहि शुभ्र; पयः- फेनधवल मोठ्या टपोऱ्या मोत्यांची एकावली त्यांच्या गळ्यांत होती, पण ती दाढीच्या खालीं अदृश्य झाली होती; उजव्या हाताच्या करांगळींत शुक्राच्या ढाळाच्या हिऱ्याची अंगठी होती. सारांश, महाराज म्हणजे, श्री नीं एका आरतींत वर्णन केल्याप्रमाणें, " धवळे भोळे चक्रवर्ती, धवळे अलंकार शोभती ! ...

"धवळें कैलासभुवन ! धवळें मध्यें सिंहासन..." श्रीशंकर च जणूं !

त्यांच्याजवळ महाराजकुमार हिरदेसा ( हृदयेश ), कुंवर जगतराज, भाऊसाहेब व मुख्य सेनापति पृथ्वीसिंह व हमीदखान बसले होते. भारतीय युद्ध होण्या पूर्वी पांच पांडव, पितामह भीष्मासहित सल्ला मसलत करण्यास असेच जमले होते!

भा — पिताजी ! पुढें काय विचार करावयाचा ?

छ — त्यासाठींच तर आपण येथें जमलों आहों. कविराजांनीं, मानसिंहा कडून मिळविलेली बातमी, मीं तुम्हां सर्वांना सांगितली च आहे !

हि — महंमदानें दिल्लीहून फौज-रसद-खजिना वगैरे मागविला आहे व राजपुतान्यांत तेथील राजां कडे प्रेष लावला आहे.

ज — त्या शहाला उलट शह बसविण्या साठीं आपण होऊन गुरुदेव व कविराज, राजपुताना वगैरे भागांत गेले आहेत. तथापि हा शह चुकविला तरी पैशाचा दुसरा शह शिल्लक राहतोच ! सध्यां आपल्या जवळचा खजिना संपत आला आहे ! सैन्याचें देणें तटलें आहे !

पृ — होय, सरकार ! कुंवरजींचें म्हणणें खरें आहे. सैन्यास फक्त नालबंदीची रक्कम दिली आहे. जरी आपलें सैन्य पैशासाठीं धरणें घेऊन बसणार नाहीं, तरी सुद्धा कांहीं सोय ही पाहिली पाहिजे ! हमीदखानानांनीं परवां आपला सर्व खजिना सरकारांना दिला म्हणून तरी कांहीं दिवस लोटले गेले. त्यांनीं आयत्या वेळीं बाजू सांवरून धरली !

ह — यांत मीं कसली बाजू सांवरून धरली ? माझें कर्तव्य च केलें ! फकीरशाही स्थापण्यास प्रथम फकीर नको कां व्हावयाला ? गरीबी, श्रीमंती, दुर्दैव, सुदैव यांत जो समचित्त, आनंदित, खूष असतो तो फकीर ! जगण्या मरण्याची हि त्याला पर्वा नसते !

( राग पहाडी )

**"इफलासमें इतबारमें इकबालमें खुश हैं। पूरे हैं वही मर्द जो हर हालमें खुश हैं॥ जीनेका न अन्दोह है, न मरनेका जरा गम ! यक्सां है उन्हें जिंदगी और मौतका आलम ॥"**

भा – शाबास ! हमीदखान ! जातीनें मुसुलमान असून तुम्ही या मुसुलमान पातशाही विरुद्ध चळवळींत सामिल झालां आहां ! धन्य आहां !

ह – यांत जातीचा व धर्माचा संबंध काय ? ऑ हजरतांचा ( महंमद-

पैगंबर साहेबांचा ) हुकूमच आहे कीं, जुलमाचा नायनाट करावा !

छ – तसें असलें तरी ज्या कृत्याचें चीज करावयास पाहिजे त्याचें करावयास नको काय ? असो. तूर्त या पैशाचे बाबतींत काय करावें तें मला समजत नाहीं. सर्व सोंगें आणतां येतात, पण द्रव्याचें सोंग आणतां येणें कठीण आहे !

इतक्यांत ताईसाहेब, रतन, किशोरसिंह आणि तीन चार शिपायी लष्करी पोषाकांत आले. सर्वांनीं महाराजांना लष्करी सलामी दिली.

ता – ( महाराजांच्या चरणांवर मस्तक ठेवून ) भगवान रघुपति, आपल्या एकनिष्ठ भक्ताची, देशाच्या आजादी साठीं लढणाऱ्या महात्म्याची लाज राखतो पिताजी ! द्रव्याचें सोंग आणण्याची जरूरी पडूं देत नाहीं ! ! त्याची लीला अद्भुत आहे ! पिताजी ! सूरदासांनीं म्हटलें च आहे–

“ रंक जन्मके, मित्र, सुदामा, कंचनधाम बनायो । सूरदास तेरी अद्भुत लीला, वेद नेति कह गायो ” ॥

महाराजांना व तेथें असलेल्या सर्वांना आश्चर्य वाटलें ! ताईसाहेबांच्या वाक्याचा अर्थ कोणास समजला नाहीं. महाराजांनीं, ताईसाहेबांना आपल्या जवळ बसविलें.

छ – म्हणजे काय बेटी ?

ता – ( किशोरसिंहाकडे पाहून ) किशोरसिंह ! हमीणीच्या संदुका आणा !

कि – आज्ञा !

किशोरसिंहानें आपल्या शिपायांकडे पाहून खूण केली. त्यांनीं थोड्या वेळांत मोटमोठ्या बंद केलेल्या मोहोरबंद पेट्यांची रास तेथें आणून घातली. सर्वजण आश्चर्यानें पेट्यां कडे पाहात राहिले !

छ – हें काय आहे बेटा ? या तर पातशाही खजिन्याच्या मोहोरबंद संदुका दिसतात ! हा काय प्रकार ?

ताईसाहेबांनी रतन कडे पाहिलें.

र – महाराजसरकार ! मी सांगतें. कांहीं घटकां पूर्वीं ताईसाहेबांना खातमी कळली–

ता– ( हंसून ) मानसिंहाकडून !

र – ( लाजून ) होय ! बातमी कळली कीं, दिल्लीहून महंमदखाना कडे

पंचवीस लाखांचा खजिना घेऊन तीनशें स्वार भैरवघाटीच्या रस्त्यानें येत आहेत. ही बातमी महाराजांना समजावी, असें ती सांगणाऱ्यांची इच्छा होती ! पण ताईसाहेबांनीं मनांत एक बेत ठरविला व प्रथम बातमीदारांना परत लावून या सरदार किशोरसिंहांना बोलावून आणलें.

कि — पुढचें मी सांगतों. हुजूर ! मला ताईसाहेब सरकारांनीं आज्ञा केली कीं, " स्वतःचा दीडशें स्वारांचा बेहडा घेऊन आपण हा खजीना लुटून आणणार ! " मी सरकारांना विनंति केली कीं, हें अत्यंत धाडसाचें काम असल्यानें मला कामगिरीवर पाठवावें. सरकारांच्या पायांच्या पुण्याईनें व हुजुरांच्या आशीर्वादानें मी हें काम फत्ते करीन. परंतु, सरकारांचा निश्चय पक्का ! माझ्या विनंतीचा उपयोग झाला नाहीं. मग हुकुमाप्रमाणें आम्हीं आमचा बेहडा घेऊन भैरवघाटी गांठली. सरकारांनीं आमच्या छोट्या सैन्याचा व्यूह रचण्यांत मला उत्तम मदत केली. थोड्या वेळानें दरबारी खजिना आला. सरकारांनीं आमच्या सैन्याची सरदारकी पत्करून दरबारी सैन्यावर घाटीच्या दोन्ही तोंडांवरून जोराचा हल्ला चढविला ! सरकारांचा हल्ला इतका जोराचा व धडाडीचा होता की शत्रूनें कच खाल्ली. ध्यानीं मनीं नसतांना हा हल्ला झाल्यानें शत्रु पुरा गोंधळला ! स्वतः सरकारांनीं शाही सैन्याच्या सेनापतीवर घोडा घालून त्याच्येशीं शिकस्तीचें जंग केलें व शेवटीं त्यास ठार केलें! त्याच्या तुकडीचा पराभव झाला. पुष्कळ ठार झाले व बाकीचे जखमी झाले. आपल्या कडे मौत नाहीं, जखमी वीसपंचवीस. मग सरकार आज्ञे प्रमाणे खजिन्याचे उंट इकडे आणले ! ( पेट्यांकडे बोट दाखवून ) हा च तो पंचवीस लाखांचा खजिना ! !

किशोरसिंहाचें भाषण चालू असतां मधून मधून सर्वांच्या तोंडून प्रसंगास अनुरूप असे " शाबास ! वाहवा ! " शब्द निघत होते; भाषण संपल्यानंतर तर सर्वांनीं च ताईसाहेबांची मनसोक्त स्तुति केली ! शिपाई मंडळी बाहेर निघून गेली.

छ — ( ताईसाहेबांच्या पाठी वर हात फिरवून गद्गदित स्वरानें ) धन्य ! बेटी ! तूं धन्य आहेस ! तूं खरी वीरकन्या आहेस ! पण, बाळ ! तूं मला ही बातमी आगाऊ कां नाहीं सांगितलीस ? माझ्या पासून लपवून कां ठेवलेंस ? एवढें जिवावरचें धाडस कां केलेंस ?

र — महाराज! ताईसाहेबांच्या मनांत, स्वतः कांहीं तरी पराक्रमाचें कृत्य करून दाखवावें, महाराजांच्या बरोबर सदोदित राहून लढाईंत शौर्य गाजवून दाखवावें, असें नेहमीं येई; आणि त्या प्रमाणें त्यांनीं महाराजांना अनेक वार विनंति हि केली होती. परंतु—

छ — ( हंसून ) मी संमति देत नव्हतों! असें ना? असें च तर काय? म्हणून त्याचा हा वचपा काढलास होय बाळ! पण, बेटा! कांहीं विपरीत प्रकार घडला असता तर? निदान येथून निघतांना मला सूचना तरी करून जावयाचें असतें! कांहीं वाईट झालें असतें तर, मला म्हाताऱ्याला केवढा धक्का बसला असता?

ता — पिताजी! असें विपरीत कसें होईल? आपण सर्व जण त्या श्री-समर्थांचे सेवक आहों, तेव्हां "**समर्थाचिया सेवका वक्र पाहे। असा सर्व भूमंडळीं कोण आहे?॥**" असें तुम्ही च तर आम्हां सर्वांना शिक-वितां. मग विपरीत प्रकार कसा होईल?

छ — होय बाळ! ( तिच्या पाठी वर शाबासकी देऊन ) तें श्रींचें वरदी वचन सत्यच आहे! तें सर्वदां व सर्व ठिकाणीं खरें च होणार! बेटा! तुला कल्पना नाहीं कीं, तुझ्या या कृत्यानें आज आमची केवढी लाज राखली गेली, तें!

भा — शाबास! ताईसाहेब! आज आमची दुसरी बाजू तुम्हीं राखली! आजची मात तुम्हीं केली! ही श्री सिद्धेश्वराची कृपा होय! आपण वीरकन्या आहां च आणि जी वीरकन्या असते ती च वीर-पत्नी होते! ( हंसून ) ईश्वर कृपेनें तो योग हि लवकर येईल!

हि— ( थट्टेनें ) भाऊसाहेब! आतां माझ्या लक्ष्यांत खरा प्रकार आला! अहो! तो योग लवकर आणण्यासाठींच हा हिचा प्रयत्न होता! हां! हां! ते आमचे भावी ... ते आहेत शूर! त्यांना पाहिजे शूर पत्नी! ते, हिच्या सारख्या घरांत बसून लढाईच्या गप्पा झोंकणाऱ्या भेदरट पोरीला आपली पत्नी कशी करतील? म्हणून मीं च हिला नेहमीं सल्ला देत होतों कीं कांहीं तरी काम करून दाखीव! निदान शरबतखान्यांत बसून, दिल्लीच्या पात-शहाच्या तसबिरीवर दोन चार वेताच्या छड्या ओढ, नाहीं तर त्या भागा-नगरकर निजामाच्या तसबिरींतील त्याची दाढी कापून दे पाठवून साताऱ्यास,

आमच्या त्या मरगठ्या मेव्हण्या कडे ! म्हणजे आमचे मेव्हणे होतील खूष आणि पाठवून देतील तुला नाकांत घालायला एक दक्षिणी घाटाचा मुखवट्टा ! तें माझें म्हणणें आतां हिनें ऐकिलें ! माझी बहीण खरी ! पण, काय ग ताई ! ही मराठ्यांची गनिमी केव्हां शिकलीस ? कोणी मराठा गुरु केला आहेस कीं काय ?

**ता**— ( रागानें ) कां रे दादा ? तुला काय पंचाईत ? मीं घरांत बसून लढाईच्या गप्पा झोकतें कां रे ? मी भेदरट आहे कां रे ? शत्रूच्या तसबिरीला छड्या मारायला किंवा तसबिरींतील त्याची दाढी कापायाला मीं कांहीं एकादा भेदरट पण नांवाचा वीर पुरुष नाहीं ! तें काम तुम्हां पुरुष जातींतील भ्याडांनीं च करावें ! दादा ! विराटपुत्र उत्तर स्त्री नव्हता ! पुरुष, तुमच्या जातींतील पुरुष च होता बरें का !

**ज**— बरें, असला तर असू दे ! आतां तुझ्या सारख्या बायका, पुरुष बनल्या मग उत्तरा सारख्या पुरुषांनीं बायका पण नांवांचे स्वातंत्र्यवीर नको का बनायला ? अग ! असले पुरुष उत्तर च काय पण शेवटीं शिखंडी सुद्धां बनतील ! पण तें जाऊं दे ! तुला आमच्या पुरुषी गोष्टी काय सांगावयाच्या ? हो ! दादा, आतां काय म्हणाला ? काय, म्हणालास रे ? गुरु-शिष्याचें तूं आतां काय म्हणालास ?

**हि**— तें होय ? मी तिला म्हणालों कीं, कोणी मराठा गुरु केला आहेस कीं काय ?

**ज**— ( थट्टेनें ) होय रे हो ! संभाळ बरें कां ताई ? अशा तुझ्या शौर्यानें गुरुशिष्य नातें सुटून दुसरेंच नातें निर्माण होईल ! ( गंभीरपणाचा आव आणून ) वत्सराज उदयन व राजकुंवर वासवदत्ता यांची जी गत शेवटीं झाली ती होईल बरें ! आणि तुझ्या त्या गुरुला आमच्या घरीं आणण्यासाठीं लाकडी हत्ती ऐवजीं पांच सहा हजार रुपये खर्चून खरा हत्ती विकत घेऊन पाठवावा लागेल ! !

**ता**— ( खोटा राग दाखवून व जगतराजास चिमटे घेऊन ) बघ बरें का भाऊ ! मला असली थट्टा आवडत नाहीं. ( छत्रसालांकडे पाहून ) बघा हो, पिताजी ! हे दोघे माझी उठल्या बसल्या थट्टा करीत असतात ! अशानें मी यांच्यांशीं बोलणार च नाहीं ! सदोदित माझा पिच्छा पुरवितात !

हि — ( हंसून ) अग जा ! नाहीं बोललीस तर नाहीं ! असानें आम्हीं दोघे, आमचीं मराठेशाही कानपिळ्याचीं पागोटीं, त्या वझीर-इ-आजम पासून घेण्याचें सोडूं कीं काय ?

ता— पिताजी ! सांगा ना हो या दोघांना !

छ— ( हंसून व ताईसाहेबांच्या मस्तकावरून हळुवार हात फिरवून ) हिरदेसा ! जगत ! कां रे तिच्या मागें लागतां ? तिला चिडवूं नका ! ( ताईसाहेबांस ) बाळ ! तूं आतां विश्रांति घे ! रतन ! हिची चांगली सुश्रुषा करा.

भावांबहिणींचा विनोद चालला असतां तेथें असलेली मंडळी मधून मधून आनंदानें हंसत होती. ती सर्व घरची च मंडळी होती. हमीद खान हा महाराजांच्या कुटुंबांत घरच्यासारखा, राजकुमाराप्रमाणें च गणला जात असे ! भाऊसाहेब तर महाराजांचे पुतणे ! पृथ्वीसिंह आणि किशोरसिंह, महाराजांचे जुने व कसोटीला उतरलेले वृद्ध सरदार; ताईसाहेबांना लहानपणीं अंगाखांद्या वर खेळविलेले ! अशा मंडळीच्या बैठकींत जर हा भावांबहिणींचा नर्म प्रसंग घडणार नाहीं तर मग कोठें घडणार ?

ता— पिताजी ! माझी एक इच्छा आहे.

छ— काय बेटा ?

ता — माझ्या तुकडींतील ज्या ज्या शूर शिपायांनीं शौर्य गाजविलें त्यांना बक्षिसें द्यावीं असें माझ्या मनांत आहे !

छ — अवश्य ! बेटा ! तुला वाटेल तीं बक्षिसें दे. त्यांचा हक्क च आहे बक्षिस घेण्याचा !

ता — आणखी एक गोष्ट विचारावयाची आहे.

छ — जरूर विचार.

ता — शत्रूच्या जखम्यांना मीं आपल्या छावणींत सुश्रूषा करण्यासाठीं आणले आहे. त्यांच्या सुश्रूषेस परवानगी असावी. मात्र मीं त्यांना आधींच सांगितलें आहे कीं, ही मोहीम संपून सल्ला होई पर्यंत त्यांना आमचे नजर-कैदी म्हणून रहावें लागेल. त्यांनीं ही गोष्ट मान्य केली आहे !

छ — मग तुझी विनंति हि मी मान्य करतों. शाबास. बाळ ! तुझें मन इतकें उदार आहे हें पाहून मला फार आनंद होतो !

**भा** — खरें आहे ! श्री संप्रदायाचें एक लक्षण असें च आहे—

"दिनाचा दयाळु मनाचा मवाळु । स्नेहाळू कृपाळू जनीं दासपाळु ॥"
अशा ताईसाहेब, त्या सर्वोत्तमाच्या दास असल्यानें धन्य आहेत !

मग ताईसाहेब, रतन व किशोरसिंह, महाराजांना वंदन करून निघून गेले. त्यानंतर—

छ — पृथ्वीसिंह ! आतां तुमची काळजी दूर झाली ?

पृ — आज्ञा, सरकार ! बरेच दिवस आतां काळजीचें कारण उरलें नाहीं !

छ — मग आतां तुम्हीं पुढल्या उद्योगाला लागा.

या वेळीं भाऊसाहेब स्तब्ध बसून कांहीं विचार करीत होते. त्यांचें लक्ष महाराज व पृथ्वीसिंह यांचे संभाषणा कडे नव्हतें. तें महाराजांच्या ध्यानीं आल्या वरून त्यांनीं म्हटलें—

छ — भाऊ ! कसला विचार चालविला आहे ?

**भा** — ( भाना वर येऊन ) विचार ?... या नंतरच्या दुसऱ्या उद्योगाचा. पिताजी ! मी एक बेत योजीत होतों... योजला आहे... पण त्याला आपली अनुमति पाहिजे, म्हणजे तो पक्का झाला.

छ — बोला, कोणता बेत ? तुम्हीं जो बेत योजणार तो चांगलाच असणार ! अर्थात् त्याला माझी मान्यता मिळण्यास अवघड नाहीं.

**भा** — बेत असाः— तूर्त बरेच दिवस महंमद बंगष स्वस्थ बसेल, निदान आपण होऊन आमचे वर चढाई करून येणार नाहीं; कारण त्याचे जवळ रसद व खजिना यांची वाण आहे. त्यांची मागणी त्यानें दरबाराकडे केली आहे. हा ताईसाहेबांनीं लुटलेला खजिना, महंमदाचें मागणीचें पत्र दिल्लीस जाण्या पूर्वी, दरबारानें आपण होऊन पाठविला होता. याची ही गत झाल्याचें जेव्हां दरबाराला व महंमदला समजेल तेव्हां दोघांना धक्का च बसेल ! पातशहा हा सर्वस्वीं कांहीं वझीर व महंमद यांच्या आहारीं गेलेला नाहीं पण तो दुर्बल मनाचा असल्यानें, यांच्या विरुद्ध हि प्रत्यक्ष वर्तन करीत नाहीं. या त्याच्या वृत्तीचा फायदा आपण घेतला पाहिजे; घेत आहोंतच म्हणा ! तीर्थस्वरूप काका, हें काम करण्यासाठीं सध्यां दिल्लीस च राहिले आहेत ! बुंदीचे राव बुधसिंह यांचे वर पातशहाची मर्जी प्यार आहे. त्यानें त्यांना आपल्या जवळच ठेवून घेतलें आहे. ते आपल्या देवतार्चनांतील एक अर्चक आहेत !

त्यांच्या मंत्र्यानें मागें कबूल केल्या प्रमाणें, दरबारांतील त्यांना समजणाऱ्या गुप्त बातम्या ते काकाजींना कळवीत असतात. तथापि, वझीराचे मनांत रावां विषयीं शक आहे; म्हणून तो कांहीं मसलती त्यांना न समजू देतां शिजवीत असतो. उदाहरणार्थ हा पंचवीस लाखांचा खजिना! हा खजिना महंमदा कडे पाठविल्याची बातमी वझिरानें रावांना बिलकुल लागूं दिली नाहीं. जर त्यांना ती समजली असती तर त्यांनीं काकाजींना व त्यांनीं आपल्यांला इकडे कळविली असती. असें जरी आहे, तरी राव व काकाजी हे, शहाचें मन, वझीर आणि महंमद यांचे अत्याचारा विरुद्ध वागण्यास प्रसंग पाहून तयार करीत असतात!

छ— हें सर्व मला माहीत आहे. भाऊ! मला वाटतें हा खजिना लुटल्याचा प्रसंग महंमद व वझीर यांचेवर उलटविण्यास बरा आहे!

भा— तें च मीं योजिलें आहे!

पृ— तें कसें काय?

भा— "महंमद बंगष हा स्वतंत्र होऊं पाहत आहे! पहिल्यापासून त्याचा हा उद्देश आहे; पण तो संधीची वाट पहात होता. या प्रसंगीं त्याला ती संधि मिळाली. नव्हे, त्यानें हा महाराजांवरील मोहिमेचा प्रसंग मुद्दाम काढला! शहाची संमति नव्हती. या मोहिमेंत शाही सैन्याचा मुद्दाम तो नाश करीत आहे. तसें च सरकारी खजिना आपल्या जवळ गुपचूपपणें सांचवून ठेवीत आहे आणि वरून दर्शवितो कीं, बुंदेले, खजिना लुटतात! परवांचा पंचवीस लाखांचा खजिना त्यानें गुपचूपपणें स्वतःच्या जहागिरींतील एका गुप्त जागीं नेऊन ठेवला आहे. बाहेर मात्र वार्ता पसरवून दिली कीं, शत्रूनें तो लुटला म्हणून! तो बुंदेल्यांना सामील नसला तरी त्यांचें पारिपत्य करण्याचें मुद्दाम टाळीत आहे! या सर्व कामीं वझिराचें त्याला अंतस्थ सहाय्य आहे! वझिराच्या मनांत पातशहास कैदेंत टाकून स्वतः तक्त बळकावयाचे आहे. तेव्हां पातशहानें महंमदास खजिना, रसद, सैन्य वगैरे मदत ताबडतोब पाठवूं नये. एकंदर रागरंग पाहून मग पुढें काय करावयाचें तें ठरवावें!" या प्रमाणें रावांनीं व काकाजींनीं पातशहाचे मनांत भरवावें!

हि— हां! ही योजना चांगली आहे! पातशहाच्या मनांत काकाजींनीं असें भरविलें म्हणजे तो महंमदा कडे मदत पाठविण्यास दिवसगत लावील.

छ— शिवाय त्यानें स्वतःस महंमद व वझीर यांच्या जाचांतून युक्तीनें सोडविण्या साठीं मागेंच पंतांना सांगितलें होतें; तेव्हां त्याच्या या मनोवृत्तीचा फायदा घेतला पाहिजे.

ज— भाऊसाहेब ! ही एक प्रकारें बचावाची योजना झाली पण महंमदाचा कांटा आपल्याला समूळ उपटून काढावयाचा आहे ना ?

भा— होय, काढावयाचा आहे. मग ?

ज— मग, चढावाची एकादी योजना नको कां आंखावयास ?

भा— कोण नाहीं म्हणतों ? ती हि मीं आंखली आहे. ती च आतां सांगतों. आतां सांगितल्या प्रमाणें महंमदाला बराच काळ स्वस्थ बसावें लागेल. दरबारी मदतीची वाट पहात तो बसेल. तसें च राजपुतान्यांतील काम कितपत साध्य होतें तिकडे हि कांहीं काळ त्याला लक्ष द्यावें लागेल. तें कार्य साधणें कठीण आहे. गुरुदेव व कविराज तिकडे आहेत. ते, त्याचें काम साधूं देणार नाहींत ! तथापि आपलें हि काम साधण्यास बराच वेळ लागेल. कारण एक तर रजपूत राजे आपापसांत भांडणें भांडणारे फार ! स्वतः बद्दलची भलतीच थोरवीची कल्पना ते बाळगून असतात ! आणि तींत यत्किंचित् दुसऱ्या कडून अंतर-- अजाणतां—पडलें तर त्याचा जीव घेण्यास किंवा स्वतःचा देण्यास एकदम तयार होतात !

छ— होय. दुर्दैवानें हा रजपुतांचा गर्विष्ठ—खोट्या गर्वाचा—स्वभाव बनला आहे खरा ! मागच्या काळीं केव्हां एकदां—सातशें वर्षां पूर्वी—हे स्वतंत्र राजे होते ! पण आज हे यवनांचे गुलाम बनले आहेत ! आणि आश्चर्य हें कीं, उठल्या सुटल्या त्या गतकालीन स्वातंत्र्याच्या, स्वराज्याच्या गप्पा मारीत असतात ! एवढें च नाहीं तर त्या पुराण्या स्वातंत्र्याच्या नुसत्या यादगिरी वर पातशाहीस पोकळ धमक्या देत असतात ! त्यांत हि खेदाची गोष्ट म्हणजे आपापसांत यःकश्चित् मानापमाना साठीं भांडणें भांडतात ! आणि असे हे मूर्ख लोक म्हणे हिंदुपदपातशाही स्थापन करण्याची खटपट करणार ! !

भा— दुर्दैवानें पिताजी म्हणतात तशी स्थिति सध्यां आमच्या भारतवर्षाची झाली आहे खरी. राजपुताना काय व महाराष्ट्र काय दोहीं कडे तीच गत आहे ! आमच्या दरबारांत हि एक पक्ष—पिताजींना, आमचे प्रतिनिधि-सुमंत-सेनापति-सेनासाहेबसुभा ही मंडळी माहित च आहे, त्यांचा सर्वांचा

मिळून एक पक्ष बनला आहे तो—असा च आहे! त्याला राष्ट्राचें हित कळ-ण्याची अक्कल नाहीं! स्वहिता पुढें त्यांना स्वराज्याच्या हिताची काळजी नाहीं! लायकी नसतां यांना आपापल्या अधिकारांची पदें सजवावयाचीं आहेत! नंदीबैलां प्रमाणें या पदांच्या झुली अंगा वर यांना वागवावयाच्या आहेत! त्याच्या आड-स्वराज्याच्या कल्याणाची दृष्टि ठेवून जे-कोणीं आल्यास त्याच्याशीं ही मंडळी झगडा करावयास सिद्ध होतात! असल्या या देश-बुडव्यांना काय म्हणावें व त्यांना सन्मार्गावर कसें आणावें तें समजत नाहीं! त्यांच्या समजुती घालतां घालतां नाकीं नऊ येतात आणि स्वराज्याच्या कल्याणाच्या चालून आलेल्या संधी वायां जातात! देशाचें दुर्दैव! दुसरें काय?

छ—त्यांत अलीकडे प्रांताभिमान बोकाळत चालला आहे. वजीर मोठा कारस्थानी आहे! त्यानें रजपुतांना उपदेश चालविला आहे कीं, "तुम्हीं मराठ्यांना मिळूं नका! ते तुम्हांस पोटांत पचवून टाकतील! राजपुतान्याचा महाराष्ट्र करतील!" आपण सर्वजण येथें जमण्या पूर्वी जोधपुराहून एक स्वार आला व मला भेटून त्यानें एक लखोटा माझ्या स्वाधीन केला. त्यांत राजाजींचें पत्र होतें. पत्रांत त्यांनीं हा च मजकूर लिहिला होता. वझीरानें त्यांना पाठविलेलें पत्र, ऐनजिनसी च त्यांनीं मला पहावयास पाठविलें होतें. ( खिशांतून पत्र काढतात. ) वझीर आपल्या पत्रांत लिहितोः—"आप, दुशमनोंको लानेके वास्ते, दख्खन, पत्रव्यवहार कर रहे हों? और महाराज सवाई राजाजी के सल्लासे, कुल राजपुतानाके राजा और ठाकूर व सरदारोंका दिल, आपने, अपनी मुठ्ठीमें लेकर, बादशाही गारद होना, ऐसी खुफिया कोशीश कर रहें हों! तो ये बात आप दाना महाराजके लायक नहीं! ये गलबा मिटा दों. इसमें अच्छा नहीं. आपके मरजी माफक आपकों माळवा और गुजराथका सुभा देनेमें आयगा. पर आप बैरीओसें सुलुक मत करों! हम सुनतें हैं कीं, आप फौज का जमाव करते हों. तो इसका क्या कारन? पादशहासाहेब तो सब तऱ्हेका भरोंसा आपकाहि रखते हैं. ऐसे होते भी, मरेठ्ठोंको मिलना और आपने भाई—बेटे—सरदार मरवाना और उनकों— मरेठ्ठोंको—मुलूख दिलवाना ये क्या बात? वे मरेठ्ठे राजपुतानाको कबज कर मराठदेश बना देंगे! आपका देश दुसरे के हाथ में मत दों. ये मराठे लोग आगे इस दिनकी याद नहीं करेंगे. रजपुतोंको गुलाम बनायेंगे.

तुम रजपूत असली क्षत्रिय हों. मरेठे वैसे नहीं. आपका, उनसें क्या ताल्लुक है ? आप सवाई जेसिंग महाराजकी ऐसी सल्लामें शामिल मत होना ! ” या प्रमाणें वझिराचें पत्र आहे. राजाजींनीं त्याला उत्तर पाठविलें कीं, “ मी मराठ्यांना सामिल नाहीं. तुमची बातमी चुकीची आहे ! ” या उत्तराची नक्कलहि राजाजींनीं पाठविली आहे. सारांश वझिरानें हा प्रांताभिमान फैलावण्याची नवी युक्ति काढली आहे.

भा— हा प्रयत्न त्यानें निजामा पासून उचलला. ही युक्ति मूळची चीनकुलीच्च खानाची ! त्यानें पाहिलें कीं, आम्हीं त्याला बधत नाहीं; तेव्हां त्यानें ही युक्ति काढली. पिताजींना माहित च आहे कीं, थोरल्या महाराजांनीं, तैलंगण– कर्णाटक– तंजावर म्हणजे कृष्णेच्या दक्षिणे कडील, सर्व दख्खनमधील हिंदू राजे, नायक, जहागीरदार यांना, कोणाला धाकानें तर कोणाला सामानें स्वराज्यांत दाखल करून घेतलें होतें; आणि त्यामुळेंच छत्रपति राजाराममहाराजांना जिंजीवासांत त्यांचा फार उपयोग झाला पण पुढें निजामानें हा बनाव शौर्यानें नव्हे तर या प्रांताभिमानाच्या युक्तीनें मोडून टाकण्यास प्रारंभ केला. त्यानें तैलंगी, कर्णाटकी व तामीळ राजांना, नायकांना व जहागिरदारांना, आम्हां मराठ्यांचा द्वेष करण्यास शिकविलें ! पण या मूर्ख लोकांना हें समजेना कीं, यामुळें “ हिंदवी स्वराज्य”ला आपण अडथळा करीत आहों ! या देशबुडव्या भावनेनेंच स्वराज्यांतून हे तीन प्रांत फुटून निघत आहेत व त्या मुळें च कर्णाटकाच्या आमच्या स्वाऱ्या फुकट जात आहेत ! असो. यास आळा घातला पाहिजे व तो हि लवकर घातला पाहिजे. वझीरानें राजाजींस जें पत्र पाठविलें त्यांतील मजकुरा वरून दरबारास त्यांचा व सवाई राजाजींचा वहीम आला आहे हें निश्चित ! त्यामुळें तो नाहींसा करून मग सर्व रजपूत राजांचा एकोपा करून कार्याची बिनचूक दिशा व धोरण ठरविण्यास गुरुदेवांना कांहीं काळ घालवावा लागेल. तोच प्रकार कविराजांचा. तेव्हां माझ्या मनांत असें आलें आहे कीं, मीं येथून छत्रपति स्वामींकडे जावें व तेथून मदत आणावी !

छ— ( आनंदानें ) बेटा, भाऊ ! माझ्या मनांतीलच गोष्ट तूं बोललास ! काल रात्रीं हा बेत मीं मनांत योजला होता. छत्रपति हे मला माझ्या हिरदेसा सारखे आहेत ! ते माझ्या हांकेकडे केव्हांच दुर्लक्ष करणार नाहींत ! ! सवड

असली तर ते स्वतः च येतील. मात्र, त्यांना सवड न झाली तर एक गोष्ट अवश्य करा. श्रीमंतांना आग्रह करून आणा ! तेहि मला जगत सारखे आहेत! थोरल्या श्रीमंतांनीं मला भाऊ म्हटलें च होतें !

त्यावर सर्वांनीं भाऊसाहेबांना आग्रह केला कीं, " ही मसलत फार उत्तम असून आपण च ती पार पाडावी. "

**भा**— ठीक आहे ! आपल्या सर्वांच्या इच्छेप्रमाणें मी ही कामगिरी स्वीकारतों !

भाऊसाहेब थोडा वेळ पुन्हां विचारमग्न झाले; मग—

**भा**— पिताजी ! मीं तिकडून कुमक घेऊन येईपर्यंत, इकडे आपण सर्वांनीं कसें वागावयाचें याचीहि मी येक योजना ठरविली आहे. कुमार हिरदेसांनीं आतां, ताईशी बोलतांना " मराठ्यांची गनिमी " हा शब्द उच्चारला होता ! ह्यावरून मला एक आठवण झाली ! ती " गनिमाई " आपण यापुढें, मीं इकडे येईपर्यंत, उपयोगांत आणावयाची आहे ! पुन्हां " **नेताजी गनिमाई** " उपस्थित करावयाची आहे !

**छ**— ( आठवून ) भाऊ ! तुम्ही काय म्हणतां तें आतां थोडेसें माझ्या लक्ष्यांत आलें ! नेताजी, हे महंमद मुर्शिदखान बनले तेंच ना ? पण या मंडळीस तें समजले पाहिजे; तरी तें यांना सांगा व तसलें प्रकरण— ती गनिमाई— आपण यापुढें कसें रंगवायचें त्याची हि योजना ठरवा !

**भा**— तें मग ठरवूं ! तूर्त श्रीछत्रपतींना द्यावयाचें पत्र, पिताजींनीं लिहून तयार करावें असें वाटतें.

**छ**— तुमच्या इच्छेप्रमाणें होऊं द्या ! भाऊ ! छत्रपतींना तुम्हीं सर्व हकीकत समक्ष सांगालच; मी फक्त थोडक्यांत श्लेषात्मक पत्र लिहितों ! तसें च चिरंजीव श्रीमंतांना हि निराळें पत्र लिहितों. श्रींची आज्ञाच आहे कीं " इशारतीचें लेहों नये. " म्हणून केवळ इशारत देतों ! हिरदेसा ! बेटा ! देवघरांत लेखनसाहित्य घेऊन ये. तेथेंच पत्रें लिहूं. मी पुढें होतों. पत्रें तयार करून येथें येऊं.

महाराज उठले; तेव्हां सर्व मंडळीहि उठली. महाराज व कुमार हिरदेसा तेथून निघून गेल्यावर मंडळी पुन्हां बसली.

**ज**— भाऊसाहेब ! आपल्यास तिकडे जाऊन कुमक घेऊन परत येण्यास

बरेच दिवस लागणार ! तेवढ्यांत माझ्या मतें गुरुदेव, रजपूत राजांचें राजकारण शिजवून पक्कें करतील !

**भा**— होय ! तथापि, मला परत येण्यास फार दिवस लागणार नाहींत. सर्व राजे जरी आपल्यास मिळाले नाहींत, तरी निदान त्या दिवशीं शपथा घेणारे हिंदू मुसलमान राजे-ठाकूर-सरदार आपल्या मदतीस धांवून येतील यांत मुळींच शंका नाहीं !

**पृ**— तों पर्यंत मी आपल्या सैन्याची हि तयारी जय्यत करून ठेवतों. ( खजिन्याच्या पत्र्यां कडे बोट दाखवून ) या लक्ष्मीची कृपा झाल्या वर आतां काय कमी आहे ? भाऊसाहेब ! आपण, आतां तें नेताजी प्रकरण कां काय, तें काय म्हणालां ? तें सांगा ना आतां.

**ह**— होय खरेंच; आणि त्यांत "मराठ्यांची गनिमी" ती काय ? ती ऐकण्याची मला हि फार उत्सुकता आहे.

**भा**— हमीदखान ! तुम्हां सर्वांना योग्य वेळीं ती कळेलच. तूर्त ती, मी पितार्जीना सांगतों; पुढें ते आपल्या सर्वांना ती समजावून देतील. आपल्याला ती कळली पाहिजे; कारण तींत आपला सर्वांचा संबंध येणार आहे. माझ्या मतें, माझी साताऱ्या कडील कामगिरी व आपणां सर्वांची ही नेताजी-कामगिरी एकदम च सुरू झाली पाहिजे; म्हणजे महंमद च काय पण दिल्लीदरबार हि गाफील राहील ! जुलमी पातशाही बहुधां आंधळी असते असा एक निसर्गसिद्ध नियम आहे ! हिरण्यकशिपूस समोरच्या खांबाचे आड असलेला त्याचा मृत्यू दिसला नाहीं ! कंसानें आपल्या शत्रू साठीं सर्व देश धांडोळला पण त्याचा शत्रु, त्याचा काळ, पंचक्रोशींतील गोकुळांत वाढत असलेला त्याला दिसला नाहीं ! तसें च या जुलमी पातशाहीचे काळ जे आपण सर्व फकीर ते तिच्या दृष्टिपथांत येणार नाहींत ! तिला आतां घोर लागला आहे ! शेवटचा घोर लागलेला माणूस कधीं शुद्धींत असतो काय ?

इकडे पिताजी व हिरदेसा देवघरांत बसले होते; पिताजी मजकूर सांगत होते व कुमार पत्रांत तो लिहून काढीत होते. पाव घटका झाल्या वर पिताजींनीं वर मान केली—

**छ**— शाहू महाराजांचें पत्र तर संपलें. आतां बाजीरावसाहेबांचें पत्र कोंठपर्यंत आलें ?

हि– " **लूटे बंगष मेरी बाजी !** " येथपर्यंत झालें !

छ– टीक ! पुढें काय बरें लिहावें ? ( विचार करीत बसतात )

देवघराच्या मागें माजघर होतें. त्यांत ताईसाहेब बसल्या होत्या. बसल्या बसल्या त्या गात होत्या.

**( राग देश )**

**" नाथ कैसे गजके फंद छुडाए ॥ ध्रु० ॥ हँस पूंछें जनकपुरकी नारी । तिहारो यही अचरज मन भाए ॥ १ ॥ गज और ग्राह लरें जलभीतर दारुण द्वंद्व मचाए । गजकी टेर सुनी रघुनंदन गरुड छोड उठ धाए ॥ २ ॥ जहिं जहिं भीर परी संतनपर, तहिं तहिं होत सहाए । तुलसीदास सेवक रघुनंदन, आनंद मंगल गाए ॥ ३ ॥**

हें गाणें देवघरांत स्पष्ट ऐकूं येत होतें. तें महाराजांनीं ऐकलें; श्रद्धायुक्त मनानें ऐकलें. त्यांच्या ठिकाणीं अष्ट सात्त्विक भाव प्रकट झाले ! डोळ्यांतून भक्तिरस स्रवूं लागला ! ते तोंडानें गुणगुणूं लागले–

" **जहिं जहिं भीर परी संतनपर, तहिं तहिं होत सहाए** " !

दहा पंधरा पळें महाराजांची भक्तिरसांत समाधि लागली ! ताईसाहेबांचें गाणें थांबलें ! पिताजींची समाधि उतरली ! ! हिरदेसाकडे पाहून ते भक्तीभावनोत्कट स्वरानें म्हणले—

छ— हां ! हां ! ताईनें गातां गातां सुचविलें ! तिच्या तोंडून सरस्वतीच बोलली ! बेटा इकडे तें पत्र आण.

कुमारानें पत्र महाराजांपाशीं दिलें. पिताजींनीं त्याचें शेवटीं पुढील दोहा लिहिलाः—

**" जो गति ग्राह- गजेन्द्रकी, सो गति मेरी आज । बाजी जात बुंदेल की, राखो बाजी ! लाज ! ! "**

छं—-बस, पुरें झालें पत्र !

महाराजांनीं दोन्हीं पत्रांचे शेवटीं " हे आशीर्वाद " स्वहस्तें लिहून शिक्का मोर्तब केलें. मग हिरदेसानें दोन लाखोटे तयार करून त्यांत पत्रें घालून ते दोन निरनिराळ्या गजनीच्या थैल्यांत घालून दोऱ्यांच्या गांठींवर मोहरा केल्या. नंतर दोघे पिता-पुत्र पुन्हां दरबारी शामियान्यांत आले. मंडळीनें उत्थापन दिल्यानंतर—-

छ — भाऊ ! या दोन थैल्या घ्या, एक छत्रपतिमहाराजांची व दुसरी श्रीमंतांची. दोघांना त्या द्या. शिवाय मुखजबानीनें सर्व हकीकत श्रुत करा. छत्रपति न आले तर श्रीमंतांना जरूर घेऊन या !

भा — पिताजींनीं निर्धास्त असावें ! श्रीसमर्थ, पिताजींचे सर्व हेतु सिद्धीस नेतील !

गुप्त दरबार बरखास्त झाला. दुसरे दिवशीं भाऊसाहेब निवडक दीडशें स्वारां निशीं सातान्यास जाण्यास निघाले. बाकीचे त्यांचे स्वार व पिलाजी जाधव आणि राणोजी शिंदे हे महाराजांच्या छावणींत राहिले. भाऊसाहेबांनीं पिताजींना वंदन केलें; दोन्ही राजकुमारांनीं भाऊसाहेबांना आलिंगन दिलें; ताईसाहेबांनीं त्यांना वंदन केलें. छावणींत राहिलेल्या यांच्या दीडशें स्वारांनीं केलेल्या दुतर्फा कोरवंदींतून, भाऊसाहेब घोड्यावर स्वार होऊन, हातांत घेतलेल्या दुर्गेनें सर्वांची सलामी घेत निघाले. रांगेतील शेवटचे दोन शिपायी ओलांडल्यावर भाऊसाहेबांनीं "जय गजराज ! " असा उच्च स्वर काढला ! सर्वांनीं त्या जयजयकाराचें आवर्तन केलें !

एकदम एकशें एक्कावन भीमथडी घोड्यांची मांड वायूवेगानें दक्षिणेकडे धांवूं लागली ! जणूं काय वैनतेय गरुड, गजेंद्रा वरील संकटाचें गाऱ्हाणें, श्रीविष्णूच्या कानां वर घालण्यास वैकुंठा कडे झेंपावला ! त्या झेंपेनें दिल्लींत व महंमद बंगपाचे छावणींत उत्पात झाले !

**तो विनताकुक्ष्युद्भव, काश्यपि, पक्षीन्द्र, गरुड, बळशाली, ।**
**जातो विष्णु अणाया; उत्पातोत्पत्ति तद्भयें झाली ! ॥**

# नेताजीची गनिमाई ! [ पाकळी दुसरी ]

**न हि बुद्धयान्वितः प्राज्ञो नीतिशास्त्रविशारदः । निमज्जत्यापदं प्राप्य महतीं दारुणामपि ॥**

भाऊसाहेब दक्खन कडे गेल्या नंतर आठ दहा दिवसांनंतरचा प्रसंग.

महंमदखान बंगषाच्या छावणी पासून नऊ दहा कोसां वर एका चिंचांच्या राईत, नदी कांठीं एक छोटासा गोट होता. संध्याकाळ होऊन दिवेलावणी झाली होती. गोटांतील एका मोठ्या तंबूंत एक तरुण राजबिंडा पुरुष विचार करीत बसला होता. त्याची मुद्रा आनंदित असल्यामुळें त्याच्या मनांतील विचारपरंपरा आनंदपर्यवसायी होती, असें मानल्यास चूक होणार नाहीं. अर्धी अधिक घटका तो तरुण विचारांत गुंग होऊन गेला होता; शेवटीं त्या तंद्रींत त्याच्या तोंडून पुढील ओवीचीं दोन चरणें बाहेर पडलीं:—

" **राजकारण बहुत करावें । परंतु कळों च नेदावें ॥** "—

इतक्यांत तंबूच्या प्रवेशद्वारा जवळून—

" **परपीडे वरी नसावें । अंतःकरण ! ॥** "

हा त्याच ओवीचा उत्तरार्ध घनगंभीर स्वरानें कोणीं म्हटला ! त्या आवाजानें तरुण आपल्या तंद्रींतून खडबडून जागा झाला ! आवाज ओळखीचा असल्यानें तरुण आपल्या आसना वरून चटकन् उठला, दारांत गेला आणि

तेथें उभ्या असलेल्या व्यक्तीच्या पायां वर त्यानें आपलें मस्तक ठेविलें! त्या व्यक्तीनें "**जय, जय, रघुवीर समर्थ!**" म्हणून तरुणास उठविलें!

दोघेजण तंबूत आले. वृद्ध व्यक्ति आसना वर बसली, तरुण त्या व्यक्तीचे समोर बसला. वृद्ध व्यक्ति बोलूं लागली:

**वृ** — बेटा! हिरदेसा! राजपुतान्यांतील **देवतार्चन** संपवून, राजा छत्रसाला कडे जाऊन आलों. तेथें भाऊ दक्खनमध्यें गेल्याचें व तूं या कामगिरी वर इकडे निघाल्याचें समजलें तेव्हां तुला एकंदर हकीकत सांगण्या साठीं इकडे आलों!

**हि**— आज्ञा! गुरुदेव! वयाच्या वृद्धावस्थेंत आपल्याला हे किती कष्ट पडतात!

**गुरु** — बेटा! कष्ट कशाचे? आणि कष्ट पडले, तरी त्यांत आश्चर्य मानण्याचें काय कारण? ते केले च पाहिजेत! कष्टें वीण कर्माचें फळ नाहीं! कष्टां विना राज्य नाहीं! आधीं कष्ट मग त्याचें फळ! कष्ट च नाहीं तें निर्फळ! साक्षोपें विना केवळ वृथा–पुष्ट व्हावयाचें काय?

**हि** — ही श्रीं ची आज्ञा कोण उल्लंघन करणार? पण गुरुदेवांचें म्हातार-पण झालें आहे म्हणून मीं म्हटलें.

**गुरु**—अरे! म्हणूनच उठाउठीं कर्तव्य पार पाडलें पाहिजे! मृत्यू जवळ जवळ येत चालला, आतां निदसुरेपणा झाडून टाकावयास नको? मी वृद्ध असलों, मी तुमचा गुरुदेव असलों तरी मृत्यूस त्याचें काय? मृत्यु न म्हणे हा ब्राम्हण, कर्मनिष्ठ! त्याला ब्रम्हहत्येचें काय होय? तो ब्रम्हचारी जाणीत नाहीं, राज-कारणी जाणीत नाहीं, महंताला डरत नाहीं आणि राजांना च काय पण चक्र-वर्ती सम्राटाला हि भीत नाहीं। मग त्यानें झडप घालण्या पूर्वी आपलें जें नियत–कर्तव्य तें पार पाडावयास नको काय? बेटा! प्राणी जन्मास आला कीं तेव्हां पासून च तो मृत्युपंथास लागला! काळाचे म्हणियारे, त्याला येकसरें मारीत सुटतात आणि केव्हां तरी अवचित यमराजाच्या पुढें नेऊन घालतात! तेव्हां तात्बडतोब लोककल्याण केलें पाहिजे!

**हि**— आज्ञा! पण, **ज्या लोकांचें कल्याण करण्यासाठीं गुरुदेवांनीं इतक्या वृद्धावस्थेंत हि आटाटी चालविली आहे, त्या लोकांना तरी आपल्या कल्याणाची इतकी असोसी कोठें आहे?** कांहीं अपवाद

वगळल्यास, हे लोक असल्या कार्यकर्त्यांना उलटीं नांवें ठेवतात! गुरुदेवां सारख्या **अर्धनग्न फकिराची** ( डोळ्यांत अश्रू येतात ) हे **दगड चेष्टा करतात!** शाहूमहाराज, पंतकाकाजी, पिताजी, भाऊसाहेब, पंतप्रधान, असल्या **महापुरुषांचा हे लोक द्वेष-मत्सर करतात; यांच्या विषयीं देशांत बुद्धि-भेद माजवितात!** एकादे वेळीं असें वाटतें कीं, असल्या भिकारड्या, सर्व दुर्गुणांच्या खातेऱ्यांत लोळणाऱ्या **गर्दभांच्या** कल्याणासाठीं आपणासारख्या **महात्म्यांनीं** व छत्रपतीसारख्या राष्ट्रसूत्रधार **लोकमान्य** महाराजांनीं काय म्हणून झटावें? मरूं दे या नरकांतील किड्यांना त्या रौरवांमध्यें!

**गुरु**— निराशेच्या भरांत तुला असें वाटणें साहजिक आहे! पण तूं थोडा विचार कर! आपल्या लोकांचें हें **अज्ञान** आहे! त्यांनीं अज्ञानानें असन्मार्गाचा अवलंब केला आहे. **त्यांना खेंचून सन्मार्गावर आणावयाचें आहे!** हें काम त्यांच्या मनाच्या विरुद्ध आहे. तेव्हां हे लोक असल्या कार्यकर्त्यांच्या विरुद्ध बोलणार एवढें च नाहीं तर त्यांच्या मार्गांत अडथळे आणणार; प्रसंगीं **शत्रूस मिळणार! पण अशांना च आपल्याला मोक्षास न्यावयाचें आहे! " लोकांमाजीं भावार्थ कैंचा। आपण जगवावा तयांचा॥ "** ही अवस्था श्रींच्या काळीं होती आणि आतां नाहीं असें थोडेंच आहे? **पुढें** हि हीच स्थिति राहील. परदास्याचा सर्वांत मोठा दोष हाच! परदास्यानें आमचा पैसा धुवून गेला तरी त्याची मला पर्वा नाहीं! पण त्यानें **आमचीं मनें** हिरावून नेलीं म्हणजे मला वाईट वाटतें? साहसानें पैका मिळविता येतो. पण स्वतःच्या हिता कडे पाठ फिरविलेल्या मनांना कल्याणोन्मुख करणें अत्यंत दुर्घट काम आहे! आणि तें फक्त **स्वसुखानिरभिलाषी-पुण्यपुरुषांना च** साधतें! अशा पुरुषांच्या कपाळीं, ते ज्यांच्या साठीं झटतात, त्यांच्या कडून शिव्याशापांची, निर्भर्त्सनेची लाखोली डकविण्यांत येते! फार काय? एखादे वेळीं ते लोक, असल्या महापुरुषाच्या जिवा वर उठतात; त्याचा प्राण घेतात! मीराबाईचें काय झालें? ती, तिच्या गिरिधरनागरगोपालाचें ज्ञान, आपल्या समाजांत पसरवूं लागली, तर त्या समाजानें तिला कुलटा ठरविलें आणि प्रत्यक्ष बापानें तिला वीष पाजलें! प्रत्यक्ष मीरा माताच म्हणते—

**( राग जोगी )**

**" मेरे रानाजी! मैं गोविंद गुण गाना! ॥ धृ० ॥ राजा रूठे,**

**नगरी राखे वह अपनी, मैं हरी रूठे कहां जानां ॥ १ ॥ डबियामें काला नाग जो भेजियों, मैं ठाकुर करके माना ॥ २ ॥ राजानें भेजियो जहर प्यालडा, मैं अमृत कर पी जाना ॥ ३ ॥ भयी रे मीरां प्रेम दीवानी, मैं सावरिया वर पाना ॥ ४ ॥**

हि– आज्ञा ! म्हणजे हा **महात्मापंथ** इतका बिकट आहे तर ?

**गुरु–** होय बेटा ! **ही सुळावरची पोळी** आहे ! अशा आचरणानें च श्रीं ना " **समर्थ** " पदवी लाभली, बाळ ! **पाप्यांना पुण्यवान बनवावें, गुलामांना स्वतंत्र बनवावें, निंदकांना पायां पडण्यास लावावें, दास्यांत कुजलेल्या देशाला आनंदवनभुवन बनवावें, सारांश " समर्थ समर्थ करावें । तरी च समर्थ म्हणवावें ॥ ".** असल्या " श्रीसमर्थ पंथां"तील तूं आहेस, म्हणून इतकें सांगणें घडलें !

**हि–** आज्ञा ! गुरुदेवांनीं या पंथाचें रहस्य माझ्या सारख्या अज्ञान्याला सुलभपणें समजावून सांगितलें, हा माझ्यावर थोर उपकार झाला ! आतां एक शंका आहे. विचार म्हणून आज्ञा होईल तर विचारतों.

**गुरु–** खुशाल विचार.

**हि–** मी थोड्या वेळा पूर्वीं विचार करीत असतांना, माझ्या तोंडून श्रीं चें " **राजकारण बहुत करावें, परंतु कळों च नेदावें** " हें वचन बाहेर पडलें आणि त्या च वेळीं गुरुमुखांतून " **परपीडे वरी नसावें, अंतःकरण** " अशीं अक्षरें बाहेर पडलीं ! मला ही सबंध ओवी माहीत होती आणि तिच्या बद्दल च मी विचार करीत होतों. या दोन वचनांची संगति कशी लावावयाची ? राजकारण म्हटलें कीं तेथें परपीडा आली. शत्रूला पीडा दिल्या शिवाय राजकारण कसें होणार ? मग का त्याला आनंद द्यावयाचा ?

**गुरु–** तुझा प्रश्न योग्य आहे. याला उत्तर, माझ्या वरच्या भाषणांत आलें आहे. तेथें, जेथें " आपले लोक " हा शब्द आहे तेथें " शत्रू " हा शब्द घाल म्हणजे झालें ! शत्रूच्या देहाचा आपण द्वेष करणार का त्याच्या दुष्ट मनोवृत्तींचा ? त्याच्या मनोवृत्ति दुष्ट म्हणून ना तो आम्हां सुष्ट मनोवृत्तीवाल्यांचा शत्रू ?

**हि–** होय ! म्हणून च.

**गुरु–** झालें तर ! त्याची **मनोवृत्ति बदलून टाका** ! त्याला पीडा देण्याचें

कारण काय ? प्रत्येक व्यक्ति त्रिगुणात्मक आहे ! मात्र कोणांत तामस गुणाचें आधिक्य असेल तर कोणांत सात्त्विक गुणाचें ! तामसी व्यक्तींत सत्वगुण असतो च, पण त्यावर तमाची राख सांचलेली असते. ती फक्त उडविण्याचें काम आपल्यास करावयाचें ! ती उडली म्हणजे सत्त्वगुणाचा स्फुल्लिंग पुढें येतो; त्याला हळूं हळूं फुंकर घालून तो चेतवावयाचा म्हणजे झालें !

हि– पण हें काम सामान्य माणसाचे हातून होणार नाहीं.

**गुरु**– तुझें म्हणणें सत्य आहे. **नाथ** महाराजांनीं, **पंचवीस वेळां** यवनाची थुंकी अंगा वर झेलून ही गोष्ट सिद्ध केली आहे ! **श्रीसमर्थांनीं,** स्वत: ला वाळूंत पुरणाऱ्या माणसांना क्षमाच केली ! **वसिष्ठांनीं,** स्वतःच्या शंभर पुत्रांना ठार करणाऱ्या विश्वामित्रा वर हि भ्रुकुटि वक्र केली नाहीं ! अशी वृत्ति पाहिजे ! अशी वृत्ति असेल तेव्हां च लोकमान्यता मिळते. त्याला च " नाथ, महात्मा, समर्थ, ब्रम्हर्षि " पदवी प्राप्त होते ! ही वृत्ति भ्याडपणाची नाहीं, अत्यंत **शौर्याची** आहे ! या तिन्ही व्यक्तींचें अंगीं शारीरिक शक्तीनें, आपल्याला त्रास देणाऱ्यांना शासन करण्याचा अधिकार होता ! सामर्थ्य होतें ! त्या त्रास देणाऱ्या एकेकट्या व्यक्तीला च काय पण **त्रैलोक्याला शिक्षा लावण्याचें** हि सामर्थ्य होतें पण त्यांनीं तसें केलें नाहीं ! त्यांनीं त्या त्या व्यक्तीचा सात्विक गुण जागृत केला, त्यांना लाजाविलें आणि त्यांना आपले शिष्य बनविलें ! श्रीं ची हुरड्याची गोष्ट प्रसिद्ध आहे ! साऱ्या महाराष्ट्राचा छत्रपति, कणसांचीं ताटें मारणाऱ्या त्या दुष्टाला शिक्षा करण्यास सिद्ध असतां, श्रीं नीं त्या दुष्टाला शेत इनाम देववून सुष्ट केलें ! राग आल्या वर, खोडी करणाऱ्याचें थोबाड रंगविणें फार सोपें आहे ! हें काम तर निर्बुद्ध पशुपक्षी हि करतात ! सूड उगविण्याची बुद्धि त्यांच्या हि ठिकाणीं उपजत असते. मग तें कृत्य ज्याला बुद्धि आहे अशा माणसानें हि करावें काय ?

हि — पण हें सामर्थ्य अत्यंत थोर **महात्म्यांच्या** च अंगीं असतें, **षंढांच्या** अंगीं, नुसत्या **बोलक्या ढलप्यांच्या** अंगीं नसतें असा नियम आहे !

**गुरु** — होय ! आणि असल्या च **महात्म्यांच्या** हातून जगाचा उद्धार होतो असा हि त्रिकालाबाधित नियम आहे ! बेटा ! ज्या वसिष्ठांचें उदाहरण मीं तुला आतां दिलें त्यांच्या च परंपरेंतील तूं आहेस ! " वसिष्ठें उपदेशिलें

श्रीरामरायासी। रामें रामदासी उपदेशिलें ॥ " या रामदासी पंथांतील तूं !

**हि** — गुरुदेव ! अशा क्षमाशील पुरुषांच्या अंगीं त्रैलोक्य जाळण्याचें सामर्थ्य कसें असतें ?

**गुरु** — हें मनाचें, आत्म्याचें सामर्थ्य ! हें त्यांच्या तपाचें सामर्थ्य ! तें त्यांच्या शरिरांत किंवा मनांत कोंदून कोंदून भरलेलें असतें ! तें फक्त, ज्या वेळीं त्याची गरज लागेल त्या च समयीं प्रगट होतें. शंभर पुत्र मारून हि वसिष्ठ रागावत नाहींत असें पाहून मदांध सम्राट विश्वामित्रानें पंच हत्यारी एक अक्षौहिणी सैन्या सह त्यांचे वर हमला केला. ब्रह्मर्षि जवळ किती सैन्य होतें ? एक हि शिपाई नव्हता वा एक हि तरवार नव्हती ! बरें, भीमा प्रमाणें त्यांचें शरीर वज्रा सारखें नव्हतें ! ते वृद्ध होते, त्यांचें शरीर शीर्ण जीर्ण होतें ! हाडकुळी मूर्ती होती ती ! कमरेस गुडघ्याच्या हि वर असलेलें एक वल्कल गुंडाळलेली व खांद्या वर एक छाटी टाकलेली ती सुदामदेवाची मूर्ति होती !! त्या मूर्ती वर एक अक्षौहिणी सैनिकांनीं आपलीं शस्त्रें फेकलीं ! त्यांच्या महारथी राजानें पर्जन्यास्त्रा पासून गंधर्वास्त्रा पर्यंत सर्व अस्त्रांचा मारा त्या तपोनिष्ठा वर केला ! पण सैनिकांची पांच अक्षौहिणी सख्यांक शस्त्रें बोथट झालीं ! राजाचीं शंभर अस्त्रें फोल झालीं ! तेव्हां अखेरचें ब्रह्मास्त्र राजानें सोडलें ! देव घाबरले ! सर्वांना वाटलें जगाचा नाश होणार ! पण त्या शांतिसागरानें, नव्हे त्या **मूर्तिमंत शांतीनें**, त्या **महात्म्यानें** तें ब्रह्मास्त्र गिळून घेतलें ! पोटांत रिचविलें ! या समरांत त्या मूर्ति जवळ काय शस्त्रें होतीं ? धनुष्य नव्हतें, बाण नव्हते, परशु नव्हता, असिलता नव्हती, शक्ती ( सांग ) नव्हती, गदा नव्हती ! एक हि शस्त्र नव्हतें ! तो **महात्मा** निःशस्त्र होता ! केवळ, हातांत पळसाचा एक दंड मात्र होता ! पण, त्या एरवीं पटकन् मोडणाऱ्या काटकींत, त्या पूज्य महात्म्याचें सर्व जन्मभर सांचविलेल्या मनाच्या अपरंपार शक्तींचें, त्याच्या अतुलनीय तपाचें सामर्थ्य शिरलें ! ती काटकी **ब्रम्हदंड** बनली आणि त्या सत्वगुणप्रधान ब्रम्हदंडानें विश्वामित्राचें सर्व तामसी सामर्थ्य खाऊन टाकलें ! भस्मसात् केलें !! तुझ्या प्रश्नाचें हें उत्तर आहे ! **वसिष्ठ कांहीं शस्त्रास्त्र – अनभिज्ञ नव्हते** ! विश्वामित्रांनीं शिक्षण देण्यापूर्वीं त्यांनींच भगवान् रामप्रभूस धनुर्विद्यापारंगत केलें होतें ! सारांश, शत्रुस पीडा न देतां, त्याचा सूड न घेतां, फक्त त्यानें रचलेल्या

**कारस्थानांना लटकें** पाडावयाचें; आणि तें परस्परें त्याच्या प्रत्ययास आणून द्यावयाचें !म्हणजे हा च शत्रू पुढें मित्र होतो ! या प्रमाणें "जगदांतर" हस्तगत करावयाचें! मग अशा ज्या महाभागानें जगदांतर काबीज केलें असेल, जो जगदांतरीं मिळाला असेल, सामावला असेल, तो, ज्याला त्याला, सर्व जगाला पाहिजेसा वाटेल ! इतर सर्व कामें सोडून जग त्याला धुंडीत येईल ! त्याच्या पायां वर मस्तक ठेवील आणि त्याला स्वतःच्या डोक्या वर घेऊन नाचेल ! ! ! हा **समर्थसंप्रदाय** होय !

हि– मी आज धन्य झालों ! श्रीसंप्रदायाचें तत्त्व मला समजलें ! आपण असे च ब्रम्हर्षि, महापुरुष, महात्मा आहां; आपल्या नेतृत्वा खालींच आम्हीं सर्व जण वागूं !

**गुरु–** तथास्तु ! अरे ! पण तुला राजपुतान्यांतील हकीकत सांगावयाची तशी च राहिली ! श्री चें तत्त्वज्ञान सांगतांना माझें असें नेहमीं होतें; असो. मी जयपुरास सवाई राजां कडे गेलों होतों. त्याला इकडील हकीकत सांगितली. प्रसंग येऊन ठेपला, तेव्हां मशीदींतील शपथेस जागून तयारीस लागलें पाहिजे अशी त्याला सूचना केली.

हि– मग, राजाजी काय म्हणाले ?

**गुरु–** तो तयार आहे. प्रत्यक्ष रणांत उतरण्यास तो उतावीळ झाला होता. पण मी त्याला सांगितलें कीं, "तुझ्या बद्दल, जोधपूरकरा बद्दल व बऱ्याचशा रजपूत राजांबद्दल पातशाही दरबाराला संशय आला आहे. तेव्हां तुम्हीं सर्वांनीं उघडपणें मदत करूं नये. गुप्तपणें पैक्याची व सैन्याची मदत करा. उतावीळपणा करूं नका. अधीरपणानें कार्यनाश होईल." **अधीर माणसे खोटीं । काम कांहीं कळेचिना ।।** असें होईल. अधीरपणानें फड नासतो. पातशाही जरी खिळखिळी झाली आहे तरी ती कोलमडून पडण्यास अजून थोडा अवधि आहे. ती वेळ आली म्हणजे तुमच्या सारख्यांनीं प्रत्यक्ष उठाव करावा !" हें सर्व त्यानें मान्य केलें. त्यानतर त्यानें माझ्या सल्ल्यावरून रजपुतान्यांतील रजवाड्यांना पत्रें लिहिलीं. सर्व पत्रें एकाच अर्थाचीं आहेत. हा मसुदा बघ.

गुरुदेवांनीं आपल्या कुबडीच्या मुठीच्या चोरकप्यांतून एक बोट रुंदीची पत्राची एक घडी काढून हिरदेसाच्या हातीं दिली !

हि— मोठ्यानेंच वाचतों !

" सिधीश्री १०८ महाराज......संवस्थान...जोग श्री अमरगढसु महाराजाधिराज श्री सवाई जयसिंगजी कृत प्रणाम बंचजो. अत्र कुशल, तत्र कुशल, श्रीजीकी कृपासु चाहिजे जी. अपरंच हकीकत एसी के, महंमद बंगष पचास हजार फौज साथ लेकर महाराजा पिताजी छत्रसालजी के उपर चढाई कर आया है. पिताजी संकटमें फंसे हैं. जैसे के गजराज, ग्राहनें फंसाये है ! तो पिताजीको संकटमेंसे छुडाना ये हमारी फर्ज है. दक्खनसे छत्रपति महाराजांकी मदत मिलाने की कोशीस हो रही है. आप भी इस कार्य में तन मन धनसे मदत देना जरूर. इसे आपना, आपने धर्मका कल्यान होगा ! और राजपुताना – बुंदेलखंडमें महाराष्ट्रधरमकी वृद्धि होगी ! ये बात विचार कर इधरसे पातशाही को नोपद करना; हमारा मनोरथ पूरा करना ! इस के लिये छत्रपति महाराजां को, पिताजी, लिखेंगे. मरेठे इधर आयेंगे, आप उनकों सहाय्यता देना. ऐसा न हो कि, इनके पाव, पहिले सरीखे उठ जावें ! दो तीन बखत मरेठे मालवे में तथा इधर आकर पीछे गये ! सो इसका पूरा बिचार करना. और दूरंदेश बिचार समजना. दिल्ली दरबार को हमारा अंदेशा आया है. बादशहा हमसे बहोत नाराज है. हमको लिखते है कि, " महाराजाने कुल राजपुताना – मालवाके सरदारोंका दिल अपने हातमें लेकर आप मरेठोंको मिलें. हमारे सुभे गारद करवाये, और मुलुक दुश्मनोंको दिलवा कर, तोजी करा दी. तो कुछ फिकीर नहीं. इसका बदला सबकों मिलेंगा ! मरेठोंको सजा देकर निकाले दे जायेंगे. समालो ! " एसा लिखा आया. छत्रपती महाराजानें सब हिंदू राजा – सरदारोंको कौल पहले हि दिया है कीं, " सभी संस्थानोंका हक पूर्वापार चलायेंगे; निर्वेध चलाएंगे. वखत पर जाजती परवरसी करेंगे ! " ऐसा कौल है. सो, हम आपको लिखते हैं कीं, बादशहाके चढाई की तो कुछ चिंता नहीं. श्रीरामजी पार लगावेगा. पंत प्रधान राजश्री बाजीराव पेशवासे, पहेले हि, हमनें आपके निसबत धर्म–कर्म–कौल–बचन कर लिया हैं ! अब किसी तरहका शक न रखते महाराजा पिताजी और मरेठोंको मदत करना ! हम आगें जैसा लिखेंगे वैसा करना. हमेशा कुशलताका लिखता रहना ! "

गुरु — या प्रमाणें पत्रें पाठविल्या नंतर, मग जयपूर सोडून, उदेपूर, जोधपूर, रींवा, बुंदी, चित्रकूट इत्यादि ठिकाणीं जाऊन तेथील अधिपतींना

भेटलों व पत्रा प्रमाणें च त्यांना संदेश दिला ! त्या सर्वांनीं आपण कळवूं त्या वेळीं पैसा व सैन्य यांची गुप्तपणें मदत धाडण्याचें कबूल केलें.

**हि**— बाकींच्या दोस्तांचें काय म्हणणें आहे ?

**गुरु**— तिकडे भूषणला पाठविलें आहे. कुमाऊं, श्रीनगर, बनपूर, मैंडू, असोथर, मोरंग, गढवाल, हमीरपूर येथील राजांकडे जयसिंहाचीं पत्रें गेलीं आहेत आणि प्रत्यक्ष भूषण हि गेला आहे. तसेंच आपल्याला मिळालेल्या मुसुलमान सरदारां कडे हि जाण्यास त्याला सांगितलें आहे. आतां पर्यंत त्याचें काम संपलें असेल. त्याला इकडे येण्यास निरोप पाठविला आहे.

इतक्यांत चोपदार आला व त्यानें दोघांना वंदन केलें —

**चो**— सरकार ! कविराज आले आहेत !

**गुरु**— त्याला घेऊन ये.

**चो**— आज्ञा !

चोपदार, तंबूच्या बाहेर गेला. पांच चार पळांत तो पुढें व कविराज मागें असे तेथें आले. भूषणनें गुरुदेवांना साष्टांग दंडवत घातलें ! हिरदेसानें, भूषणांना नमस्कार केला. गुरुदेवांनीं आज्ञा केल्या वर कविराज खालीं बसले.

**गुरु**— भूषण ! काय वर्तमान आहे ?

**भू**— गुरुदेव ! आपल्या आशीर्वादानें काम फत्ते झालें ! ज्यांच्या ज्यांच्या कडे, गेलों त्या सर्वांनीं शपथप्रमाण केलें कीं, आम्ही तयार राहतों. इशारा आला कीं सैन्य आणि पैसा पाठवितों. स्वामींनीं किंचिन्मात्र काळजी करूं नये !

**गुरु** — शाबास ! श्रीरामरायांच्या कृपेनें येथ पर्यंत उत्तम झालें. छत्रसाला वर त्या रघुपतीची तशी कृपाच आहे ! बेटा हिरदेसा ! "नेताजी – गनिमाई" तुला भाऊनें सांगितली च आहे ! सावधगिरीनें वाग. त्या प्रकरणाची बारीक सारीक माहिती, मीं थोडया वेळानें सांगेन. कारण त्यांत श्रीं च्या आज्ञेनें काकाजी सह मला हि थोडासा भाग घ्यावा लागला होता ! आतां फक्त सावधगिरीची सूचना देतों. तसें च एकदां पूर्ण विचार करून पाय पुढें टाकला म्हणजे तो मागें घेऊं नको ! शिवप्रभूच्या शागीर्दांच्या अंगीं, रणांत रोंवलेला पाय मागें न घेणें व सत्यवचनी असणें, या दोन गोष्टी अवश्य असावयास पाहिजेत—

**" पग रनमें चल यों लसैं, ज्यों अंगदपद पेन । ध्रुवसो, भुवसो, मेरुसो, सिव सरजाको बैन ॥ "**

या नंतर तीन चार दिवसांची कथा. महंमदखान बंगषाची छावणी होती; तेथला प्रसंग !

छावणींतील दरबाराचे डेऱ्यांत खासा महंमद, नूरखान, मानसिंह, गाड्यांचा दरोगा, दिवाण व तीन चार हिंदूमुसुलमान अधिकारी बसले होते. खलबत चालूं होतें.

म — दिवाणजी ! दिल्लीहून वझीरसाहेबां कडून आपण मागें पाठविलेल्या खलित्याचें उत्तर यावयास अजून अवकाश आहे नाहीं ?

दि -- होय, हुजूर !

म -- बरें, राजपुतान्यांतील, आपल्या कामाचें काय झालें ?

दि -- तिकडे पाठविलेली मंडळी अजून आली नाहीं. तथापि, मला भरंवसा वाटतो कीं, तिकडे कांहीं तरी काम होईल !

म -- मला हि तसें वाटतें. महाराज सवाई जयसिंह यांनीं पातशाही विरुद्ध चळवळ चालविली आहे; त्यांनीं महाराज छत्रसालांना आंतून मदत करून, दक्खन मध्यें मराठ्यांशीं संगनमत केलें आहे; मराठे आणि रजपूत एक होऊन दिल्लीची पातशाही बुडवावी असा त्यांचा बेत आहे वगैरे हकीकती इकडे पसरल्या आहेत. या वार्ता आपल्या हि कानां वर मागें च आल्या आहेत; आणि आपण त्या वर उपाय हि चालविला आहे. पण माझा अजून या बनावा वर पुरा इतबार बसत नाहीं. हा एका व्हावयाचा नाहीं आणि झाला तरी कायम टिकणार नाहीं असा माझा तर्क आहे. हिंदूंत आमच्या सारखी इत्तेफाकी नाहीं म्हणून तर आमचें राज्य चाललें आहे ! पांच शें सहा शें वर्षे आमचे गुलाम असलेले रजपूत आमचे विरुद्ध उठतील ही कल्पना मला अशक्य दिसते. मराठ्यांची गोष्ट थोडी निराळी आहे ! त्यांनीं तीन पुस्त ( पिढ्या ) आजादी भोगली आहे ! ही त्यांना लागलेली चटक सहसां ते सोडणार नाहींत. पण ते आहेत पहाडांतील चुव्वे ! आमच्या सारख्या अर्बुज पठाणां पुढें त्यांचा काय पाड ? तथापि, तूर्त त्यांची पर्वा करण्याचें कारण नाहीं. कारण, ठरल्या प्रमाणें नबाब निजामुल्मुल्कांनीं त्यांना तिकडे कर्णाटकांत पायगोवा लावला आहे.

नू — तथापि, त्यांचे कडे अगदीं च दुर्लक्ष्य करून चालणार नाहीं. जयपूरकरांचा व त्यांचा संबंध बरा च जुळत चालला आहे.

म --होय ! ही आपली मंडळी राजपुतान्यांतून परत आली म्हणजे मग याबद्दल आपण पुन्हां बारकाईनें विचार करूं. दिवाणजी ! तूर्त पैशाची कांहीं तजवीज करा.

दि —त्याच फिकिरींत मी कधींचा आहें ! आपला खजिना कसा भरून काढावयाचा याची काळजी मला लागली आहे.

मान —तकसीर माफ ! खानसाहेब रागावणार नसल्यास मला एक सुचावावेसें वाटतें.

म— मानसिंह ! सुचवा, मीं रागावणार नाहीं !

मा —आपल्या अलाहाबाद सुभ्याच्या खजिन्यांतून तूर्त रक्कम आणवावी, सरकारी रक्कम आली म्हणजे आपली परत घ्यावी ! ( मनांत ) याला निर्धन करावयासाठीं हा एक बाण सोडीत आहे, पाहूं या ! तो कारागीर होतो कीं नाहीं.

म —तुमची सूचना गैर नाहीं. नाहीं का नूरखान ?

मानसिंहानें नूरखानास हळूंच खूण केली.

नू —गैर नाहीं ! आतां अडचणींत दिवस घालविण्यापेक्षां तूर्त ही गोष्ट करावी. सरकारी खजिना लवकरच येईल.

म —सध्यां तरी दुसरा उपाय नाहीं. पण मला आश्चर्य वाटतें कीं, दिल्लीस आम्हीं मुजरद जोडी पाठविली असतां व सर्व अडचणी कळविल्या असतां आणि वजीरसाहेब तेथें प्रत्यक्ष असतां, टांकोटाक मदत व पैसा कां येऊं नये ?

नू —( स्वगत ) थोडीशी बिरबली करूं ! ( प्रकट ) मला वाटतें आपल्या विरुद्ध पक्षानें हजरतांचे कान भरले असतील ! त्यामुळें वझीरसाहेबांचे हि चाललें नसेल. अलाहाबादची सुभेदारी आपल्यास मिळाल्या मुळें, माजी सुभेदारानें आपल्यावर डूक धरला आहे ! ( मानसिंहास खूण करतो )

मा —नूरखानांचा तर्क खरा दिसतो. अलाहाबाद सुभ्याची व बुंदेलखंडाची सरहद्द चिकटून असल्यानें मला एक शंका आली आहे कीं, त्या

माजी सुभेदारानें च बहुधां महाराज छत्रसालांना चिथावून दिलें असेल! त्या दोघांचे संबंध मैत्रीचे होते!

म —तसेंही असेल! पण प्रत्यक्ष पातशाही विरुद्ध तो असा जाईल?

दि —खानसाहेब! राजकारणांत, किंबहुना स्वार्थ साधण्यासाठीं अशा गोष्टी हलक्या मनाच्या माणसांकडून सर्वत्र घडतात! त्याला पातशाही झाली म्हणून अपवाद कशी होईल?

म —जाऊं द्या या गोष्टी. मानसिंहाची सूचना मला मान्य आहे! दिवाणजी ती अंमलांत आणण्यासाठीं इलाहाबादेस कारभाऱ्यास तसें पत्र लिहा आणि वझीरसाहेबांना हि हें कळवून "लवकर खजिना पाठविणें" म्हणून स्वतंत्र पत्र लिहा; असो. ही एक काळजी तूर्त तरी रहित झाली. रजपूत राजे जरी आपल्यास प्रत्यक्ष मिळाले नाहींत, तरी निदान विरुद्ध जाणार नाहींत असें वाटतें. ( गर्वानें ) माझा पराक्रम त्यांना माहीत आहे. वेळ आली म्हणजे मी या सर्वांना भरडून काढण्यास सोडणार नाहीं! पण सध्यां दमानें घेतलें पाहिजे! एक दोन राजे निदान पांच सात ठाकूर तरी आपल्यास सामील झाल्यास पुष्कळ काम होईल!

इतक्यांत एक हेर खलबतखान्यांत आला व त्यानें आदब बजावून मानसिंगा कडे पाहिलें. मानसिंग त्याचे बरोबर बाहेर गेला व थोड्या वेळानें परत आला.

मा— खानसाहेब! मोठ्या आनंदाची बातमी! अहाहा! माषाल्ला! असें होईल याची स्वप्नांत सुद्धां कल्पना होणार नाहीं!

म— कसली बातमी?

मा— खरोखर जगांत अशक्य गोष्टी केव्हां केव्हां घडून येतात म्हणतात ना? तसें हें झालें आहे! ( आनंदानें टाळी वाजवितो )

म— अरे! पण बातमी तर सांग.

मा— आपण आतां म्हणाला नाहीं कीं, "निदान पांच सात रजपूत ठाकूर तरी आपल्यास सामील व्हावेत" म्हणून?

नू – बरें मग, त्याचें काय? कोणीं एकादा ठाकूर सामील होणार आहे काय?

मा – होणार काय? झाला आहे! आणि नुसता ठाकूर च काय घेऊन

बसतां ? अनेक ठाकुरांचा अधिपति आहे ना हा ?

**म** – मानसिंह ! काय म्हणतां ? ( हर्षानें ) तुमची बातमी आनंदाची दिसते पण स्पष्ट सांगा ना ?

**मा** – स्पष्ट काय सांगूं ? ( स्वगत ) जितकी लांबवितां येईल तितकी उत्कंठतेची तार लांबविली पाहिजे ! ( प्रकट ) अहो, दिवाणजी ! आतां तुम्हीं म्हणालां तशी च ही गोष्ट घडली आहे. स्वार्थ व राजकारण ! अहो ! पण तुम्हीं पातशाहीचें उदाहरण दिलें ना ? पण आपल्या पातशाहींत असलीं उदाहरणें असलीं तर फार च क्वचित् आहेत ! पण या राजपुतांत असल्या उदाहरणांचा तुटवडा कधीं च पडणार नाहीं !

**गा० दरोगा** – तुमच्या म्हणण्यावरून कोणीं तरी रजपूत सरदार आपल्यास मिळण्यास तयार आहेसें दिसतें.

**मा** – अहो ! तो सरदार नाहीं, सरदारांचा सरदार आहे !

**म** – ऐ, मानसिंह ! स्पष्ट सांग म्हणतों ना ? नुसती लांबण कां लावली आहेस ?

**मा** – ऐका तर खानसाहेब ! महाराज छत्रसालांचे महाराज–कुमार हिरदेसाजी हे पिताजींशीं भांडून आपल्या कडे आश्रया साठीं आले आहेत !

तेथें वीज पडती तरी जितका धक्का बसला नसता तितका आश्चर्याचा धक्का, तेथें असलेल्या प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणास बसला आणि दर एकाचे तोंडून निरनिराळे आश्चर्याचे उद्गार बाहेर पडले !

मात्र नूरखानाचा चेहरा खाडकन् उतरला ! काळवंडलेल्या मुद्रेनें त्यानें मानसिंगाकडे पाहिलें ! पाहिलें मात्र, पुनरपि त्याचा चेहरा पहिल्या सारखा शांत झाला, नव्हे जास्त प्रफुल्लित झाला ! मग त्या दोघांत कांहीं नेत्रपल्लवी झाली कीं काय कोण जाणें !

आश्चर्याच्या गोंधळाला महंमदखानानें तोंड फोडलें.

**म**— आँ ! ऐसा कैसा होगा ? ये कैसा बन सकता है ?

**दि**— अहो, खुफियादरोगेजी ! ते महाराजकुमार नसून दुसरे कोणी असतील !

**गा० दरोगा**— मानसिंहजी ! तुमची नजरचूक तर झाली नाहीं ?

**नू**— खोटी गोष्ट ! असें कधीं तरी होईल ?

मा— मीं प्रथम सांगितलें कीं आपल्या सर्वांना हें खोटें वाटेल म्हणून ! पण एकादे वेळीं कल्पनेस हि कल्पना करवणार नाहीं असे कल्पनाअगम्य प्रसंग घडतात ना ?

नू— खानसाहेब ! मला वाटते मानसिंहाची बातमी खरी असल्यास—

मा— अहो ! खरी म्हणजे ? मी महाराजकुमारांना ओळखतों ! भलत्याला च महाराजकुमार बनवीन काय ?

नू— बरें, तसें कां होईना ! खानसाहेब ! आपल्या कडे आलेला गृहस्थ महाराजकुमार असेल असें आपण मानून चालूं ! पण हें जर खरें असेल, तर त्यांत मला कांहीं तरी दगा असावा असें वाटतें !

म— ( बेपर्वाईनें ) तुमचें म्हणणें मला पटत नाहीं. यांत दग्याचें काय काम ? बापलेकांचें पटत नसल्याचें हें कांहीं जगांतलें पहिलेंच उदाहरण नाहीं ! आपल्या जहांपन्हांच्या पूर्वजांत हीं उदाहरणें पुष्कळ आहेत ! तसें च असल्या वेळीं मुलानें शत्रूपक्षास मिळाल्याचें दाखलेहि आपल्या आठवणींत राहातील इतके प्रसिद्ध आहेत, आणि असले प्रकार या काफीर लोकांत फार आहेत ! त्यांच्या या कृत्यामुळें तर मुस्लिमांचा चांद आणि हिरवें निशाण दिल्लीच्या वास्तू वर आज सहाशें सातशें वर्षें फडकत आहे !

नू— पण, राजा बिरबल, अकबर पातशहांना सांगत असत म्हणे कीं, ही दिल्लीची वास्तुदेवता रुधिरप्रिय आहे म्हणून !

मा— अशी दंतकथा आज सातशें वर्षें चालूं आहे ! त्यांत काय अर्थ ? महाराज पृथ्वीराजांच्या किल्ल्या जवळची श्रीयोगमाया तुम्हांस माहीत आहे ना ? कंसाच्या हातून निसटलेली ती ही च योगमाया ! सध्यां हिचें मंदिर कुतुबमिनारा जवळ आहे; तो मिनार म्हणजे पृथ्वीराजांनींच बांधलेला कीर्तिस्तंभ. त्या आवारांतच प्राचीन विष्णुमंदिर होतें आणि तेथें च हें मंदीर होतें ! पण मुसुलमान पातशहांनीं देऊळ पाडलें मशीद बांधली आणि देवीस बाहेर काढून दिले ! काय केलें त्या देवीनें ? ही च तर ती रुधिरप्रिय वास्तुदेवता आहे ? काय तिनें पराक्रम गाजविला ?

म— बरोबर आहे तुमचें म्हणणें मानसिंह ! अहो ! या काफिरांच्या देवता आहेत दगडांच्या ! त्यांच्यांत देवत्व आणावयाचें काम आहे त्याच्या भक्तांचें; पण आजचे हे भक्त बनले आहेत भेकड ! मग ते दगडी देव काय करणार ?

( जोरानें व गर्वानें ) शहांजहां पातशहानें पुराणी देहली मोडून आजची नई देहली वसविली आहे आणि तिचें नांव शहाजहांबाद ठेविलें आहे ! काय त्या योगमायेची शहामत आहे कीं, ती, आमची नई देहली, आमच्या रक्ताच्या चिखलांत तुडवून देईल म्हणून ! !

नू—– ( मनांत ) थोडे दिवस दम धर म्हणजे योगमायेचा प्रताप दिसेल ! ( प्रकट ) जाऊं द्या सरदार साहेब ! तो वाद आपल्याला काय करावयाचा आहे ? माझें म्हणणें एवढेंच कीं, यात कांहीं दगा नाहींना ?

म — ( गर्वानें ) नूरखान ! तुम्ही फार शंकेखोर आहां ! यांत दगा नाहीं ! आणि असला तरी त्यांत सांपडून नाश होण्या इतके आम्हीं बेअकली आहों काय ?

नू – —–( स्वगत ) तें दिसेल पुढें ! ( प्रकट ) तसें माझें म्हणणें नाहीं ! परंतु सावधपणें वागलें पाहिजे इतकी च माझी सूचना आहे. बाकी बापा विरुद्ध बेटा भांडण करून पातशाहीस सामिल झाल्याचीं उदाहरणें या रजपुतांत थोडीं नाहींत. मिर्झा राजांना, प्रत्यक्ष आपल्या पित्याला, राजकुमार कीर्तिसिंहानें राज्यलोभा साठीं जहर दिलें च कीं नाहीं ?

दि—– खानसाहेब ! नूरखानांची सूचना विचार करण्या सारखी आहे !

म— ( बेफिकीरीनें ) अवश्य विचार करूं. पण आतां राजकुमारांची भेट घेण्यास काय हरकत आहे ? त्यांचें काय म्हणणें आहे तें ऐकूं व मग त्यांचेशीं कोणतें धोरण ठेवावयाचें तें ठरवूं ! मी त्यांना सामोरां जातों ! तुम्हीं, ते येथें आल्या नंतर शहाजाद्या प्रमाणें त्यांना मान द्या ! त्यांना आपल्या जाळ्यांत गुरफटून टाकण्यास या गोष्टी प्रथम केल्या पाहिजेत ! नाहीं का नूरखान ?

नू—– अलबत्ता, खानसाहेब ! ( स्वगत ) कोण कोणाच्या जाळ्यांत गुंतेल तें आपोआप च पुढें दिसेल !

मग महंदखान व मानसिंह उठून शामियान्याच्या बाहेर गेले. थोडया वेळानें मानसिंह, महंमद, राजकुमार हिरदेसा व त्यांचा एक रजपूत सरदार अशी मंडळी शामियान्यांत आली. त्यांना पाहून ती सर्व मंडळी उठली. त्यांना खडी ताजीम देण्यांत आली. राजकुमारांना सर्वांनीं तीन वेळां तस्लीम बजाविली. कुमारानींहि उलट सलाम केला !

म— ( आदबीनें गादी कडे हात करून ) महाराजकुमारांनीं मेहेरबानी करून येथें बसण्याची तकलीफ घ्यावी !

हि— आपण हि येथेंच बसा, सरदारसाहेब !

म— नको ! माफ करा ! मी गादी जवळ बसतों !

हि— नहीं, नहीं, ऐसा नहीं हो सकता ! ( महंमदाचा हात धरून ओढून त्याला गादी जवळ आणून ) आपण दोघें हि येथें बसूं !

म— जशी महाराजकुमारांची मर्जी व हुकूम !

दोघे हि गादीवर बसले. पुन्हां सर्व मंडळींनीं तीनदां कुर्निसात केली व कुमारांनीं खूण केल्यावर मग ते सर्व आपाआपल्या जागीं बसले.

म— आमचें नशीब बडें थोर ! महाराजकुमारांनीं इकडे येण्याची तसदी कां घेतली ?

रजपूत सरदार— खानसाहेब ! महाराजांचें व महाराजकुमारांचें भांडण होऊन, कुमारसाहेब पांचशें स्वारा सह इकडे आले आहेत ! पातशाही दरबाराचा आश्रय मिळविण्याची हुजुरांची इच्छा आहे !! ही खटपट आपण करावी अशी त्यांची आपल्यास विनंती आहे !

म— ( हर्षानें ) अवश्य ! अवश्य ! मीं जरूर खटपट करीन ! आणि जहांपन्हा सुद्धां महाराजकुमारांना मोठ्या खुषीनें आश्रय देतील !

तेवढ्यांत नूरखानानें हिरदेसांना कांहीं खूण केली.

नू – तकसीर माफ ! पण पितापुत्रांचें हें भांडण काय झालें, तें समजण्याची आम्हां सर्वांची इच्छा आहे ? महाराजकुमारांनीं ती पुरविल्यास मोठी मेहेरबानी होईल !

हि – सरदार महंमदखान ! तें तुम्हांस समजावयास पाहिजे हें खरें आहे ! ... पण ... ( रागानें ) पण माझा अपमान मी स्वतःचें तोंडानें सांगूं ? ... पिता झाला म्हणून काय झालें ? ... ( रागाचा अधिक आविर्भाव आणून ) बरोबरीच्या मुलाचा अपमान ? ... आणि जगतचा ... त्या मूर्खाचा सल्ला ऐकून ... जगत त्यांचा लाडका ... आणि मी ? ... मी कोणींच नाहीं ... ( गादीवर तळहात हापटून ) माझा सल्ला ... फायद्याचा सल्ला झिडकारला ? ... शहानशहांचा अपमान ? ... ( मिशीवर पीळ देऊन ) बरें आहे ... ( रागानें थरथर कांपतात ) अच्छा है देख लेंगे !

हा भलता च प्रकार पाहून सर्वजण — मानसिंह, नूरखान व रजपूत सरदार यांखेरीज — दिङ्मूढ बनले !

नू — ( कुमाराच्या सरदारास ) सरदारसाहेब ! महाराज कुमारसाहेब फार रागावले आहेत त्यामुळें त्यांना ही हकीकत सांगण्याचे श्रम देणें वाजवी नाहीं ! मेहेरबानी करून आपण च ती सांगा [ डोळ्यानें खुणावतो ].

म — होय ! मला हि तसें वाटतें. महाराजकुमार ! आपण जरा दिल शांत करा ! आपल्या मना प्रमाणें सर्व होईल ! बिलकूल काळजी करूं नये.

सर — माझी कांहीं हरकत नाहीं. पण आम्ही नुकती च लांबची मजल मारून आलों आहों, तेव्हां महाराजकुमारांना थोडीशी विश्रांति मिळाली तर बरें ! दुसरें ( सर्व मंडळी कडे पाहून ) तो प्रसंग बराच नाजूक असल्यानें षट्कर्णी होतां उपयोगी नाहीं !

म — होय, सरदारसाहेब ! आपलें म्हणणें रास्त आहे ! दिवाणजी ! महाराजकुमारांचा सर्व इंतजाम ताबडतोब लावा. माझा तो दुसरा मोठा तंबू ते सांगतील तेथें त्यांना लावून द्या. त्यांच्या बेहड्याचा गोट त्या तंबूपाशीं लावा. ते हुकूम फर्मावितील त्यांची बराबर तामिली करा ! भोजन व विश्रांति झाल्या वर आज नाहीं तर उद्यां किंवा परवां मग आपण बोलूं ! महाराजकुमार ! हें आपल्यांस मंजूर आहे ना ?

हि — ठीक ! कांहीं हरकत नाहीं. परवां च आपण बोलूं. तों पर्यंत माझा चित्तक्षोभ हि शांत होईल !

म — आपल्या मर्जीबाहेर आम्ही नाहीं. दिवाणजी ! शहाजाद्याच्या मिसलेच्या जो दाखला आहे त्या प्रमाणें महाराजकुमारांची व त्यांच्या बेहड्याची आणि अटाळ्याची व्यवस्था राहिली पाहिजे ! समजलांत ? कसूर झाल्यास ठपका देण्यांत येईल !

हि — जी, हां ! हुजूर ! हुकुमाची तामिली बरोबर करण्यांत येईल.

---

# उपक्रम ! [ पाकळी तिसरी ]

महंमद बंगषच्या छावणी जवळ एक लहान नदी वहात होती. तिच्या कांठीं दोन मुसुलमान शिपाई बसले होते. ते नदी वर आल्या नंतर प्रथम त्यांनीं हातपाय, दाढी, तोंड धुतलें; दाढी आणि डोक्याचे केस विंचरले आणि मग गुडगुडी पेटवून ती आळीपाळीनें ओढीत बसले. थोडा वेळ झाल्या वर एकानें आपल्या कुल्लाटोपींतून एक डबी काढली व तींतील अफूची गोळी घेऊन तो तिची नागीण करीत बसला. दुसऱ्यानें आपल्या अंगरख्याच्या आंतल्या खिशांतून एक कुपी काढली व तिच्यांतील पेयाचा एक एक घोट तो पीत बसला. ते दोघे म्हणजे रणदुल्ला व सरजा होते हें काय सांगावयास पाहिजे ? थोड्या वेळानें त्यांच्या तोंडांचीं कुलुपें उघडलीं !

स – सध्यां आपली चंगळ आहे, दोस्त ! खावें, प्यावें व सरदार काईमखानाच्या डेऱ्यावर पहारा करावा ! मजा आहे !

र – होय मजा आहे खरी ! दिवसां तूं व रात्रीं मी ! बाकी आपल्या दोघांना हि रात्र काय व दिवस काय दोन्ही सारखें च आहे म्हणा !

स – म्हणजे ? म्हणणें काय तुझें ? अरे ! रात्र ती रात्र आणि दिवस तो दिवस ! दोन्हीं सारखीं होतील कशीं ? अरे ! सिंह व माणूस कधीं एक होतील ? मी सिंह आहें आणि तूं जरी रणांतील पति असला तरी अखेर

माणूस च! माझ्या एका चापटीचा नाहींस तूं! मतलब क्या? जैसे तुम और हम जुदे जुदे, वैसे हि दिन और शंबा (रात्र) जुदे जुदे हैं! बेवकूब! वे एक कैसे हो सकते हैं?

र – अबे, नादान! तुला भाषणांतल्या खुब्या कशा असतात तें माहीत आहे? बाकी, तूं पशु, जानवर! नाहीं जानवरांचा शहा! मायने जानवरकों अक्कल नहीं रहती, तो जानवरोंके शहाको कैसी रहेगी? अबे! माझ्या भाषणांत खुबी होती! ती तुला काय समजणार?

स – कसली आली खुबी? खुबी आहे त्या तुझ्या काळ्या परींत! तिला मिठी मारण्या पूर्वींच तुझ्या वर तिचा अंमल झालेला दिसतो!

र – अरे, उल्लूके बच्चे! तें च तर मी तुला सांगणार होतों. तूं शराब पिऊन दिवसाची रात्र करतोस!

स – आणि तूं त्या काळ्या मादवान (घोडी) वर बसून व रात्रीला दिवस बनवून बसल्या जागीं घोडदौड करतोस, हें च कीं नाहीं?

र — हें च! हें च! पण ही माझ्या भाषणांतील खुबी तुझ्या लक्ष्यांत केव्हां आली माहित आहे? अं? अरे! या माझ्या काळ्या परी कडे तूं नजर फिरविलीस तेव्हां! ऐ, गव्हार! या परीशीं मैत्री केली कीं आदमी मर्द बनता है! सुनो, मेरे दिलवर! कबीर साहेब, ये इष्कबाजीका बयान कैसे करते हैं–

**"ऐ दिल! तूं राहे (या गोळीच्या) इशकमें मरदानाः हो, मरदानाः हो। (इच्या साठीं) कुर्बान कर आपनी जानको, जानाना (प्राण देणारा) हो, जानाना हो॥**

हा गजल म्हणून व हळूं च अफीणीची गोळी तोंडांत सोडून रणदुल्ला टाळ्या वाजवीत बसला.

स — वा बे वाः! अरे धुल्ल्या! अरे सुवरके चचे! कबीरसाहेबांनीं तो गजल, तुझ्या या काळ्या परी साठीं बनविला नाहीं! अरे फत्तर! तो इर्फान साठीं बनविला आहे! इर्फान मायने खुदाकी पेहचान! तूं तर भल-त्याचा संबंध भलत्यास लावलास! शराब में अफीण डाल दी! कां रे! तुला शराबची माहिती तरी आहे? (कुपींतील थोडी दारु पितो)

र — तुला तरी अफिगीची पेहचान आहे? अरे कादरखान नांवाचे एक हिंदू कवि—

स — अरे अफिण्या ! कादरखान कधीं हिंदू असतो काय ?

र — अरे हिंदू नाहीं तर मुसुलमान, तो आदमी तर होता ? तुझ्या सारखा जानवर नव्हता ( पुन्हां डबींतील अफु घेऊन गोळी करतो ) हां ! तो कादरखान, शहांजहां बादशहाच्या नवरतनां पैकीं एक होता !

स — कां, रे ? इतक्यांत चढली काय ? अरे गाढवा ! नवरतन, हे अकबर पातशहाच्या वेळीं होते !

र — बरें, तर. अकबरशहाच्या वेळीं होते ! त्यांत माझ्या बापाचें काय जातें आणि तुझ्याहि बापाचे काय दाम खर्च होतात ? त्यांना पोसणारा कोणीं एक पातशहा होता झालें ! त्या अकबरशहाची मा नूरजहान—

स — अरे, गव्हार ! नूरजहान ही अकबरशहाची बहु होती, मा नाहीं !

र — ( गोळी तोंडांत सोडतो ) अरे, हो रे, बाबा ! मा नसेल तर बहु असेल, पण पुरुष तर नव्हती ! अंः ! स्त्री होती; झालें तर. तिला होता अफिणीचा कंटाळा. तिनें त्या कादरमियास ताजमहलांत बोलावून आणलें !

स — ऐ, अफिण्या ! पुरे कर तुझी बडबड. ( कुपींतील थोडी दारु पितो ) तुझी खोपडी अफिणीनें भरून गेली आहे. तिच्यांत तुझी सर्व अक्कल गुम झाली आहे. शहाजहांच्या वेळचा ताजमहाल अकबराच्या वेळीं कसा आला ?

र — ( आणखी एक गोळी तयार करतो ) काय कटकट आहे तुझी ? तुझे काय चार गंडे खर्च होतात अकबराच्या वेळीं ताजमहाल बांधला तर ? तो कांहीं तुझ्या शगत्रेनें वाहून जाणार नाहीं ! मूळ मुद्दा सोडून चिल्हर गोष्टींत च तुझें डोकें फार वाहतें ! ( गोळी, तोंडांत सोडतो ) ताजमहल नाहीं तर नाहीं, शालिमर बागेंत, नाहीं तर कोठें तरी बोलावून आणिलें आणि त्याला अफिणी पासून होणाऱ्या नुकसानी बद्दल काव्य करण्यास हुकूम फर्मावला. मग त्यानें मल्हार रागांत काव्य रचलें. तें तुला सुनावतों ऐक !

स—कशास सुनावतोस ? त्याच्या उलट कृति मी समक्ष पाहतों आहे ना ? ( थोडी दारु पितो )

र— कशास सुनावतोस म्हणजे ? मला तूं बंदी करतोस ? मग तर मीं तुला सुनावणार च. ऐक—

( राग भैरवी )

**" मैं तू का मनशा अक्ल है लाजम है तुझको कादरी । चढा कर अफीण बखुदी मस्ताना हो, मस्ताना हो ॥ "**

असें म्हणून त्यानें पुन्हां गोळी चढवली !

स— अरे ! हा गजल अफिणीच्या विरुद्ध आहे कां, सर्व अक्कल एकीकडे सोडून खूप अफीण चढवून मस्त हो, म्हणून सांगणारा आहे ? बाकी तूं मस्त झाला च आहेस म्हणा ! ( पुन्हां दारू पितो व झिंगतो )

र— आणि तूं काय कमी झिंगला आहेस ? आज आपल्याला खानसाहेबांनीं सुट्टी दिली म्हणून आपल्या दोघांना हा प्रसंग साजरा करण्यास मिळाला ! मात्र ( सुस्कारा सोडून ) एक कमतरता आहे !

स— कोणती रे ?

र— अरे ! ( नाकास हात लावून ) हें !

स —कां रे ! तुला त्या दिवशीं नुजुमी फकीरानें सांगितलें होतें ना, कीं, तुझी ती परी तुला मिळेल म्हणून ? मग त्याचें काय झालें ?

र— माझा त्या फकिरा वर विश्वास आहे ! त्यानें मला बढतीचें भविष्य सांगितलें होतें ना ? मग मला खानसाहेबांनीं नाईक बनविलें च कीं नाहीं ? कांहीं दिवसांनीं जमादार होईन ! तसें च ती परी, ती... नूरजहान हि मला मिळेल. केव्हां तरी ती येईल माझ्या कडे !

हे दोघे बसले होते, त्या जागे जवळ एक लहानशी बाग होती. बागेस कुंपण वगैरे नव्हतें. तेथल्या फुलझाडां वर फुलें उमललीं होतीं. त्या बाजूनें आतां एक गाण्याची लकेर ऐकू आली ! ती प्रथम सरजाच्या कानीं पडली. त्यानें उठून त्या बाजूस पाहिलें. प्रथम त्याला कांहीं दिसलें नाहीं. पुन्हां लकेर ऐकूं आली. तेव्हां त्यानें इकडे तिकडे हिंडून गाणाऱ्या व्यक्तीस हुडकून काढलें. ती व्यक्ति त्याला दिसली; मात्र त्या व्यक्तीला हा दिसला नाहीं. तिला पाहून सरजास फार आनंद झाला ! तो धांवत धांवत रणदुल्ल्या कडे आला व त्यानें त्याला जवळ जवळ ओढीत च तिकडे नेलें. ते दोघे एका मोठ्या झुडपाच्या आड उभे राहिले. तेथून रणदुल्ल्यानें जेव्हां गाणारण्या व्यक्तीस पाहिलें तेव्हां तर तो आनंदानें बेहोष होऊन नाचूं लागला. त्याच्या तोंडून आनंदाचे उद्गार मोठ्यानें बाहेर पडणार होते, पण सरजानें त्याच्या तोंडा वर हात ठेवून ते दाबले ! तथापि तो नाचूं लागला ! गाणें चालूं होतें—

( राग कालिंगडा )

**" प्यारी ! इक मालिन पौर तिहारी ॥ ध्रु० ॥**

**रंग सांवरा वा मालिनको, नीलमणिन अनुहारी । ठाडी है वृष-भानु पौरपै, पूछत नाम दुलारी ॥१॥ बेंदी भाल, नयन बिच काजर, बेसरकी छबी न्यारी । चलत चाल,चपला ज्यों चमकत, झूमत झूम घटारी ॥२॥ "**

रणदुल्ला तर पुढें पुढें गाण्याच्या ताला वर नाचूं लागला ! शेवटीं सरजाला आलिंगन देऊन–

**र**— अरे ! दोस्ता ! बघ नुजुम्याची नुजुमी खरी झाली ! अरे ! ज्योतिषशास्त्र खोटें नाहीं ! माझी रास आहे मिथुन ! तेव्हां मला माझी परी भेटलीच पाहिजे ! खेकड्या राशीच्या तुला त्याचें काय होय ? ( अडखळत ) तुझी...सरजीण... बसली असेल...तिकडे......

**स**— ( अडखळतो ) माझ्या सरजीणीशीं...तुझा काय ताल्लुक ?...तिचें नांव तूं कोण काढणार ? ...मी कांहीं तिला......अजून......तल्लक दिली नाहीं.........

**र**— तसें नव्हे रे ! तुझ्या शेंबड्या सर्जीणीशीं मला काय करावयाचें ?...ही बघ... हीच माझी...ती नूरजहान......

**स**— खरें आहे भाई ! त्या नावेंतील...ही तुझी नूरजहान......मग हो पुढें...भेट तिला...पण कां रे... तुझी रास का फास काय...मिठ्ठू कां मिठ्ठा ढेकूण ! ...पागल ! तिच्या परडींतील फुलां कडे च...पाहूं नकोस... तिच्या कमरबंदांत...त्या दिवशीं तुझ्या वर रोंखलेला...तो बघ.

**र**— अरे, जा ! ...तुला त्याची भीति...मी काय डरपोक...पण, थांब...मी सरदाराच्या कुळांत जन्मलों...आमचा मूळ पुरुष बाबर शहा खिलजीच्या वेळीं सरदार होता...

**स**— गाढव आहेस ! त्या वेळची सरदारी आज काय...तूं तर खांद्या वर बंदूक...पहारेकरी...

**र**— ( मोठ्या ऐटीनें ) कुछ पर्वा नहीं उसकी...मी सरदार...तूं असें कर...आगे बढो...हमारे बेगमसाहेबाकों दर्याफ्ती करना...( छाती काढून ) सरदारसाहेब पीछेसे आ रहे हैं !

असें म्हणून त्यानें सरजास पुढें ढकललें, पण तेवढ्यांत सरजा मागें येण्यास धडपडूं लागला. त्या गडबडींत दोघे हि झुडुपाच्या पुढें आले व गाणाऱ्या व्यक्तीच्या दृष्टीस पडले! त्यांना पाहून प्रथम ती व्यक्ति दचकली! दोन चार पळें ती कसली तरी आठवण करीत होती. तिला कांहीं आठवलें. ती माणीक होती!! ती येथें कशी? पण—

मा— ( दरडावून ) तुम कौन हो!

रणदुल्ला चटकन् सरजाच्या मागें उभा राहिला व त्यानें त्याला पुढें ढकललें.

स— हम...स...सरदार......

र— हाँ, हाँ! ...मैं सरदार...

मा— गव्हार! इकडे कशाला आलां?

र— ( सर्जाच्या मागून अर्धवट पुढें येऊन ) मैं...मैं.. मैं...

मा— मेंढ्यासारखा म, में काय करतोस? ( जोरानें ) कोण तूं? तुझें नांव काय?

र— अबे, सर्जाखान! उनकों हमारा नाम और अलकाब याने किताबती बतला देना. ( पुन्हां सर्जाच्या पाठीशीं लपतो. )

स — ( रणदुल्लाचा हात धरून त्यास पुढें खेंचीत ) आप, सरदार बहादूर गाझीउद्दीन, बहादूरे मुल्क, जंगबहादूर, मलिक-उल्-मुल्क-इ-मुस्लिम रणदुल्ला खान! बेगमसाहेबा...आप...इनकी...ये आपके...

मा —(कमरपट्ट्यांतील खंजीर उपसून व जोरानें चार पावलें पुढें येऊन) क्यौं रे बंदर? कौन किसीकी बेगम?

सरजा चटकन् मागें झाला व त्यानें दुल्ल्यास पुढें ढकललें!

स— मेरी अम्मा...मैं भूल गया...शराबच्या नशेंत मी...बरळलों... अल्ला की कसम...

मा — (खंजीर उगारून, आणखी चार पावलें सरजा वर चालून जाऊन) थांब! तुझी शराबी नशा उतरवतें!

माणिकचा अविर्भाव पाहून सरजा पळून गेला!

मा — ( रणदुल्ल्यास ) कां, रे, कुत्ता! तूं कोण? [ खंजीर उगारते ]

र —[ हात जोडून ] मी...मी...रणदुल्ला...उज्जनीस आपली भेट...

तेव्हां पा...पा...पासून मी तुझे वर आ...आ...श...क...

मा — चूप ! एक शब्द काढशील तर तुझ्या पोटांत हा खंजीर...

माणीक पुढें आली तेव्हां दुल्लया चटकन् खालीं पडला व त्यानें तिचे पाय धरले !

र — मारूं नको...खंजिरानें मारूं नको...मला तुझ्या विरहानें मराव- याचें आहे...मला आतां मारशील तर मग तुझा विरह मला कसा जाणवेल?

असें म्हणत म्हणत तो हळूं च वर तिच्या कडे पहात होता; मनांतून त्याला भीति वाटत होती कीं, तिचा खंजीर आपल्या पाठींत घुसेल! पण तो घुसला नाहीं. माणीक विचार करीत होती. तिचे मनांत एक कल्पना आली होती. त्या प्रमाणें करावें कीं नाहीं याबद्दल तिचा विचार चालला होता. थोड्या वेळानें तिनें आपला निश्चय ठरविला.

मा — ( स्वगत ) असेंच केलें पाहिजे! दिसण्यांत तें थोडेसें गैर दिसेल पण देशासाठीं तेवढें सोंग केलें पाहिजे! ( प्रकट ) सरदार रणदुल्लासाहेब उठा! उठा!

रणदुल्ला भीत भीत उठला!

र — ( लटलट कांपत ) मला मारणार तर नाहींस?

मा — नाहीं, नाहीं! ( हंसत ) अहो! मी तुमची परीक्षा पाहिली... थट्टा केली...दिल्लगी केली!

र — ( नीट उभा राहून ) अहो! ही कसली जान घेण्याची दिल्लगी!

मा — सरदारसाहेब! तो मेला सरजा येथें होता ना?...मग त्याचे देखत मीं आपलें मन कसें मोकळें करूं? त्याला पळवून लावण्या साठीं तें नाटक केलें आणि तो गेल्या वर तुमचा विरह तापून त्याला चांगला कढ यावा म्हणून ही दिल्लगी केली!

र — मग खरेंच तूं माझ्या वर आषक आहेस?

मा — ( खालीं पाहून ) नाहीं तर काय? ... तुमच्या बद्दल मी किती झुरतें आहें ... तुम्ही उज्जनीहून इकडे आल्या पासून रोज तुमची याद करीत असतें ... पण तुम्हांस त्याचें काय?

र — ( हर्षानें ) मग माझी बेगम होशील? माझा जान थंडा करशील?

मा — हो! तुमचा जान चांगला थंडा करीन! तुमचा हा ताबूत थंडा करीन! पण त्याला थोडा अवकाश आहे. ही मोहीम संपली पाहिजे.

र — ( आनंदानें टाळी वाजवितो ) वा, रे मेरी जान ! ... पण तूं येथें कशी आलीस ? अस्मानांतून कां जमिनींतून वर आलीस ?

मा — महाराजकुमार हिरदेसाजी येथें आले आहेत ना ? त्यांच्या दिमतींत मी आल्यें. येथें आल्या वर तुमचा शोध केला, तेव्हां तुम्ही काईमखानाच्या पहारेकऱ्यांचे नाईक बनलां असून त्यांच्या अगदीं विश्वासांतले झालां आहां, असें समजलें ! खरें आहे कां ?

र — खरें म्हणजे बिलकूल सच ! ( ऐटीनें ) अग, कोणती हि मसलत मला सांगितल्या शिवाय, छोटे खानसाहेब, रहात च नाहींत !

मा — मला नाहीं हें खरें वाटत ! तुम्ही कांहीं तरी थापा मारतां !

र — ( स्वगत ) आतां कसें करावें ? हिची खात्री करून देऊं. ( प्रकट ) थापा नाहींत. तुझी खात्री केली म्हणजे झालें कीं नाहीं ? तसा प्रसंग येऊं दे म्हणजे मग तुला समजेल मीं खरें सांगतों कां खोटें ? बरें, तुझी भेट कोठें होत जाईल ?

मा — महाराजकुमारांच्या गोटांत, त्यांच्या शामियान्या जवळच्या पिंवळ्या राहुटींत.

र — छान ! मी तेथें येत जाईन. पण मला विसरूं नकोस हं. आणखी एक विनंति ऐक. मी जवळ आलों म्हणजे तो तुझा खंजीर दुसरी कडे ठेऊन देत जा !

मा — ( हंसून ) तुम्ही तर माझे आवडते स्वातंत्र्यवीर रणदुल्लाहखान आहां, आणि खंजीराला भितां ?

र — ( छाती काढून ) हट् ! कोणी सांगितलें तुला कीं हा बहाद्दरेमुल्क खंजिरास भितो म्हणून ? मेरी लैला ! माझे डोळे थोडे दुखरे आहेत; त्यांना खंजिराची चमक सहन होत नाहीं ! मगर तेरी आंखोंकी चमकसे हम बहोत ठंडे होते हैं !

नंतर माणीक, हातांत फुलांनीं भरलेली परडी घेऊन महाराजकुमारांच्या गोटा कडे गेली व आपली गुडगुडी घेऊन आणि जामानिमा सांवरून बहाद्दरे-मुल्क ( राष्ट्रवीर ) रणदुल्लाखान, काईमखानाच्या गोटा कडे गेले !

या बनावास चार पांच दिवस होऊन गेले.

महमंदखान आपल्या खलबतखान्यांत बसला होता. त्याचे शिवाय राज-

कुमार हिरदेसा, काईमखान, दिवाण, नूरखान व मानसिंह ही मंडळी हि तेथें होती.

नू — महाराजकुमार ! आज आपणां पितापुत्रांचें भांडण सांगण्यास कांहीं हरकत नाहीं ना ?

म — काल रात्रीं त्यांनीं मला तें सांगितलें. मी च तुम्हां सर्वांना सांगतों; त्यांना त्रास देऊं नका.

नू — तसें कां होईना !

म — नूरखान ! त्याचें असें झालें : " दिल्लीच्या पातशाही विरुद्ध गदर माजवूं नये, " अशी यांची पहिल्यापासून इच्छा. " पातशाहीनें आपल्यास मांडलिक राज्य दिलें आहे, तर त्यांत समाधान मानून असावें. पुढें पातशाहीचा कल पाहून राज्य वाढविण्याची विनंति करावी. पातशाही सैन्य जिकडे मुलुखगिरीस जाईल तिकडे आपलें सैन्य त्याच्या मदतीस पाठवावें. पातशाही येथें केवळ आपल्या कल्याणा साठीं स्थापन झाली ! तिच्या पूर्वी हिंदू लोक आपापसांत डोकेफोडी करीत होते ! " या प्रमाणें यांचें म्हणणें. ही यांची पहिले पासून प्रामाणिक समजूत. तिला अनुसरून यांनीं आपल्या वडिलांना या गदरा पासून परावृत्त करण्याचा योग्य सल्ला दिला; पण त्यांनीं मानला नाहीं ! उलट यांचा धाकटा भाऊ कुमार जगतराज, त्याचा सल्ला महाराजांनीं ऐकला. जगतराजांचें म्हणणें असें होतें कीं, " बुंदेलखंडास आजादी मिळविली पाहिजे ! पातशाहीचा संबंध तोडला पाहिजे ! पूर्ण स्वातंत्र्य मिळविलें पाहिजे आणि त्या साठीं या जुलमी पातशाही बरोबर लढून तिचा पराभव केला पाहिजे ! " हें म्हणणें महाराजांना पटलें आणि दरबाऱ्यांनीं हि या म्हणण्यास पूर्ण संमति दिली ! तथापि, हें सर्व म्हणणें महाराजकुमारांनीं खोडून काढलें ! पण त्या मुळें पिता–पुत्रांचें कडाक्याचें भांडण झालें. इतकें कीं, महाराजांनीं यांचा गादीचा वारसा उडवून टाकला आणि उलट कुमार जगतराज यांना टिका लावला ! त्या मुळें यांना फार राग आला ! नाहीं तरी असा अपमान कोणता वीरपुरुष सहन करील ?

नू — कोणीं करणार नाहीं !

म — म्हणून हे आपल्या बेहडयाचे पांचशें स्वार घेऊन तेथून जे तडक निघाले, ते आपल्या कडे येऊन दाखल झाले ! यांची इच्छा—

हि — आतां खानसाहेबांनीं सांगितलें तें अक्षरशः खरें आहे ! पिताजींना म्हातारचळ लागला आहे ! त्यांनीं खरें म्हटलें तर आतां राजकारण सोडून द्यावें आणि स्वस्थ काशीवास करावा ! राजकारणाचीं सूत्रें आम्हां तरुणांच्या हातीं द्यावीं ! पण तसें ते करीत नाहींत ! त्यांना अधिकाराचा मद चढला आहे ! ते हुक्मतपन्हा बनले आहेत ! शहाण्यांचा सल्ला मानण्यास तयार नाहींत ! दरबारांत माझ्या विचाराचीं कांहीं—फारच थोडीं-माणसें निघालीं ! पण त्यांनीं, त्यांना शिस्तीच्या नांवाखालीं दरबार बंद केला ! अंः ! काय म्हणे, " सर्व दरबार एक विचारानें भारलेला पाहिजे ! मला दरबाराची शुद्धि करावयाची आहे ! मला संख्याधिक्य नको गुणाधिक्य पाहिजे ! पुष्कळ ढोंगी अनुयायां पेक्षां, तत्त्वनिष्ठ अगदीं मोजके अनुयायी मला पुरतील ! माणसें श्रद्धावान् पाहिजेत ! " या प्रमाणें त्यांचें म्हणणें ! माझ्या मतें त्यांना व्यवहार-ज्ञान कमी आहे ! त्यांना आपला च हट्ट चालवावयाचा असतो ! त्यांना वाटतें, " मी बुंदेलखडचा राजा ! मीं म्हणेन तेंच साऱ्या बुंदेल्यांचें मत ! त्यांच्या सर्वांच्या वतीनें निर्णय करण्याचा अखेरचा माझाच अधिकार ! इतरांना नाहीं. इतरांनीं माझ्या विरुद्ध ब्र हि काढतां उपयोगी नाहीं ! " पण आमच्या देशांत यांच्या मताच्या विरुद्ध असणारे व वागणारे कांहीं लोक आहेत ! आतां हे राजे च असल्यानें उघड उघड यांच्या विरुद्ध वागण्यास ही मंडळी भिते एवढें च ! पण, मला पातशाहीनें आश्रय दिल्यास मीं ही मंडळी पिताजींच्या विरुद्ध उठवून देईन ! त्यांनीं हिंदूमुसुलमानांची इत्तेफाकी केली आहे, ती मुसुलमानांना चिथावून मीं मोडून काढीन ! एकाद्या गव्हार मुसुलमानाचे तोंडून वदवीन कीं, " अर्धा बुंदेलखंड मुसुलमानांना तोडून द्या ! " आणि एकाद्या मूर्ख पण पोकळ गर्विष्ठ हिंदूच्या तोंडून वदवीन कीं, " सर्व बुंदेलखंड बुंदेल्यांचा आहे, हिंदूंचा आहे. मुसुलमानांच्या बापांचा नाहीं. त्यांना येथून पार हांकून द्या ! " अशीं या दोन जातींत कोंबडे—झुंज लावीन ! ज्या पातशाहीच्या मागें, आतां पर्यंत झालेल्या पातशहांचें पुण्य उभें आहे, तिच्या विरुद्ध बंडखोरी करणें म्हणजे काय ? मला हें पटत नाहीं ! पिताजींना त्या दक्खनच्या शिवाजीचें वेड लागलें आहे ! पण तो काळ आतां थोडा च आहे ? शिवाजीची नक्कल करून, आपला संपूर्ण नाश करून घेण्यापेक्षां, पातशाही देईल ती चतकोर नितकोर भाकरी

खाऊन, सांगेल ती नोकरी बजावण्यांत आपलें कल्याण आहे,असा माझा पूर्ण भरवंसा आहे! आणि ही माझी इच्छा पूर्ण करण्यासाठीं, मी, खानसाहेबां कडे आलों आहे!

**काईम**— होय! हें च महाराजकुमारांनीं, पातशाहीची कसम खाऊन काल बाबांना सांगितलें! बाबांनीं त्यांना आश्वासन दिलें कीं, "दिल्ली दरबारास ही सर्व हकीकत कळवून, आपली गादी आपल्यास मिळेल, अशी खटपट मीं करीन! तों पर्यंत आपण येथें सुखानें रहा!"

**म**— बरोबर आहे! असें मीं काल महाराजकुमारांना आश्वासन दिलें! त्यांची खातरजमा केली! तुम्हां सर्वांना हें मान्य आहे ना?

**दि**— मान्य आहे. महाराजकुमारांची इच्छा पातशाहीची खिदमत बजावण्याची आहेच, तेव्हां आपल्या पांच शें स्वारांचा तसा उपयोग करण्यास त्यांची कांहीं हरकत नसेल च?

**हि**— मुळीं च नाहीं! उलट मीं स्वतः हि खानसाहेब ठरवितील ती कामगिरी पार पाडीन!

**म**— वाहवा! आम्हीं आपले उपकार विसरणार नाहीं! खरें कीं नाहीं नूरखान?

**नू**—खरें आहे! पण तकसीर माफ! मला एक सूचना करावीशी वाटते, पण—( स्वगत ) आतां, महाराजकुमारांनीं मला काल गुप्तपणें सांगितलेली व भाऊसाहेब आणि महाराज यांनीं ठरविलेली योजना पुढें मांडावी! ( हिरदेसांना खूण करतो )

**हि**— शंका ठेवूं नका! तुम्हांला काय सूचना मांडावयाची असेल ती मांडा! मनांत संशय ठेवूं नये. म्हटलें च आहे ना? —

**" न संशयमनारुह्य नरो भद्राणि पश्यति। संशयं पुनरारुह्य यदि जीवति पश्यति "॥**

**नू**— मला आपल्या बद्दल मुळींच शंका नाहीं! पण राजकारण फार चमत्कारिक असतें! तेथें विश्वास ही चीज फार सावधगिरीनें वापरावी लागते; वाटेल तशी ती उधळतां येत नाहीं! म्हणून म्हणतों—

**हि**— पण सांगा ना? माझा इतबार, तुम्हां सर्वांना येण्यास, तुम्हीं सांगाल ती कामगिरी मीं करीन. पातशाही तक्ताची शपथ घेतों,मग तर झालें?

म-- नूरखान ! माझा इतबार पूर्णपणें महाराजकुमारां वर बसला आहे ! तथापि, तुम्हांस काय सांगावयाचें असेल तें सांगा ! मनांत ठेवूं नका.

का-- नूरखान कांहीं तरी फायद्याची च गोष्ट सांगतील.

नू-- प्रत्यक्ष सांगण्या पूर्वीं एक उदाहरण घेऊन सांगतों, म्हणजे उमज पडेल ! असा च एक प्रसंग मागें अलमगीर पातशहांच्या वेळीं आला होता ! दक्खनचा राजा शिवाजी याचा शहाजादा संभाजी हा वडिलां वर रागावून, शाही सैन्यांत आश्रयार्थ आला होता ! तेव्हां पातशहानें त्याची परीक्षा ज्या मार्गानें घेतली, तोच मार्ग महाराजकुमारांनीं गिरवावा, अशी माझी त्यांना विनंति आहे !

हि-- कोणता तो मार्ग

नू-- पातशहांनीं त्या शहाजाद्यास कळविलें कीं, "तुम्ही आमच्या कडे वडिलां वर रुसून आलां खरें, पण यांत दगा कशा वरून नसेल ? तरी आमची खातरजमा करण्यास, तुम्हीं स्वतः तुमच्या राज्यांतील किल्ले आम्हांस घेऊन द्या ! तुमचे दिमतीस आमचें सैन्य देतों." हें शहाचें म्हणणें मंजूर करून, संभाजीनें आपल्या रियासतींतील बरेचसे किल्ले पातशहास घेऊन दिले; आणि ते हि थोडक्या वेळांत व सैन्याची फारशी खराबी न करतां ! कारण, ज्या ज्या किल्ल्याच्या वेशी पाशीं, संभाजी आपलें सैन्य घेऊन जाऊन उभा राही, तेथला किल्लेदार, आपल्या खाविंदाच्या मुला वर, आपल्या शाहजाद्या वर, गोळा टाकण्यास कचरे व आपण होऊन किल्ला त्याच्या सुपुर्द करी ! म्हणून म्हणतो कीं, हा मार्ग महाराजकुमारांनीं गिरविला तर पातशाहीस त्यांचा इतबार येईल व पुढें त्यांची इज्जत दरबारांत वाढून, पातशाही त्यांना त्यांची गादी आपल्या मदतीनें मिळवून देईल ! तिकडे, आपले किल्ले एका मागून एक पातशाहीच्या ताब्यांत गेल्याचें पाहून म्हातारे राजाजी हि अखेर दरबारास शरण तरी येतील, नाहीं तर कुमारांच्या म्हणण्या प्रमाणें काशीस जाऊन खुदाचें नांव जपत बसतील !

म-- ( आनंदानें ) नूरखान ! तुमचें म्हणणें राजकारणी दाखल्याचें आहे ! चांगलें आहे, मुत्सद्दीपणाचें आहे. महाराजकुमारांनीं असें केल्यास फार उत्तम होईल. दरबार त्यांचे वर तावडतोब खुष होईल. आला हजरत तर बहोत रजावंद होतील. माझ्या स्वप्नांत हि ही कल्पना आली नाहीं. या साठीं वृद्ध

मंडळी सल्लागार मंडळींत असावी लागते. बेटा! काईम, हें लक्ष्यांत ठेव. ( हिरदेसां कडे वळून ) महाराजकुमार! आपल्यास हा सल्ला मंजूर आहे काय? ...तसा माझा आग्रह नाहीं...तथापि......

महाराजकुमारांनीं हें ऐकलें. ऐकून त्यांना जगूं काय मोठें संकट वाटलें! वाटणें साहजिक च होतें! ही असली कांहीं घोरपड आपल्या गळ्यांत नूरखान अडकवील अशी त्यांना कल्पना नव्हती! महंमद या सूचनेस विरोध कसा करील? बोलून चालून पातशाही फायद्याची ही गोष्ट आहे! पण आपण ही गोष्ट कशी करावयाची? आपल्या हातांनीं आपले किल्ले शत्रूच्या हातीं द्यावयाचे! आपण वडिलां वर रागावून इकडे आलों, पातशाहीस मिळालों, पण तें केवळ पातशाहीच्या हातून आपला फायदा करून घेण्या साठीं! या योजनेनें आपला फायदा न होतां उलट पातशाहीचा होत आहे, इत्यादि विचार जणूं काय त्यांच्या मनांत धुमाकूळ घालीत होते व त्या प्रमाणें दुःख, विषाद, राग, हताशपणा इत्यादि विकार त्यांच्या तोंडा वर उमटत होते; सर्व मंडळी त्यांच्या या प्रमाणें क्षणोक्षणीं पालटणाऱ्या चेहऱ्या कडे पहात होती! कोणीं बोलावें हें कोणास सुचेना! अखेरीस महाराजकुमार च म्हणाले—

हि—खानसाहेब! नूरखानाचा सल्ला म्हणजे माझी परीक्षा पाहण्याचा आहे! ...माझ्या हातानें माझें राज्य पातशाहाचें हातीं देण्या सारखें आहे... असें वागल्यानें, सर्व बुंदेलखंड पातशाहींत विरून जाईल...यांत मला काय फायदा...पुढें तरी पातशाही माझें राज्य मला देईल कीं नाहीं?... कां आतां स्वतःचें काम करून घेऊन पुढें माझ्या तोंडास पानें पुशील?... अशी शंका मी घेतों म्हणून रागावूं नका...पण शंकेस स्थान आहे कीं नाहीं?

म—आपली शंका वाजवी नाहीं असें कोण म्हणेल? आपण या शंका घेतल्याबद्दल मला राग नाहीं, पण...

नू—मी आपल्या शंकेचा निरास करतों! पातशाहीस मदत करण्याची शपथ आपण आतां च घेतली आहे ना?

हि—होय वांटल्यास आणखी घेतों!

नू—तिची जरूरी नाहीं. तशी च, हें काम पुरें झाल्या वर, "आपलें राज्य आपल्यास परत देण्यास...आपण पातशाहींतील, साम्राज्यांतील इतर राजां प्रमाणें एक मांडलिक राजे म्हणून आपणांस कायम ठेवण्यास, मीं सर्व प्रकारें खटपट

करीन...किंबहुना तसा पातशाही खासदस्तूरचा फर्मान मीं आणून देईन" असें आश्वासन खानसाहेबांनीं द्यावें, नव्हे कसम खावी, म्हणजे झालें ! काय खानसाहेब ?

**दि** —यांत मला कांहीं वावगें दिसत नाहीं. ही सरळ गोष्ट आहे. खान-साहेब याला नामंजूर होणार नाहींत.

**म** —( स्वगत ) कशाला नामंजूर होईन ? असल्या किती शपथा मीं घेतल्या आहेत आणि मोडल्या आहेत ? आमच्या पातशाहीचा हा प्राचीन धारा च आहे. शब्दांची किंमत ठेवून कां कोठें साम्राज्यें वाढीस लागतात. हिरदेसा कडून पुढील कामें करवून घेण्यासाठीं आतां हें शपथचें नाटक केलें पाहिजे ! या काफीरांना दिलेलें वचन पुढें ठोकरीनें उडवून देऊं ! ( प्रकट ) मंजूर । मंजूर ! महाराजकुमार ! नूरखानांनीं सांगितलेली योजना मला पूर्ण पसंत आहे. आपली खातरजमा करण्या साठीं मी आत बुदाची कसम खातों कीं, असला शाही खासदस्तुरी फर्मान, मी आपणांस थोडया दिवसांत आणवून देववितों !

**नू** —झालें तर. फर्मान आल्या नंतर मग, महाराजकुमारांनीं या किल्ले घेण्याच्या योजनेस वाटल्यास सुरुवात करावी ! आधीं नको. आतां तर झालें ? आतां तर आपल्यास शंका घेण्यास कांहीं स्थान नाहीं ना कुमारसाहेब ?

**हि** —( आनंदानें ) अहो ! इतकें आश्वासन मिळाल्या वर मग मनांत शंका च राहील कशाला ? आपल्या सर्वांच्या म्हणण्या प्रमाणें वागण्यास मी तयार आहें.

**म** —दिवाणजी ! या एकंदर मजकुराचा, जहांपन्हांच्या नांवाचा एक खलिता तयार करा. तसेंच एक खाजगी पत्र वझीरसाहेबांच्या नांवें तयार करा. त्यांत ही सर्व हकीकत लिहून "ही योजना वांटेल ती खटपट करून आला हजरतां कडून पार पाडावी" म्हणून मुद्दाम लिहा. पत्रें लिहून झालीं कीं माझ्या कडे आणा, मीं मोर्तब करीन मानसिंह ! ही डांक ताबडतोब दिल्लीस पोहोंचविण्या साठीं मुजरद जोडी तयार ठेवा ! आजचा दिवस मोठा आनंदाचा आहे. महाराजकुमार ! आपण बुंदेलखंडाचे राजे झाल्याचें मला आतां च डोळ्यां पुढें दिसत आहे ! बारक अल्ला ! मैं आपका शुक्रगुजार करता हुं !

# मंत्र–स्फोट ! [ पाकळी चौथी ]

**तेषां हि प्रमादमदसुप्तप्रलापकामादिरुत्सेकः ।**
**प्रच्छन्नोऽवमतो वा मंत्रं भिनत्ति ॥**

" निष्काळजीपणा, दारु–अफू इत्यादींचा अंमल, झोपेंत वोसणणें, इष्क-बाजी व इतर वाईट छंद यांनीं गुप्त मसलती फुटतात; गूढ हेतु धरून जवळ वावरणारी ( शत्रूचा हेर किंवा फितुरी ) किंवा अपमानित झालेली व्यक्ति हि मसलत फोडण्यास कारणीभूत होत्ये ? "— भगवान कौटिल्य.

मागील पाकळींत सांगितलेला प्रसंग घडून पुष्कळ दिवस लोटले होते ! त्यांत सांगितलेल्या मसलतीस प्रारंभ करण्या पूर्वीं एकदां मानसिंह गुप्तरणें महाराज छत्रसालां कडे, कुमार हिरदेसांचा कसला तरी निरोप घेऊन गेला होता. महाराजांनीं आपल्या किल्ल्यां पैकीं साधारण चार पांच किल्ल्यांतील किल्लेदारांना बोलावून घेऊन त्यांच्याशीं कसली तरी वाटाघाट केली होती. प्रथम त्या किल्लेदारांची समजूत पटेना; पण महाराजांनीं त्यांना कायसेसें सांगितलें व शेवटीं त्यांची समजूत पटली ! ते आपापल्या किल्ल्यां वर परत गेले. त्या नंतर एक तरुण कुबडीवाला रामदासी, महाराजकुमारांना भेटून गेला !

इतक्या गोष्टी घडल्या, पण महंमदखानास त्याची दाद हि नव्हती ! आणि ती कशी असणार ? बढाईखोर, शब्दशूर माणसाची दृष्टि चालूं प्रसंगा कडे फारशी नसते; ती आत्मप्रशंसेनें अंध झालेली असते ! त्या दृष्टीला फक्त " मी मी, हें

चि कळे ? — परंतु, न कळे कोंठील मी कोण मी ? " आणि मोडकळीस आलेलें साम्राज्य हि आत्मस्तुतींत फुरंगटलेलें असतें ! असल्या साम्राज्या वर एकाद्या शत्रूनें चढाइ केल्यास, तींत या पातशाहीची हवेलंडी उडून जाते; पण लढाईत सदोदीत आपला च जय झाल्याच्या वार्ता पसरविण्यांत मात्र ही शाही तरबेज़ असते ! तथापि, तिचे प्रजानन काय समजावयाचें तें समजतात च ! आणि सर्वांत गंमत ही कीं, आपले प्रजाजन आपल्या बातम्यांना खोटें मानून हंसतात, आपली थट्टा करतात हें हि या मदांध पातशाहीस समजत नाहीं ! " **न लोके दीप्यते मूर्खः केवलात्मप्रशंसया ।** ". जी गत या पातशाहीरूपी समष्टीची, ती च तींतील कापुरुष अधिकारी व्यष्टींची !

महंमद बंगष ही असली व्यक्ति होती ! मूळचा तो शूर व मुत्सद्दि होता; पण सध्यां तो वयस्क झाल्यानें आणि दिल्लीच्या क्रियाशून्य शाही दरबारांत त्यानें बरे च दिवस बसून घालविल्यामुळें त्याच्या शौर्या वर व चाणाक्षपणा वर आळशीपणाची धूळ सांचली आणि उलट बढाईखोरपणाची बेगडी, तकलुपी जिल्हई चकाकूं लागली ! म्हणून च, जेव्हां महाराजकुमार, त्याच्या कडे आले, तेव्हां त्यानें त्यांच्या येण्याची फारशी चिकित्सा न करतां त्यांना जवळ केलें ! त्यांत हि नूरखानानें कुमारांची परीक्षा पाहण्या साठीं जी कल्पना सुचविली तिनें तो जास्त निष्काळजी बनला ! तथापि, तो अगदींच अंधळा झाला नव्हता; पण प्रसंग निघून गेल्या नंतर डोळस होऊन काय उपयोग ? हे परस्पर विरुद्ध प्रसंग कसे घडले ते मागें सांगण्यांत आले आहेत व पुढें हि यथावकाश सांगण्यांत येतील.

रामदासीपुरुष, कुमारांना भेटून गेल्यानंतर चारपांच दिवसांनीं कुमारांनीं, किल्ले काबीज करण्याची गोष्ट खाना जवळ काढली ! आपल्या पांचशें स्वारांच्या जोडीला पांच हजार शाही स्वार घेऊन व बराचसा दारुगोळा आणि होत्या त्या पैकीं हलक्या तोफा घेऊन कुमारांनीं जाण्याचें ठरलें ! त्या प्रमाणें दुसरे दिवशीं या आपल्या सेने सह कुमार किल्ले काबीज करण्यास निघाले. त्यांचे बरोबर खानानें आपल्या खात्रीचा एक दुय्यम सेनापति दिला पण तो शूर असला तरी बुद्धियोगांत ढ होता ! कुमारांनीं छावणी सोडल्या वर दोन तीन दिवसांनीं आपल्या एका किल्लया जवळ येऊन त्यास वेढा घातला आणि किल्लेदारास भेटीस बोलाविलें. तो आल्या वर त्याला गड आपल्या हवालीं कर-

ण्यास सांगितलें पण तो ऐकेना. दुय्यम सेनापतीनें हि त्याला सांगितलें तरी हि त्याच्या मना वर परिणाम झाला नाहीं! उलट त्यानें कुमारांना बागी बनल्या बद्दल ठपका दिला! त्याला परत जाऊं देण्यांत आलें! किल्ल्या वर हल्ला करण्यांत आला! किल्लेदारानें हि शाही सैन्या वर तोफा डागल्या! इतक्यांत खासे महाराजकुमार घोडा दौडीत गडाच्या वेशी समोर येऊन थडकले! आतां? आतां त्यांचे वर कोण गोळी सोडणार किंवा बाण सोडणार? प्रत्यक्ष मालकाच्या—राजाच्या—मुला वर, भावी मालका—राजा—वर कोण हात उगारणार? किल्लेदार वेशीच्या सफेली वर उभा राहून हें सर्व पहात होता! काय करील बिचारा? त्यानें आपल्या शिपायास, कुमारा वर गोळी घालण्यास पुष्कळदां हुकूम सोडले, पण ऐकतो कोण? इकडे कुमारांनीं तटास शिडी लावण्यास आपल्या सैनिकांस आज्ञा केला. त्या प्रमाणें सैनिकांनीं शिड्या लावून ते तटा वर चढले. कांहींनीं किल्लेदारास कैद केलें व बाकीच्यांनीं सफेली वरून खालीं उतरून वेस उघडली! या गडबडींत दहा पांच लोक इकडचे व तिकडचे पडले पण कुमार व त्यांचें सैन्य गडांत घुसले! किल्ला हातीं आला! किल्लेदाराला कुमारांपुढें आणण्यांत आलें; त्यांनीं त्याला कडेलोटाची शिक्षा फर्माविली! परंतु त्या दुय्यम सेनापतीनें मध्यस्थी करून—तो शूर होता, त्याला गडकऱ्याचा कांहीं दोष दिसेना—गडकऱ्याला बडतर्फीची शिक्षा देवविली! त्याचा लष्करी मान काढून घेऊन त्यास हांकलून देण्यांत आलें! मृत्यूपेक्षां ही अपमानाची शिक्षा जास्त कठोर नव्हे काय?

मग त्या किल्ल्याचा सर्वस्वीं ताबा कुमारांनीं घेतला. तेथील शिबंदीनें शाही दरबाराशीं एकनिष्ठ राहण्याचें कबूल केलें. कुमारांनी तेथें शाही सैन्या पैकीं कांहीं सैन्य, कांहीं दारुगोळा व कांहीं तोफा ठेवल्या; आपला एक खात्रीचा सरदारहि गडकऱ्याचा अधिकार देऊन तेथें ठेवला व मग ते तेथून निघून दुसऱ्या एका गडा जवळ आले!

या गडकऱ्यास मागची सर्व हकीकत समजली होती! कड्याचा तळ पाहण्याची त्याची इच्छा नव्हती! त्यानें निरोप येतांच गडाच्या किल्ल्या घेऊन कुमारांची भेट घेऊन किल्ल्या त्यांच्या स्वाधीन केल्या! विना आयास गड हातीं आला! गडकऱ्याच्या शहाणपणामुळें कुमारांनीं पुन्हां त्याला च गडकरी नेमलें! तसेंच मागील प्रमाणें या हि गडावर शाही शिपाई, दारुगोळा,

तोफा ठेवण्यांत आल्या !

या प्रमाणें आणखी तीन गड जिंकले गेले. एकूण पांच गड कुमारांनीं घेतले ! ते पहाडी असून त्यांवर जाण्यायेण्यास एका—आणि तो हि विकट—रस्त्या शिवाय दुसरा रस्ता नव्हता ! भोंवतालीं गर्द झाडी ! आसपास चार पांच कोसांत गांव नाहीं ! पण किल्ले तर घेतले ! त्यांत दोन किल्ले नामांकित होते. एक जैतपूरचा हनुमान गड व दुसरा वाघवनांतील चंदनगड. जैतपूरच्या हनुमान गडांत, महाराज छत्रसालांचा, वर्षांतील कांहीं दिवस मुक्काम करण्याचा रिवाज होता; त्यामुळें त्याला दुय्यम राजधानीचें स्वरूप आलें होतें. त्याच्या घेऱ्यांत जैतपूर नांवाची एक वाडी होती. हा किल्ला बेलाग होता. चंदनगडचा विस्तार फार च फार होता, इतका कीं तेवढा प्रचंड किल्ला साऱ्या बुंदेलखंडांत तर नव्हता च पण उत्तर हिंदुस्थानांत असल्यास क्वचित् असेल ! त्याच्या आंत व माची वर मिळून पंचवीस तीस हजार फौज सहज राहूं शकली असती ! यावरून त्याच्या विस्तीर्णतेची कल्पना येईल !

हें काम आटोपून कुमार, परत महंमदाचे छावणींत आले. खानानें त्यांना कोसभर सामोरें जाऊन त्यांचा फार सन्मान केला ! दुसरे दिवशीं त्यांना मोठी जाफत दिली; आणि एकंदर हकीकतीचें पत्र पातशहास पाठविलें. मात्र त्यांत त्यानें आपल्या बहादुरीचें वर्णन केलें होतें ! महाराज छत्रसालांच्या दुय्यम राजधानीचा गड घेतल्यानें खानास खरोखर आनंद झाला ! तेथें केव्हां जाऊं असें त्याला झालें ! वेळ पाहून त्यानें ती गोष्ट कुमारापाशीं काढली. त्यांनीं दुसरे च दिवशीं जाण्याची तयारी दर्शविली. त्या मुळें कुमारां वर त्याचा फार विश्वास बसला, आणि कां नाहीं बसणार ? बुंदेल्यांचे पांच मजबूत किल्ले पांच दहा शाही शिपायी खर्ची घालून हातांत आले ते कुमारा मुळेंच कीं नाहीं ?

कांहीं दिवसांनीं खानानें छावणी हालविली व दोन तीन दिवसांनी सर्व मंडळी हनुमानगडांत येऊन दाखल झाली ! या मंडळींत तो तरुण रामदासी नुक्तांच परत येऊन मिळाला होता.

त्या नंतरचा उजाडता दिवस ! खान, कुमार, नूरखान व दिवाण हे किल्ला पाहण्यास निघाले. सर्व किल्ला पाहून मग ते तटावर चढले. सगळा तट व तटा वरून दिसणारा आसपासचा मुलूख पाहून ते खालीं उतरून सदरे वर

आले. मग वाड्याच्या खलबतखान्यांत मंडळी येऊन बसली.

म — महाराजकुमार ! आपले पातशाही वर फार उपकार झाले ! मागें आपल्या नवाजीशीचा खलिता आला च होता !

हि — पातशहाची मोठी मेहेरबानी !

म — हा आपला थोरपणा ! वास्तविक आपण पातशाहीचीं किती अमोलिक कामगिरी केली आहे ? त्या वेळीं ठरल्याप्रमाणें मी दरबारास अर्ज पाठवतां काय व तो मंजूर केल्या बद्दल शाही पंज्याची खास सनद तत्काळ येते काय ? हा योगायोगच नाहीं तर काय ? आला हजरतांनीं त्यावेळीं आपल्यास बुंदेलखंडाचे राजे नेमून त्या बद्दलची पंच हजारीची खिलाफत हि पाठविली होती. हें पातशहांचें केवढें औदार्य, खरें कीं नाहीं, नूरखान ?

नू — होय, खानसाहेब ! आणि खिलत मिळाल्या बरोबर ताबडतोब महाराजकुमारांनीं, नव्हे राजेसाहेबांनीं हि आपलें वचन पाळलें ! त्यांनीं स्वतःच्या रियासतींतील उत्तम असे चार पांच किल्ले, रक्त1ाता खेरीज शाही दरबारास मिळवून दिले !

दि — बाकीच्या किल्ल्या बद्दल मीं बोलत नाहीं. ते उत्तम असतील च म्हणा, पण हा हनुमानगढ मात्र खराच उत्तम आहे. हा अत्यंत बेलाग व बळकट आहे. येथें असलेला दाणागोटा हि भरपूर आहे ! राजेसाहेबांनीं आपल्याला मिळवून दिलेला खजिना सुद्धां आपल्याला कांहीं दिवस पुरेल !

म — राजेसाहेब! दिवाणजी ! नूरखान! आज पुन्हां दरबारी खलिता आला आहे. राजेसाहेबांनीं गड घेतल्याच्या हकीकतीचें पत्र मीं दरबारास धाडलें होतें त्याला उत्तर म्हणून हा खलिता आहे. त्यांतील एक आनंदाची बातमी मी आतां पर्यंत फोडली नाहीं ! ती ऐकून तुम्हां सर्वांना आनंद होईल ! तसें च राजेसाहेबांनीं दरबारच्या केलेल्या अमोलिक सेवेचें बक्षिस, दरबारनें कुचराई न करितां कसें तत्काळ दिलें आहे, त्याबद्दल आपणा सर्वांची खात्री पटेल !

नू — अशी ती कोणती बातमी ?

म — ऐका, तर ! ( कुमारां कडे वळून ) " राजाबहादूर ! हिरदेसा महाराज ! हफ्तहजारी ! उम्देतुल्मुल्क ! आलिजा बहाद्दर ! आपको मेरा सलाम है ! " ( सलाम करतो ) समजलें तुम्हां सर्वांना आतां ? कोणती आनंदाची बातमी आहे ती ?

नू — ( आनंदानें ) म्हणजे राजेसाहेबांची बढती होऊन ते पंचहजारीचे हफ्त ( सात ) हजारी झाले काय ?

म — होय ! होय ! हफ्त हजारी ! काय समजलांत ? या मोंगली पातशाहीचा नियम आहे कीं, ही हफ्त हजारीची मनसब फक्त शहाजाद्यांना च मिळते, इतरांना नाहीं ! असें असून ती राजेसाहेबांना मिळाली ! केवढा हा मान ?

दि — फार मोठा मान ! आणि उम्देतुल्मुल्क व आलिजा बहादूर हे किताब हि वरती मिळाले ! वाहवा !

हि — ( स्वगत ) हें सर्व दिल्लीस असलेल्या पंतकाकाजींचें कारस्थान ! या मूर्खांना काय माहीत ? ( प्रकट ) ( आनंद झाल्याचें दर्शवून ) आला हजरत पातशहा दीर्घायु होवोत ! मीं काम तें काय केलें आणि त्या बद्दल ही एवढी मेहेरबानी ? कामाच्या दसपट बक्षिसी देण्याचें औदार्य व सामर्थ्य फक्त या दिल्लीच्या पातशाहींत च आहे ! आणि असल्या पातशाही विरुद्ध पिताजी गदर करतात ? खरं च ! म्हातारपणा मुळें त्यांच्या बुद्धीला भ्रम झाला आहे ! म्हणून ते नेहमीं हिमालया एवढ्या चुका करतात !

म — बाकी आतां त्याच्या हातून पातशाहीचें कांहीं वांकडें होणार नाहीं. कारण, आपण त्यांच्या बचावाचीं बहुतेक बेलाग ठाणीं काबूत आणल्या मुळें, ते दऱ्याखोऱ्यांत व जंगलांत लपूनछपून फिरत असल्याचें मानसिंहा कडून कळतें !

नू — खानसाहेबांचें म्हणणें खरें आहे. विषारी दांत उपटल्या वर नाग झाला म्हणून काय करणार ? बसतील कोठें तरी भजनपूजन करीत !

म — तसें च होवो ! मात्र त्यांच्या पासलें सर्व सैन्य मोडून काढलें पाहिजे ! आतां त्यांची फौज किती असेल ?

नू — मानसिंगाच्या हेरां कडून कळतें कीं, ती सारी चार पांच हजारांच्या आंतबाहेर आहे !

हि — अंः ! तिची भीति बाळगण्याचें मुळीं च कारण नाहीं ! कारण, ती सर्व तेल्यातांबोळ्यांची, अशिक्षितांची म्हणजे लंगडीपांगळी आहे ! बुद्धिमान वर्ग त्यांना मिळालेला नाहीं ! श्रद्धाळु आंधळ्यांची ती फौज ! वेळ आली म्हणजे आपण तिचा हां हां म्हणतां मोड करूं ! तसें च आपण

काळजी न करण्याचें दुसरें हि एक महत्वाचें कारण आहे !

म — तें कोणतें ?

हि — पिताजींनीं राजपूत रजवाड्यां कडे प्रेष लावला होता ना ?

म — होय ! आणि आपण हि तोडीस तोड म्हणून उलटा शह लावला होता !

हि — तें च तें. आपला शह चांगला बसला आणि पिताजींची खटपट फुकट गेली ! कोणीं हि राजा, ठाकूर, फार काय एकादा सरदार हि त्यांना सामिल होण्यास तयार नाहीं ! अहो ! होणार कसा ? पातशाहीचा दरारा काय त्यांना ठाऊक नाहीं ? कोणता शहाणा असलें राजद्रोही काम करील ? कुराणेशरीफच्या आठव्या सुरत मध्यें म्हटलें नाहीं का कीं, " राजद्रोह्यांना अल्ला भयंकर शिक्षा करतो " म्हणून.

म — ( आनंदानें ) ही बातमी खरी आहे ?

हि — खरी आहे ! अगदीं खरी आहे. मीं राजपुतान्यांत ठिकठिकाणीं आपले हेर पेरून ठेविले होते. त्यांच्या कडून ही बातमी तीन चार दिवसांत आली, पण माझी खात्री पटे पर्यंत मी ती आपल्यांस सांगितली नाहीं. ती खात्री थोड्या वेळा पूर्वी पटली !

म — पण राजे साहेब ! महाराजा सवाई जयसिंगांची काय बातमी आहे ? ते महाराज छत्रसालांना आंतून अनुकूल आहेत असा दरबाराला संशय आहे, तसेंच आपण त्यांना पत्र पाठविलें असतां त्यांनीं स्पष्ट कांहीं न कळवितां पाना वर पान ठेवून वेळ मारून नेली ! त्यांच्या पदरीं अनेक ठाकूर—सरदार असल्यानें जयसिंगजी जरी एकटे उठले तरी आम्हांला ते पुष्कळ दिवस त्रास देऊं शकतील !

हि — पण ते आतां त्रास देणार नाहींत.

नू — म्हणजे आपलें म्हणणें काय राजेसाहेब ?

हि — सवाई राजांचा असा पहिला मनोदय होता खरा ! खानसाहेब ! आपण च मला तो येथें आल्यावर सांगितला. ह्या नंतर विचार करून मीं आपला दिवाण तिकडे पाठविला व त्याचे बरोबर एक स्वदस्तूरचें पत्र पाठविलें. पत्रांत लिहिलें होतें कीं, " राजेसाहेबांनीं पिताजींना मदत करूं नये, त्यांत त्यांचा तोटा आहे. खवळलेली पातशाही जर जयपुरा वर घसरली तर

सर्व राज्याचा चुराडा होईल!" तोंडीं निरोप हि धाडला होता. त्याचा योग्य परिणाम होऊन राजाजींचें उत्तर आलें. त्यांत ते म्हणतातः— " आपण पिताजींना मिळत नाहीं. मागें तशी इच्छा धरली होती खरी, पण आतां खात्री पटली कीं, ती अदूरदृष्टि होती! तिच्या भरांत आपण खानसाहेबांच्या पत्रास धातुपोषणी उत्तर पाठविलें, या बद्दल आतां पश्चात्ताप होतो; तरी तुम्हीं – म्हणजे मीं – हा माझा मनाचा पालट त्यांना कळवा! व वेळ आल्यास त्यांना च मदत देऊं असें सांगा!" असें स्वदस्तूरचें पत्र त्यांनीं माझ्या दिवाणा पाशीं दिलें. दिवाण आज आले. सारांश, आतां आपल्याला सवाई राजांची भीति बाळगण्याची जरूरी नाहीं. ( कमरबंदांतून थैली काढतात. ) खानसाहेब! आपण हें पत्र च वाचून पाहा म्हणजे खरें खोटें समजेल!

महंमदानें थैली घेऊन, तिच्यांतील पत्र काढलें व तें समग्र वाचलें! देव जाणें तें पत्र सवाई राजांच्या खास दस्तूरचें होतें कीं नाहीं तें? महंमदाला तरी राजाजींचें हस्ताक्षर कधीं पहावयास मिळालें होतें?

म — ( आनंदानें ) राजासाहेब! आपलें म्हणणें सत्य आहे. खुदानें खैर केली कीं, मी मोठ्या आफतींतून वांचलों!

नू — ( हर्षानें ) खरें च राजाजी तसें म्हणतात?

म — खरें तर काय? ( पत्र देऊन ) तुम्हीं व दिवाणजी हें पत्र च वाचा म्हणजे झालें.

नूरखान व दिवाण या दोघांनीं मिळून तें पत्र वाचलें. दोघांच्या तोंडून उद्गार निघाले कीं, " शुक्र अल्ला! खरें आहे!"

म — राजासाहेब! आपण पातशाहीची फार मोठी खिदमत केली आहे. मी हें सर्व वर्तमान दरबारास कळवितों. माझ्या पेक्षां सुद्धां आपण हें काम उत्तम प्रकारें पार पाडलें आहे. माझा खलिता दरबारांत गेला कीं, मला वाटतें आला हजरत आणखीं आपली मनसब वाढवितील! कदाचित एखादा सुभा हि देतील!

हि— तो त्यांची इच्छा! पण बक्षिसाच्या आशेनें मी या गोष्टी केल्या नाहींत. पातशाहीची खिदमत विना अट करावयाची एवढी च इच्छा! आतां दुसरी एक आपल्याला विनंति करावयाची आहे! ती सुद्धां पातशाहीचें कल्याण व्हावें या सद्धेतूनें च करणार आहे! गढवाल कडील पहाडी मुलुखांत

म्हणे बंडाळी माजली आहे? ही बातमी खरी आहे काय?

**म**— होय! गढवाल, कुमाऊं, मोरंग, श्रीनगर ( हें काश्मिरांतील नसून, गढवाल कडे निराळें आहे ) वगैरे त्या मुलुखांत धुंदी माजली आहे खरी. तिकडील रजवाड्यांनीं गदर उठविलें आहे; आणि त्या मुळेंच दिल्लीहून आपल्यास फौजेची कुमक आली नाहीं! वजीरसाहेबांच्या ज्या पत्रांत हा मजकूर होता, तें मीं आपणां सर्वांना वाचून दाखविलें होतें. काल्च्या पत्रांत तर पंजाबांत, काबूल कडील स्वारी आल्याचा उल्लेख आहे.

**हि**— म्हणून च मी आतां विनंति करणार आहें. ती आपणांस पसंत पडेल अशी माझी खात्री आहे. कारण त्यामुळें दरबाराचें संकट टळणार आहे.

**म**— मग बोला. विनंति काय म्हणून? सल्ला म्हणा. आपण द्याल तो सल्ला बदसल्ला केव्हां हि नसणार!

**हि**— बरें सल्ला म्हणा! तो एवढा च कीं, सध्यां आपल्या पाशीं जी प्रचंड फौज आहे, तिचें आतां वास्तविक कांहीं काम उरलें नाहीं. याला पुढील प्रमाणें कारणें आहेत. पहिलें—बहुतेक बुंदेलखंड पातशाहींत सामिल झाला, पातशहानें मला त्याचें आधिपत्य दिलें व मला आपल्या खिदमतींत घेतलें. अर्थात् पूर्वीं सारखी बंडाळी या प्रांतांत या पुढें होणें अशक्य. दुसरें—पिताजी आतां दंतभग्न नागासारखे झाले आहेत. त्यांना दर्प नाहींसा झाला आहे. मूळचा च त्यांचा धार्मिक व सात्त्विक स्वभाव अशा प्रसंगीं उचल खाईल आणि राज्यत्याग करून ते एखाद्या क्षेत्रीं भजनपूजन करतील. त्यांच्या मनांत असे विचार येऊं लागल्याचे अलीकडच्या त्यांच्या बोलण्या वरून समजतें! कारण त्यांच्या गोटांत हि माझे हेर आहेत. तेव्हां पातशहांना, त्यांना माफी देण्याचा अर्ज करावा असें वाटतें. तें पुढें पाहूं. तिसरें—कोणी हि राजा, महाराजा फार काय किरकोळ ठाकूर सुद्धां पातशाही विरुद्ध त्यांना मदत करण्यास तयार नाहीं. चवथें—पुष्कळ काळ या प्रांतांत ही मोहिमेची रणखंदळ माजल्या मुळें मुलुख वैराण व बेचिराख झाला आहे त्यामुळें आपल्या जवळच्या या फौजेस रसदेची टंचाई भासत आहे, आणि शेवटचें पण महत्त्वाचें कारण म्हणजे आतां आपण सांगितलें तें, म्हणजे पंजाबांत काबूलची स्वारी येऊन थडकल्याचें! तेव्हां माझें म्हणणें असें कीं, आपल्या जवळ एवढी फौज ठेवण्याची आवश्यकता आतां उरली नाहीं! जास्तींत जास्त पांच हजार फौज ठेवून

बाकीची सर्व दिल्लीस पाठवावी म्हणजे दरबारास तिचा उपयोग होईल !

नू— राजेसाहेबांच्या म्हणण्यांत गैरवाजवी दिसत नाहीं. आपण तिकडे फौज परत पाठविली तर तिला पंजाबच्या कामगिरीवर पाठविण्यांत येईल व तें आलेलें संकट टळेल. कारण सध्यां दरबारा जवळ असलेल्या फौजे पैकीं बहुतेक फौज गढवालच्या पहाडी बंडखोरांचा पाडाव करण्यांत गुंतली आहे. येथें पांच हजार फौज पुरेशी आहे. वांटल्यास खानसाहेबांनीं जातीनें येथें हजर असलें म्हणजे झालें.

म— ( विचार करून ) राजासाहेब ! आपला सल्ला पोक्त आहे. तिकडे फौज पाठविण्यास हरकत नाहीं. तसें केल्यास वझीरसाहेबांना हि बरें वाटेल व आला हजरतांची माझ्या वर अधिक मेहेरबानी होईल. दिवाणजी ! सरनोबतास हुकूम सांगा कीं पांच हजार फौज येथें ठेवून बाकीच्या फौजे सह तुम्हीं व बेटा काईम येथून निघून दिल्लीस कूच करा ! बरें आहे, राजासाहेब ! आपल्या म्हणण्या प्रमाणें सर्व व्यवस्था करतों.

हि — आपकी मेहेरबानी ! बरें आहे, मी आतां जातों.

कुमार उठले व त्यांना मान देण्या साठीं खान हि उठला.

म —नूरखान ! तुम्हीं राजाजींना त्यांच्या महालांत नेऊन पोंहोंचवा ! दिवाणजी ! तुम्ही थोडे थांबा. दरबारास खलिता लिहावयाचा आहे तो आतां च लिहूं.

हिरदेसाजी व नूरखान, खानास सलाम करून निघून गेले. खानाचा गळा इतका वेळ बोलणें चालणें चालल्या मुळें सुकून गेला; कोरड पडली. मग तो ओला करावयास मदिरा नको का प्यावयास ? आणि ती हि त्या मदिराक्षीच्या हातून ? त्या दोघांचें दर्शन पांचसहा घटका होऊन गेल्या तरी खानाला झालें नाहीं ! त्या मुळें त्याचा जीव कासावीस झाला. त्यानें हुजऱ्याला सांगून मलिका जहानला बोलावून आणलें

म — प्यारी ! या दरबारी कामानें माझें डोकें भडकून गेलें आहे. थोडी शराब दे आणि थोडं गाणें हि म्हण !

मलिका, खाना जवळ बसली. तिनें दोन तीन प्याले शराब त्याला पाजली. मग तिनें आपल्या साजिंद्याना बोलावून आणलें. त्यांचीं वाद्यें लावून तयार झालीं. मलिका गाऊं लागली—

( राग बागेश्री )

**“ घडि इक नहि आवडै तुम दरशन बिन मोय। तुम हो मेरे प्राणजी केसू जीवन होय ॥ धृ० ॥ धान न भावै नींद न आवै बिरह सतावै मोय। घायल सी घूमती फिरूं रे मेरा दरद न जाने कोय ॥ १ ॥ दिवस तो खाय गमाइया रे रैना गमाई सोय। प्राण गमाया झुरतां रे नैना गमाया रोय ॥ २ ॥”**

खानाचा जीव थंडा झाला, कासावीस शांत झाली. त्या वेळीं त्याला ज्या प्रकारचें पद म्हणावेसें वाटत होतें तसलें च पद मलिकेच्या तोंडून निघालें. मग काय विचारावें ? तो गाण्यांत पूर्ण रंगला. गाणें संपलें तरी तो त्या तंद्रींत होता. साजिंदे गेले. तेथें फक्त खान, दिवाण व मालिका राहिली. ती तर नेहमीच्या रीतीस अनुसरून खानाला पुन्हां मदिरेचे प्याले भरून देऊं लागली !

खानानें, पातशहास खलिता लिहावयाचा म्हणून दिवाणास ठेवून घेतलें होतें. पण तें आतां त्याच्या ध्यानांत होतें कीं नाहीं, कोण जाणें ? दिवाण म्हातारा व कट्टर मुसुलमान असल्यानें, दारू पिणें, कंचनीचें गाणें वजावणें करणें किंवा पाहणें हें त्याला आवडत नव्हतें! तो औरंगजेबाच्या तालमींत वाढलेला ! औरंगजेबाचे इतर दुर्गुण कांहीं असोत, पण त्याच्यांत कांहीं गुण होते असें इतिहास सांगतो ! त्याचें नैतिक वर्तन आक्षेपार्ह नव्हतें, चैनीचें व त्याचें वांकडें होतें; गाणें-नाचण्याचा त्याला इतका तिटकारा होता कीं, त्या लोकांनीं एकदां गायनशास्त्राच्या प्रतिमेची प्रेतयात्रा काढली होती; दारूचा तो द्वेष करी. सारांश, राजाच्या किंवा लोकनायकाच्या अंगीं जे गुण अवश्य असावयास पाहिजेत ते बेरचेस त्याच्या अंगीं होते आणि त्या मुळें च शेवट पर्यंत त्यानें राज्याचा उपभोग घेतला !

राजाला किंवा लोकनायकाला सर्वांत कांहीं सांभाळावयाचें असेल तर “शील”! त्या विना सर्व अवडंबर व्यर्थ आहे! **“सर्व शीलवता जितम् ॥”** असें व्यासांचें म्हणणें आहे. राजाचें किंवा राष्ट्रनेत्याचें मुख्य कर्तव्य काय ? तर पुण्य-कर्मांचा प्रचार व पाप-कर्मांचें नियमन ! तेव्हां हें करूं इच्छिणाऱ्यानें प्रथम आपल्या मनाचें, इंद्रियांचें नियमन करावयास नको ? **“आत्मैवादौ नियन्तव्यो । दुष्कृतं संनियच्छता ॥ ”** इंद्रियें आणि त्यांचे विषय यांच्या मधील प्रीति व द्वेष ठरलेलीं आहेत, त्यांच्या ताब्यांत शहाण्यानें जाऊं नये. कारण तें

त्याचे शत्रु होत. त्यांना स्वैर सोडल्यास तीं देवांचा देखील नाश करतील !' मनुष्य त्यांच्या नादीं लागला म्हणजे त्याच्या हातून निःसंशय पापाचरण घडतें, पण तीं ताब्यांत ठेवल्यास मोक्षरूपी सिद्धी प्राप्त होते; त्यांचें नियमन म्हणजे च तप ! फार काय ? " **इंद्रियाण्येव तत्सर्वं यत्स्वर्गनरकावुभौ । निगृहीत विसृष्टानि स्वर्गाय नरकाय च ॥** "

मुसुलमानी साम्राज्यांतील ज्या सम्राटांनीं हें तत्त्व पाळलें त्यांना चांगले दिवस लाभले. जेव्हां त्यांनीं हें तत्त्व सोडलें तेव्हां त्यांना वाईट दिवस आले, त्यांचें साम्राज्य रसतळास गेलें. तीच स्थिति शिवशाहीची झाली ! खुद्द शिवप्रभूंचें अत्यंत सोज्वळ शील, पुढील आमच्या साम्राज्यांतील किती कर्णधारांच्या अंगीं दिसून येतें ? मग असलें आमचें साम्राज्य नष्ट झाल्यास त्यांत काय आश्चर्य ? हा प्रकृतीचा नियम च आहे. तिचे नियम अत्यंत कठोर आहेत ! नियम पालन करतांना, ती, हा मुसुलमान, हा हिंदू, हा रूमी, हा शामी, हा पूर्तकेश, हा फ्रेंच, हा इंग्रज असा जातीभेद पाळत नाहीं ! शहाण्या माणसानें, राजानें, सम्राटानें, नोकरशाहीनें, लोकनायकानें, ज्याला पुढारी म्हणवून घ्यावयाची हांव सुटली असेल त्यानें, विशेषतः उठल्या सुटल्या त्या मर्यादा – पुरुषोत्तम शिवाजीमहाराजांचें नांव जनते समोर ठेवून त्याच्या आड आपल्या पुढारीपणाचें सदोदीत डफडें वाजविणाऱ्यांनी व त्यांची री ओढून तुणतुणें छेडणाऱ्या त्यांच्या पठ्ठयांनीं हा नियम सदोदित लक्षांत ठेवणें जरूर आहे !

हा नियम मोडणाऱ्यांना त्या मर्यादा – पुरुषोत्तमाचा श्रीसद्गुरु काय म्हणतोः—

" **विषयदारींचा बराडी । घाली अधःपतनीं उडी । तयास भगवंत आवडी । सत्संग कैंचा ॥ वर्ती करून दांताळी । स्वानपुत्र हाडें चघळी । तैसा विषई तळमळी । विषयसुखा कारणें ॥** "

असल्या विषयासक्तांना शुद्ध देव–देश ज्ञान कसें जिरेल ! सारा जन्म ज्याचा गाढवें राखण्यांत गेला तो लोकनायक कसा होणार ? तो सैरावैरां त्या ज्ञानाची बडबड मात्र करील ! डुकराची पूजा केली, रेड्याला चंदन फांसलें तरी त्याचा काय उपयोग ? गाढवाला पुष्कळ परिमळ सोहळे केले तरी तो उकिरड्या वर लोळणार ! वुबड अंधारांत पळणार, त्याच्या कपाळीं हंसपंगती कोठली ?"

राजहंसांच्या मेळ्यांत डोंबकावळ्याला कोठलें स्थान ? हे नारकी प्राणी असून, स्वइच्छेनेंच नर्क भोगतात ! अस्तु. महंमदखान असा डोंबकावळा होता !

दिवाणानें कंटाळून शेवटीं खानास पत्राची आठवण दिली. खान भानावर आला ! त्यानें हुजऱ्यास राबता बंद ठेवण्यास सांगितलें.

म— ( विचार करून ) दिवाणजी ! माझ्या मनांत एक बेत ठरला आहे. तो तुम्हांस आतां सांगतों. राजकुमार हिरदेसांनीं आतां जी सूचना केली ती तुम्हीं ऐकली च ?

दि— आणि त्या प्रमाणें आपण वागण्याचें कबूल करून तसा मला हुकूम हि दिला ना ?

म— त्यांत च खुबी आहे ! मी सर्वस्वीं कुमारांच्या आहारीं गेलों आहें असें तुम्हां सर्वांना वाटत असेल, पण तसें नाहीं ! फक्त आमचा फायदा होईल तेवढ्या च गोष्टी मी त्यांच्या ऐकतों; बाकीच्या नाहीं ! त्यांचे वर मी पूर्ण विश्वास कधीं च ठेवला नाहीं ! काफिरां वर विश्वासण्याची मला संवय नाहीं ! त्यांनीं जरी पूर्णपणें आमच्या वर विश्वास ठेवला तरी आपलें काम संपल्या वर त्यांचा विश्वासघात करावयाचा हा माझा धारा आहे ! कुमारांनीं जी सूचना केली, तिच्या वरून मला त्यांचा संशय आला आहे !

हि— पण मला त्यांत संशया सारखें कांहीं दिसत नाहीं ?

म— मी सुद्धां आहे च असें कोठें म्हणतो ? पण आपण सावध राहिलें पाहिजे !

दि— मग काय करावयाचें योजिलें आहे ?

म— तेंच सांगतों. मला अलीकडे नूरखान आणि मानसिंहाचा हि संशय येऊं लागला आहे !

हें वाक्य खानाच्या तोंडून बाहेर पडल्या वर मलिका जहाननें हळूंच खालच्या नजरेनें खानाच्या चेहऱ्याकडे पाहिलें व एक शराबीचा पेला करून तिनें खानास दिला आणि पुन्हां भरून देण्या साठीं ती त्याच्या लोडा मागेंच बसली ! खानानें पेला घशांत ओतून तिच्या पाशीं परत दिला.

म— तथापि हे दोघे चिल्हर आहेत ! कुमारांचें तसें नाहीं, ते भारदस्त आहेत ! आमच्या जवळचें सैन्य हालवून आम्ही एकाकी पडल्या वर महाराजांकडून आमचा अचानक पराभव करावा, असा हेतु या त्यांच्या सूचनेंत कशा वरून नेसल ?

दि— कसूर माफ ! मला तसं वाटत नाहीं असा दुटप्पीपणा जर त्यांच्यांत असता, तर त्यांनीं आपण होऊन आपले किल्ले आमच्या हवालीं केलें असते काय ?

म — तें हि खरेंच आहे ! ह्या मुळेंच माझ्या मनाचा गोंधळ होत आहे ! त्यांच्या वर स्पष्ट आरोप करण्यास तसा पुरावा नाहीं हें खरें ! पण आपण सावधगिरी बाळगण्यांत काय तोटा आहे ?

दि— कांहीं नाहीं. मग आपला काय बेत आहे ?

म— येथें ठरल्या प्रमाणें पांच हजार फौज ठेवावयाची. बाकीची जी दिल्लीस पाठवावयाचें ठरलें, तसें मात्र करावयाचें नाहीं. ती सर्व ठेवून घ्यायची !

दि— म्हणजे ? ती ठेवली तर राजाजींना न कळतां रहाणार कोठें ?

म — तेंच तर गौप्य आहे ! कोठें ठेवावयाची तें ठिकाण मीं हेरून ठेवलें आहे !

पुन्हां मलिकेनें एक पेला खानाच्या तोंडास लावला ! तो पीत पीत खान म्हणाला—

म— तो चंदनगड आहे ना ? येथून दीड दोन दिवसांच्या मजली वर त्या वाघवनांत ?

दि— होय ! रस्त्यानें जातांना तो एकदां पाहिला आहे.

म— तो च तो ! कुमारांनीं च खटपट करून तो आपल्या ताब्यांत दिला. मध्यंतरीं सवड साधून मी तेथें जाऊन तो सर्व गड पाहून आलों ! तेथें आपली ही फौज गुपचीप ठेवून द्यावयाची. तेथें बेटा काईमला हि ठेवावयाचें. गड व त्याचा घेरा फार मोठा असल्यानें आपली सर्व फौज तेथें राहील. शिवाय भोंवतीं घनदाट जंगल असल्यानें ही फौज तेथें असल्याचा संशय हि कोणास येणार नाहीं. मध्यें च नूरखान व मानसिंह यांच्या कडून कांहीं संशयास्पद वर्तन घडतें आहे असें आढळल्यास त्यांना हि त्या गडामध्यें कैदेत टाकूं. मध्यंतरीं कांहीं दिवस जाऊं देऊं, मग महाराज छत्रसालांच्या गुप्त वसतीचा तलास काढूं. कुमार इकडे आल्या पासून राजाजींची छावणी कोठें आहे, तिचा कांहीं पत्ता च लागत नाहीं ! तलास लागल्या वर, कुमारांस दग्यानें कैद करून त्या गडाच्या भुयारांत लोटून देऊं व मग आपल्या सर्व फौजां निशीं एकदम छत्रसालां वर हल्ला करून त्यांचा धुव्वा उडवूं !

दि — पण खानसाहेब यांत हिरदेसांजीशी विश्वासघात केल्या सारखें होत नाहीं काय? कुराणाच्या एकूणचाळीसाव्या सूरा मध्यें "असत्याचरणी व विश्वासघातकी कृतघ्नावर अल्लाची अवकृपा होते." असें म्हटलें नाहीं काय?

म — दिवाणजी! तुम्ही पुराण्या विचारांचे आहां! यांत बेइमानी कसली? राजकारण व इष्क यांत बेइमानी सररहा माफ आहे! क्यौं प्यारी? सच है नही?

मलिका — हां, हुजूर! सच है! (स्वगत) अरे, कोल्ह्या! असें आहे कां? मग तुझें च वाक्य खरें करून दाखवीन!

म — शिवाय असें पहा! सध्याच्या पातशाहींत बेइमानी हा शब्द च उरला नाहीं! मग हें तुम्हांस पसंत आहे?

दि — ठीक आहे.

म — मग त्या प्रमाणें एक दोन दिवसांत व्यवस्थेस लागूं. बरें, तुम्ही आतां जा. प्यारी! और एक जाम दे दो!

दिवाणजी गेले. महंमद व मलिक दोघे च तेथें राहिलीं.

थोड्या वेळानें मलिका आपल्या खोलींत गेली. तीन चार घटकांनी तिला काइमखाना कडून बोलावणें आलें! ती त्याच्या खोलींत गेली! तिला जाणें भाग होतें. खोलींत काईम एका गादी वर बसला असून त्याचे शेजारीं त्याचा नवीन नेमलेला कारभारी बसला होता.

का — आइये मेरी जान! तुझी किती वाट पाहिली? तूं येईनास म्हणून मग बोलावणें पाठविलें! कां आज खेण्याची लहर लागली नाहीं वाटतें?

म — पुष्कळ लागली! पण —

का — पण काय?

म — खानसाहेब येऊं देतील तेव्हां ना?

का — काय करावें या म्हाताऱ्याला? पांच सहा मुलांचा बाप झाला तरी अजून याचा हा नाद सुटेना?

कार — पण, कसूर माफ! बाबासाहेबांना आपण उगींच नांवें ठेवतां? माझा अधिकार नाहीं बोलण्याचा, पण आपण मला चाकर न मानतां दोस्त मानतां म्हणून हें धाडस केलें.

का — खरेंच आहे तें. मी तुम्हांला आपला दोस्त मानतों आणि म्हणून

माझ्या अंतरंगांतील गोष्टी मी तुम्हांस सांगतों !

कार — म्हणून मला बोलण्यास धीर आला. माझी एक विनंति आहे.

इतक्यांत काईमनें मोठ्यानें "रणदुल्ला!" म्हणून हांक मारली. तो सध्यां त्याच्या पाहरेकऱ्यांचा नाईक बनला असून त्यावर काईमचा थोडा फार विश्वास हि बसला होता! तो खोलीच्या दारा बाहेर पहाऱ्या वर होता. हांक ऐकून तो आंत आला.

र — जी, हुजूर!

का — दुल्ल्या! गुडगुडी तयार कर; आणि शराबाची सुरई व जाम घेऊन ये.

दुल्ल्या गेला. प्रथम त्यानें दारूची सुरई व जाम आणून दिला.

का — प्यारी जाम भर दो!

मालिकेनें त्याच्या मागें बसून दारूचा पेला त्याचे तोंडास लावला. इकडे दुल्ल्यानें बाहेर जाऊन गुडगुडी तयार करून आणिली. पण खोलींत येतांना त्याचा पाय सत्रंजीस अडखळून तो पडला. त्यामुळें हातांतील गुडगुडी खालीं पडून तिच्यांतील निखारे सत्रंजी वर व काईमच्या गादी वर उधळले. दुल्ल्या घाबरला व त्यानें ते गोळा करण्यास प्रारंभ केला!

का — अरे गध्या! अफीण फार चढली काय? खोलीस आग लावायची आहे काय?

असे म्हणून काईम उठला व त्यानें दुल्ल्याच्या पाठींत लाथ मारली! दुल्ल्या कळवळला पण काय करतो?

र — स...स...सरकार! ठेंच लागली. कसूर माफ!

असें बोलून त्यानें निखारे गोळा केले व तेथें च बसून पुन्हां गुडगुडी तयार करूं लागला.

का — कारभारी! तुमची काय विनंति आहे? या सुवराच्या गडबडींत ती ऐकण्याचें तसें च राहिलें.

कार — ( मलिके कडे पाहून ) या मालिकाजहान, खानसाहेबांच्या दिमतींतील असून...आपण त्यांना...आपल्या साठीं...हें दिसण्यांत थोडेसें...

का — समजलों! तुम्हीं अडखळतां काय? मघाशीं मीं नाहीं कां म्हटलें? असले चाळे करण्याचें हें काय बाबांचें वय आहे? त्यांनीं ती शुष्क राजकारण-

बाजी करावी नाहीं तर हाजला (मक्का यात्रा) जावें! असली इष्कबाजी करण्याचें काम आम्हां तरुणांचें आहे! बाबांनीं हिला दिल्लीहून इकडे आणल्या पासून माझी नजर हिच्या वर आहे. संधि साधून मी हिला माझा दिल उघडा करून दाखविला. खरें कीं नाहीं मलिका?

मलिकेनें लाजण्याचें सोंग करून खालीं मान घातली व मानेनें होकार दिला! पण त्यावेळीं तिच्या चेहऱ्या कडे कोणी पाहिलें असतें तर त्यावर तिरस्काराची छाया त्याला दिसली असती! असें कां? तिचें तिला माहीत!

**कार** —— पण पित्याच्या प्रियजना वर मुलानें असली दृष्टि ठेवणें... जरा बेहिसाबी...

**का** —— तुम्ही चुकतां! ही पित्याची प्रियजन असेल म्हणजे पिता हिला प्रियजन मानीत असेल पण ही कोठें पित्याला प्रियजन मानते? तिचा प्रिय-जन अस्मादिक! मग यांत कसली बेहिसाबी? आणि कसलें पाप? इष्कांत जसें सत्यासत्य नाहीं तसें पाप नाहीं! दुल्लया! गुडगुडी तयार झाली कीं नाहीं? बेवकूब! किती वेळ लावतोस? सदोदित आफिणीच्या तारेंत असतो!

**र** —— ना...नाहीं, सरकार! आपण——

**का** ——मी काय? पुन्हां असली गोष्ट घडल्यास चाबकानें पाठ फोडीन!

**र** —— ( स्वगत ) मला लाथ मारतो काय? चाबकानें पाठ फोडणार काय? या कंचनीच्या देखत माझा अपमान? बरें पाहून घेईन!

**का** —— कारभारी! तुमच्याशीं थोडें नाजूक काम आहे! म्हणून तुम्हांस बोलाविलें! मलिका! आणखी एक पेला दे!

तिनें पुन्हां एक दारूचा पेला भरून दिला. तो प्यायल्या वर——

**का** ——प्यारी! मला कारभाऱ्यांशीं राजकारणाची थोडीशी मसलत करणें आहे. तरी त्या पलीकडच्या खोलींत थोडा वेळ जाऊन बस. काम झाल्या वर मग हांक मारीन.

काईमनें सांगितल्या प्रमाणें मलिका शेजारच्या खोलींत जाऊन बसली, पण तिनें खोलीचें दार किलकिलें करून ठेविलें!

**का** —— कारभारी! माझें काम बाहेर फुटलें न पाहिजे.

**कार** —— त्या बद्दल हुजुरांनीं काळजी करूं नये; पण——

कारभाऱ्यानें शंकेनें दुल्ल्या कडे पाहिलें व खासास खूण केली.

का — अं! त्याची फिकीर करण्याचें कारण नाहीं. एका क्षणाची शुद्धि दुसऱ्या क्षणास अफिण्यांची रहात नाहीं! पण तुमची सूचना बरोबर आहे! ऐ! दुल्ल्या! दरवाजाच्या बाहेर जाऊन बैस.गुडगुडी चांगली पेटली कीं घेऊन ये! दार लोटून घे व आंत कोणास सोडूं नको.

गुडगुडीचें सर्व लटांबर घेऊन दुल्ल्या बाहेर गेला; त्यानें दार लोटलें खरें पण लोटतांना लहानशी फट ठेवून तिला कान लावून बसला!

का — आतां एकांत आहे. आतां माझ्या मनांतला बेत तुम्हांस सांगतों.

र — ( स्वगत ) एकांत कशाला ? कसला बेत ? ऐकलें च पाहिजे. मला लाथ मारतोस ?

कार — बिन दिक्कत सांगा खानसाहेब !

का — माझ्या मनांत राजा छत्रसालची ती बेटी...ती अस्मानांतील परी...ती फार भरली आहे! तिच्या साठीं माझा दिल पेटून राहिला आहे! माझ्या मनांतून ती एक दिवस हि हालली नाहीं! मेरी हालत तो ऐसी बनी है. प्रेमकी बादल–तुफान आया है. अब शराब–खाने में जानेकी जरूरत नहीं. मेरा खून ( रक्त ) हि शराब बनी; और दिल कबाब बना! तो शराबके प्यालाकी क्या जरूरी ? प्रेमकी नशा चढी, कोई इसको नींद कहते है. इस समय सारा जगत प्रेमके मस्तीसे तुच्छ है. ऐ दुनियाकी बिमारी, शरीर, प्राण तुमको रुखसत है. हे भूक और प्यास मेरे पाससे चले जाओ. मेरा शरीर कुछ खबूतरखाना नहीं. वाहवा! प्रेमकी चमक की क्या तेज भडक रही है, अब परवाना की क्या ताकद है जो इस आगमें कहीं पर भी मार सके! आप समझे ? तेव्हां तिला पकडून आणली पाहिजे.तिच्याशीं शादी करण्याचा माझा हेतु फार दिवसां पासून आहे!

म — ( स्वगत ) अरे नीचा! तूं माणूस आहेस कां पशु ? आतां पर्यंत किती गरीब स्त्रियांची बेअब्रु तूं केलीस आणि पुढें करणार ? थांब, मी तुझा पुरा बदला घेईन!

कार — पण तुमचा हेतु कसा साधणार ?

का — तो च बेत मीं योजला आहे.

र — ( स्वगत ) अरे गाढ्या! त्या ताईसाहेबांशीं शादी करणार ? आणि

त्या साठीं कोणता बेत योजला आहेस ?

**का** — बाबांनीं मला पांच हजार फौज येथें ठेवून, बाकीची सर्व फौज घेऊन त्या वाघवनांतील चंदन गडांत गुप्तपणें रहाण्यास सांगितलें आहे.

या वेळीं महंमद व त्याचा दिवाण यांत ठरलेली सारी मसलत काईमनें आपल्या कारभाऱ्यास सांगितली. थोड्या वेळां पूर्वीं महंमदानें त्याला ती सांगितली होती.

**का** — तेव्हां ज्या वेळीं आपल्या सैन्याचा तो शेवटचा हल्ला महाराज छत्रसालांचें सैन्या वर होईल त्या वेळीं तुम्हीं मला मदत करा. दहापंधरा स्वार घेऊन आपण त्या युद्धाच्या गडबडींत त्या परीला पकडूं; आणि तिला पळवून नेऊन थेट दिल्ली गांठूं ! हा माझा मनांतला बेत, समजलें ?

**र** — ( स्वगत ) अरे कोल्ह्या ! असा तुझा बेत आहे काय ?

**का** — मग यांत तुम्हीं मदत करणार ना ?

**कार** — ( विचार करून ) ठीक आहे. मदत करीन. पण, माझें हि एक काम यांत च साधून दिल्यास मी आपला कायमचा दास होईन.

**र** — ( स्वगत ) आतां याचें काय काम आहे ? जसा मालक तसा नोकर ! याचे हि असेंच काहीं भानगडीचें काम असेल.

**का** — बेशक बोला. साधण्यासारखें असल्यास जरूर साधून देईन.

**कार** — माझी माणिक-पूरची जहागीर —

**र** —( स्वगत " माझी माणीक " एवढें च ऐकूं आल्यामुळें ) काय ? " माझी माणीक "? काय ? म्हणतो काय हा हरामजादा ! माझ्या माणीक वर या बुढ्या कारभाऱ्याचा डोळा आहे काय ?

**का** — होय ! ती मला माहीत आहे ! बरें मग ?

**र** — ( स्वगत ) काय याला हि ती माहीत आहे ! अरे किती बायकां वर तुझी बद नजर आहे ? सुवर !

**कार** — ती त्या सुवर रणमस्तखानानें उपटली आहे.

**र** — ( स्वगत ) काय " त्या सुवर रणदुल्लाखानानें उपटली ? " काय, साला ? मला सुवर म्हणतो ! अरे, बंदर ! तूं सुवर ! तुझा बाप सुवर ! तुझा बाबा सुवर ! मीं तिला उपटली ? अरे नादान ! ती माझ्या वर आषक्त आहे;

मी तिच्या वर आषक्त आहे? आम्ही लैला मजनु आहों! आमची शादी होणार आहे!

**कार** — ती याच फौजेच्या मदतीनें आपण मला कावीज करून द्यावी. ज्या वझीरानें ती माझ्या कडून काढून त्या सुवराला दिली तो बडतर्फ झाला आहे. आजचे वझीर तर बाबासाहेबांचे दोस्त आहेत! त्यामुळें बोभाटा झाला तरी दिल्ली दरबारा कडून कांहीं उलट प्रकार होणार नाहीं!

**र**— ( स्वगत ) बोभाट्यास हि हा हरामजादा भिणार नाहीं म्हणतो!

**का**— ठीक! हें काम माझ्या कडे लागलें. तथापि मी एकसूचना करतों. एकदम तुमच्या हवालीं ती जहागीर केली तर रणमस्त तंटा बखेडा माजवील व कदाचित् पातशहाच्या काना पर्यंत गोष्ट जाईल! म्हणून मी एक युक्ति योजतों. रणमस्तास बाबांनीं मदतीस बोलाविलें असतां त्यानें हुकूम मोडला, अशी त्याचे वर तोहोमत घालतों व त्यासाठीं त्याची जहागीर सरकार तर्फे बाबांनीं माझ्या स्वाधीन केली असें जाहिर करवितों. सहा महिने ती माझ्या कडे राहूं द्या, मग तुमची तुम्हांस देतों! कबूल आहे?

**र**— ( स्वगत ) अरे, मुरगीके बच्चे! तूं काय आदमी आहेस कां हैवान आहेस? अरे! जनावरास सुद्धां कांहीं आयाबहिणी ओळखतां येतात! माझ्या माणीकला सहा महिने तूं आपल्या कडे ठेवणार? माझ्या वर तोहोमत आणणार? सहा महिन्या नंतर तिला या बुढ्या कोल्ह्याच्या हवालीं करणार? अरे! माणीक म्हणजे काय तुझ्या परसांतील भाजी आहे? ती, सहजासहजीं तुला मीं उपटूं देईन काय?

**कार**— कबूल, क़बूल!

**का**— ठीक आहे. हा आपला दोघांचा बेत दोघांत ठेवा. षट्कर्णी होऊं देऊं नका!

**र**— ( स्वगत ) अबे, सुवरके लडकों! हा तुमचा बाप येथें बसला आहे ना! मीं तुमचा बेत सर्व ऐकला. आतां षट्कर्णी व्हावयाचा काय राहिला? मी याचा नतिजा तुम्हांस दिल्या शिवाय सोडतों काय?

**का**—मात्र त्या अफिण्याच्या—

**र**— ( स्वगत ) मला काय म्हणतो साला!

**का**— हातून ते निखारे खालीं पडले त्या अपशकुनानें माझ्या मनास

थोडा धक्का बसला! त्या वेळेस मीं त्याला सहज म्हटलें कीं, या खोलीला आग लावतोस काय म्हणून! पण तसें न होवो म्हणजे झालें. नाहीं तर माझे च शब्द खरे होऊन आपले व बाबाचे बेत फोल ठरतील व आमच्या सर्व फौजेचा नाश होऊन खरोखर च आमच्या शाही अटाळ्यास, छत्रसालाचे लोक आग लावून माझे व बाबांचे प्राण घेतील!

हें म्हणतांना काईमच्या अंगावर शहारे आले व तो सचिंत बसला!

र— ( स्वगत) अरे, हरामजादे! तसें च होईल. तुझें नुजुम मीं च खरें करतों.

कार— हुजूर! अपशकुनास इतकें भिण्याचें कारण नाहीं. वाटल्यास त्या साठीं सतगा करूं!

र— ( स्वगत ) थांब, तुझा च सतगा करतों.

का— कांहीं हरकत नाहीं. ( मोठ्यानें ) दुल्ल्या! गुडगुडी आण! इतका वेळ काय करतोस गध्ध्या?

रणदुल्ला लगबगीनें तयार केलेली गुडगुडी घेऊन आला—

र—सरकार! आपण—

का— मी काय? मला गध्धा म्हणतोस?

र— तसें नाहीं हुजूर! आपण मला बाहेर बसावयास हुकूम केला होता, तेव्हां पुन्हां हुकूम होई पर्यंत मी आंत कसा येऊं?

का— बरें, बरें. जादा बकवा मत कर. कारभारी! आतां तुम्ही जा. दुल्ल्या बाहेर जा. प्यारी इकडे ये!

दुल्ल्यानें दिलेली गुडगुडी ओढीत काईम बसला. कारभारी, सलाम करून बाहेर निघून गेला. दुल्ल्या हि दारा बाहेर निघून गेला. आंत काईम व मलिका राहिली!

दुसरे दिवशीं सायंकाळीं रणदुल्लाची पहाऱ्याची पाळी संपल्यानें सर्जा तेथें आला. दुल्ल्यानें त्याच्याशीं दहापंधरा पळें गप्पा छाटल्या व मग तेथून तो निघाला.

किल्ला मोठा होता. महंमदचें कांहीं सैन्य किल्ल्यांत, बरेचसें माची वर व बाकीचें पायथ्याशीं होतें. छत्रसालमहाराजांची थोडीशी शिबंदी किल्ल्या वर होती. जे चार पांच किल्ले महाराजकुमारांनीं, महंमदास घेऊन दिले होते

त्यां वर शाही फौज जरी त्यांनीं ठेविली होती तरी मूळची महाराजांची फौज पातशाही नोकरी बजावण्यास कबूल झाल्यानें ती हि ठेवण्यांत आली होती ! तिच्यांतील कांहीं जणांनीं नाकबुली दिल्यानें त्यांना मात्र महाराजा कडे परत लावून देण्यांत आलें.

हा किल्ला, ही वर्षांतील कांहीं दिवस सरकारी कामकाजाची जागा – एक प्रकारें राजधानी – असल्यानें, तेथें अनेक लहान मोठ्या सरकारी इमारती तर होत्या च पण रयते पैकीं व्यापारी, सावकार, उदमी इत्यादि लोक सुद्धां तेथें रहात असत. त्यामुळें त्यांचीं खाजगी घरें व धंद्याचीं दुकानें–बाजार कट्टा–वरीच होतीं.

महंमदखानास राहण्यासाठीं पूर्वीचा सेनापतीचा वाडा दिला होता. तेथें च काईम हि होता. तेथून बऱ्याच अंतरावर मागच्या बाजूस सरकार–वाडा असून त्यांत महाराजकुमारांचा मुक्काम होता. वाड्या भोंवतीं असलेल्या पागांच्या इमारतींत त्यांचे कांहीं स्वार रहात होते. त्यांचा खाजगी अटाला वाड्यांत व वाड्याच्या आसपास होता.

दुल्ल्यानें खानाचा वाडा सोडला व तो सरळ सरकार–वाड्याकडे आला. काईमच्या पहारेकऱ्यांचा नाईक असल्यानें त्याची सरकार–वाड्यांतील पहारे-कऱ्यांशीं साधारण ओळख झाली होती. वाड्याच्या मागें बाग होती. बागेच्या माळ्यास माणीकनें सांगून ठेवलें होतें कीं, "रणदुल्ला मला भेटावयास आल्यास त्याला तुझ्या घरांत बसवून मला निरोप सांगावयास येत जा." तिच्या वर्तना बद्दल माळ्याला मुळीं च शंका नव्हती, शिवाय तिनें हि त्याला कांहीं सांगून ठेवलें होतें ! दुल्ल्या बागेच्या फाटकाशीं आल्या वर त्याला तेथल्या पहारेकऱ्यानें बागेंत जाऊं दिलें. बागेंत जाऊन दुल्ल्यानें माळ्यास माणीकला निरोप कळविण्यास सांगितलें. थोड्या वेळानें माळ्यानें येऊन सांगितलें कीं, "आपल्या घराच्या मागील अंगणांतील कट्टया वर माणीक येऊन बसली आहे." दुल्ल्याला आनंद झाला. तो तिकडे गेला. माणीकची पाठ त्याच्या कडे होती. ती जोगी रागांतील पदाचीं पुढील चरणें गुणगुणत होती.

**" मैं ना जानूँ मोरी नाव लगी कैसे छोर । आँधी उठी कौनसे कारन तुम नहिं छोडी डोर "**

दुल्ल्यां थोडा वेळ मागें उभा राहून तें गाणें ऐकत आनंदानें डुलत होता! मग तो आपल्या भसाडया आवाजांत

**" मैं तो भर भर पाथर लाईं घटा घिरी घनघोर "**

हा चरण म्हणाला! माणीक हंसली व तिनें हंसता हंसतां मागें पाहिलें.

मा — नावेंत पत्थर ठेवतां ठेवतां तुम्ही आपल्याच पायांवर पत्थर पाडून घ्याल व पाय मोडून घ्याल!

र — ( जवळ येऊन बसून ) तसें च झालें बघ; म्हणून तुला सूचना देण्यास व तुझा सल्ला विचारण्यास आलों.

मा — काय झालें आहे?

र — आंधी उठली आहे. तुझी नाव तीरास कशी लावावयाची याची मला चिंता लागली आहे!

मा — म्हणजे? मी एक गाणें म्हणत होतें त्याचा व तुमच्या बोलण्याचा संबंध काय? कां तार जास्त चढली?

र — चढली नाहीं, उतरली!

मा — मग स्पष्ट बोला.

र — स्पष्ट काय सांगू? अग! तो सुवरका बच्चा, काईमखानाचा कारभारी? त्यानें तुझ्यावर डोळा ठेवला आहे! [ रागानें ] बुड्ढा असून असा उद्योग करतो! कां अलीकडच्या म्हाताऱ्यांना ही संवय लागली? तो मुर्दाड तुला पळवून नेण्याच्या खटपटींत आहे!

मा — कशा वरून?

र — म्हणजे मीं प्रत्यक्ष ऐकलें ना? हातच्या आरशाला कांकण कशाला? एवढें च नाहीं तर तो कुत्ता काईम, त्याला या कामीं मदत करणार आहे!

मा — यांत काईमचा काय फायदा?

र — फायद्या शिवाय कोण कोणास मदत करील? तुला पकडून तो कुत्ता प्रथम सहा महिने आपल्या जनान्यांत ठेवणार व मग त्या सुवर कडे धाडणार! खव्या वर दोन मांजरांची नजर...पण मीं माझा खवा त्यांना घेऊं देणार नाहीं. ( डोकें खाजवून ) पण याला काय उपाय करावा?

मा — ( स्वगत ) या अफिण्याच्या ऐकण्यांत काहीं तरी घोटाळा आहे! ( प्रकट ) तुम्हीं सावकाश सगळी हकीकत सांगा म्हणजे त्यावर उपाय शोधूं.

मला पळवून नेण्याचा त्यांचा बेत आहे?

दुल्लयानें आपल्या टोपींतून अफूची डबी काढून त्यांतील एक गोळी हातांत घेतली.

र — तें तर मीं पहिल्यानें सांगितलें! पुन्हां विचारतेस? कां माझ्या या गोळीचा अंमल तुझ्यावर चढला?

मा — माझ्या वर नाहीं, तुमच्या वर च! म्हणून तुम्हांस समजत नाहीं कीं मला येथून पळवून नेणें त्यांना कसें साधणार? आमच्या वाड्यांत काय सारे तुमच्या सारखे मुर्दाड शिपाई आहेत?

र — (रागानें) मीं मुर्दाड? राणा संगशीं हळदी घाटांत हुमायूं बादशहानें जी लढाई मारली तींत मीं पराक्रम गाजविला आहे! पांच सहा रजपुतांचीं मुंडकीं त्यांच्या धडा वरून छाटून बादशहास नजर केलीं; माहीत आहे?

मा — जाऊं द्या त्या गोष्टी. तुमची तुम्हांस तरी माहीती कोठें आहे? हळदीघाटाच्या लढाईचे वेळीं तुमचा जन्म हि नव्हता! आणि तें युद्ध महाराणा प्रताप व शहाजादा सलीम यांच्यांत झालें!

र — अग! रजपूत आणि मुसुलमान यांच्यांत तर झालें? आणि त्यांत मी नसलो तर माझा बाप नाहीं तर आजा तर असेल! तुम्हा बायकांना कोणत्याहि गोष्टीचा कीस काढण्याची मोठी वाईट खोड आहे! तात्पर्या कडे लक्ष देत नाहींत. तत्त्व मान्य करावें, तपशीलाशीं काय करावयाचें?

मा — पण मी काढतें तात्पर्य! तुमच्या त्या मुंडेछाटीचें अचूक तात्पर्य काढत्यें! सांगू?

र — (हर्षानें) सांग, सांग. तूं जें तात्पर्य काढशील तें खरें च असणार! खुदाची कसम!

मा — ऐका तर, तुम्हीं ज्यांची डोचकीं कापलीं तीं जिवंत माणसें च नव्हतीं मुळीं! तीं प्रेतें होतीं? लाश होतीं.

र — (रागानें) तुझें तात्पर्य खोटें! मला काय डरपोक समजतेस?

मा — तसें नव्हे! तुम्ही तर रणपति! मुस्लिमराष्ट्रपत्नी! आझादी बहादूर! भित्रे काय म्हणून? पण आतांच तुम्हीं खुदाची कसम खाऊन म्हणालां ना कीं, माझें तात्पर्य खरें असणार म्हणून?

र — खरें च, तें मी विसरलों! बरें तर, त्या कसमे साठीं मी तुझें म्हणणें मान्य करतों! पण जाऊं दे तें. तुझें म्हणणें काय? तुला या वाड्यांतून कशी पळवतील?

मा — होय! अहो! आमचे पांचशें स्वार आहेत खरे, पण ते तुमच्या पांच हजारांना भारी आहेत! आलें लक्षांत?

र — अग हो, ग हो! आतां आलें लक्ष्यांत! तुझ्या या पांच हजार स्वाराच्या म्हणण्यावरून आलें. थांब, गोळी चढवून देतों म्हणजे सगळी हकीकत डोळ्यां पुढें खडी राहील.

मा — खामोष! ती चढविण्या पूर्वी च तुमचें डोकें चढलें आहे. ती चढाविल्यावर तें भडकेल मग त्याच्यावर शेरभर चंदनाचा लेप—

र — होय, होय, चंदन, चंदन!

मा — थापला, तरी तें थंड होणार नाहीं! गळ्यांत उताराच्या मंत्राचा ताईत—

र — खरें च ताई, ताईसाहेब!

मा — बांधला तरी उतरणार नाहीं! त्या भरांत स्वतःस बादशहा समजून आपल्या वर छत्र—

र — बरोबर! छत्रसाल!

मा — चामरें ढळत आहेत असें तुम्हांस वाटेल! अशा तुमच्या भ्रमिष्ट अवस्थेत एखादा वाघ!—

र — बस, बस, एकदम थांब! वाघवन! एकदम इतकें बोलूं नकोस. आतां पर्यंतच्या तुझ्या बोलण्या वरून किती तरी गोष्टी आठवल्या! अब, मूं बंद कर! नाहीं तर आठवलेलें सारें विसरेन!

मा — काय आठवलें? सर्व सांगा.

र — अशी घाई कामाची नाहीं. एक एक गोष्ट आठवून सांगेन. सर्व गोष्टी आणि त्याहि एकदम व सुसंगत सांगण्यास मी काय युसूफ आदिल-शहाचा बिरबल आहें?

मा — बरें तुमच्या मर्जी प्रमाणें सांगा.

र — आतां कशी शहाण्या प्रमाणें बोललीस! म्हणून तर तूं माझी, या शहाजहांची नूरजहान! नीट लक्ष दे, तूं, माझें मस्तक भडकेल व मग

त्याच्या खालच्या गळ्यांत उताऱ्याचा ताईत बांधावा लागेल, असें म्हणालीस ना ?...झालें तर मग...त्या ताईता वरून ताईसाहेब आठवल्या,—

मा — पण, ( आश्चर्यानें ) ताईसाहेबांचा येथें संबंध काय ?

र — ( गंभीरपणें ) खामोष ! मध्येंच प्रश्न विचारूं नकोस...चंदनगडची याद तुझ्या चंदनलेपा वरून आली......तूं माझ्या वर जीं छत्रचामरें ढाळणार त्यावरून महाराज छत्रसालां वरील संकट डोळ्यां पुढें उभें राहिलें... ...त्यांत पांच हजार स्वार...आणखी शिलकी फौज यांचा हल्ला दिसला... शेवटीं वाघवन आठवलें !

मा — ( स्वगत ) या अफिण्यास कांहीं तरी महत्त्वाची गुप्त बातमी समजली आहे खास. पण ती त्याच्या कडून हळूं हळूं काढून घेतली पाहिजे ! खानसाहेब ! या तुमच्या तुटक आठवणीं वरून कांहीं च समजत नाहीं ! सगळ्या आठवणी एकत्र करून काय झालें तें सांगा.

र — ( डोकें खाजवीत ) हें काम कठीण आहे बोवा ! इतकें बिकट काम माझ्या बापजन्मीं मीं केलें नाहीं ! या कामाच्या मानानें तुझ्या त्या सांईमहाराजांचें हिंदू मुसुलमानांची एकी करण्याचें काम फार सोपें आहे !

मा — पण माझी नाव, तुम्हांला तीरास लावायाची आहे ना ?

र — तें ही खरेंच ! ( डोकें खाजवून ) हां...आतां माझ्या डोक्यांत या सर्व गोष्टींची सांखळी तयार होत चालली...पण ती अजून कच्ची आहे...( तिचे कडे केविलवाणें पाहून ) म्हणून ( गोळी दाखवून ) हें अमृत माझ्या पोटांत जाऊं दे म्हणजे सांखळी संगीन बनेल !

मा — ( हंसून ) बरं घ्या अमृत !

अफूची गोळी चढविल्या वर दुल्लयानें काईमखानाचें व त्याच्या कारभाऱ्याचें जें बोलणें ऐकलें होतें तें सर्व हळूं हळूं आठवून तिला सांगितलें. तें ऐकून माणीकला फार आश्चर्य व थोडीशी भीति वाटली ! तिनें त्याला शाबासकी देऊन वाटेला लावलें आणि त्या हकीकती वर विचार करीत ती तेथें बराच वेळ बसून राहिली !

या प्रमाणें अफीण्या कडून काईमची मसलतीची बातमी फुटली ! कां नाहीं फुटणार ? कारण—

**"अन्तर्गृहचरास्तेषां कुब्जवामनषण्डकाः। शिल्पवत्यः स्त्रियो मूका श्चित्राश्च म्लेच्छजातयः॥**

कुबडा, टेंगू, खोजा ( षंढ ), कलावंतिणी, मुके व इतर अनेक प्रकारचे म्लेच्छ यांना हेर नेमावेत, असा चाणक्यांचा आदेश आहे. त्या आदेशाला अनुसरून माणीकनें, रणदुल्ल्याला—त्याला समजूं न देतां—हेराचें काम करण्यास सांगितलें होतें! आणि तो हि संधि साधून, काईमच्या बैठकींतील घडणाऱ्या सर्व प्रकारच्या हकिकती तिला येऊन सांगत असे! आजचा प्रसंग तसा च होता.

या दोघांचा हा प्रसंग इकडे घडत असतां, दुसरा प्रसंग किल्ल्यांतील जुम्मा मशिदींत घडत होता! महाराज छत्रसालांनीं आपल्या मुसुलमान प्रजेसाठीं व सैन्यांतील मुस्लीम शिपायां साठीं किल्ल्यांत एक मशीद मुद्दाम बांधली होती. तिचा मुजावर मागील आवारांत रहात असे त्याची महाराजा वर फार भक्ति असून, पातशाही वर राग असे. त्याचा व मानसिंहाचा स्नेह चांगला जमला होता. मल्लिका जहान बहुधां रोज सायंकाळीं तेथें नमाज पढावयास येई. नमाज पढल्या नंतर मुजावराच्या घरांत थोडा वेळ बसे. केव्हां केव्हां तेथें मानसिंह हि मुजावराशीं गप्पा मारण्यास येऊन बसे. मात्र हे तिघे तेथे असले म्हणजे मुजावराचा मुलगा दारा वर पहारा करी व आंत कोणास जाऊं देत नसे! मग या तिघांच्या काय गप्पा चालत खुदा जाणे!

या दिवशीं सायंकाळीं मानसिंह व मल्लिका त्या घरांत गप्पा मारीत बसले होते. मुजावराचा मुलगा बाहेर गेला असल्यानें खुद्द मुजावर च दारांत बसला होता. त्या मुळें या दोघांना एकांत लाभला होता!

**मा**— मल्लिका! पण ही तूं सांगितलेली बातमी अगदीं नक्की आहे? कां तुझ्या ऐकण्यांत कांहीं भलतें च आलें?

**म**— नहीं, मेरे प्यारे! मी, खानाच्या अगदीं जवळच बसलें होत्यें. त्याचा श्वास न् श्वास जर मला ऐकूं येत होता, तर शब्द कसे ऐकूं येणार नाहींत! तुम्हांला आज पर्यंत मीं कधीं तरी खोटी बातमी दिली आहे काय?

**मा**— तसें मीं कधीं म्हटलें? पण या बातमी बद्दल शंका यावी अशी च ही असल्यानें पुन्हां मीं तुला खात्री करण्या साठीं विचारलें एवढें च. सारांश, खान आणि त्याचा पोरगा, आमच्याशीं असे डाव खेळणार काय? बरें पाहून

घेऊं ! मलिका ! तुझे माझ्या वर फार उपकार झाले आहेत ! त्यांतून मीं कसा मोकळा होईन ?

म— मोकळे होऊं च नका ! माझ्या प्रेमानें मीं जसें तुम्हांस बांधून टाकतें, तसें तुम्हीं माझ्या वर प्रेम करून मला बांधून टाका ! एवढी माझी इच्छा पूर्ण करा !

मा—पण मलिका—

म—पण, बिण कांहीं नाहीं. मीं मागें च तुमच्या साऱ्या गोष्टी खोडून काढल्या आहेत, मी कंचनी असलें तरी मला पुण्य पाप समजतें. म्हाताऱ्या महंमदखाना वर माझें प्रेम कसें बसेल ? त्यानें मला शाही दरबारीं आणलें म्हणून मी त्याच्या उपकारा खालीं सांपडलें आहे एवढें च. त्याचा तो पोरटा म्हणजे जानवरांतील जानवर आहे. त्याला मायबहिणींची सुद्धां ओळख नाहीं ! अशा हैवाना वर कोण औरत प्यार करील ? आपल्याला पाहिल्या पासून माझें मन आपल्या वर बसलें ! खुदा जाणें हें कसें झालें तें ! पण आतां माझें मन माझ्या पाशीं राहिलें नाहीं !

( राग काफी )

" हुसने गुलकी नाओ अब बेहरे खिजांमें बेह गयी । माल था सो बिक चुका दुकान खाली रह गयी॥ कौन पूछे है तुझे माह ! रोजे रौशन हो गया । नूरकी तालब ज़ो थी वह शब सियाह अब ढै गयी ॥ फिर नहीं आनेकी वापस है यकीं मुझको सनम । अब तो तेरे इश्कके सदमे जवानी सेह गयी ॥ "

मानसिंहजी ! मी शरीरानें अजून शुद्ध आहें ! आपण माझा स्वीकार करा ! आपण सांगाल तेथें व सांगाल त्या परिस्थितींत मीं आपली दासी होऊन राहीन !

मा — असो. तो पुढचा प्रश्न आहे. पण ही बातमी अगदीं खरी आहे ना ?

म — बिलकूल शंका नको. बरें तर आतां मी जातें. फार वेळ झाला तर त्या बुढ्ढयास शक येईल.

मलिका निघून गेली. मानसिंग हि विचारमग्न अवस्थेंत तेथून निघाला. मानसिंग जरी महंमदखानाच्या हेरखात्याचा दरोगा होता तरी खाना वर — धन्या वर — त्यानें आपला एक हेर ठेवला होता !

" **नटनर्तकगायनवादकवाग्जीवनकुशीलवाः स्त्रियश्चाभ्यन्तरं चारं विद्युः ।** " या सिद्धांतास अनुसरून च मानसिंहानें, महंमदखानाच्या जनान्यां तील कलावंतीण मलिकेला च खाना वर हेर नेमलें होतें !

या ठिकाणीं भर्तृहरीच्या " **यां चिंतयामि सततं मयि सा विरक्ता... इमां च मां च ।** " या श्लोकाची आठवण होते. महंमदखानाचें प्रेम मलिके वर होतें तर तिचें मानसिंहा वर होतें पण त्याचें होतें रतनवर ! असेंच हें जग आहे !

वरीच रात्र झाल्या वर मानसिंह, महाराजकुमारांच्या वाड्यांत जाऊन त्यांना एकांतांत भेटला आणि त्यानें त्यांना महंमद व काईम यांचे गुप्त बेत सांगितले. तत्पूर्वी थोडा वेळ माणीकनें हि तीच बातमी त्यांना सांगितली होती ! महाराजकुमारांनी व मानसिंहाने कांहीं वेळ खलबत केलें मग मानसिंहानें पत्र लिहिण्याची सामग्री आणली. महाराजकुमार तोंडानें सांगूं लागले व मानसिंह लिहूं लागलाः —

॥ **श्रीरामजी** ॥

" **तेडतों डिखंसी. क्षगटी. खेसामी पखिजाओ इकों ताकठी. मेंसगुटीं** "
" **गांब थमाट घोम झथे. नाख जधटी. स्झाखें चाधीबी धुट घोम** "
" **पुग्सगपं डाफडखांसीठ बंळखपवा डटी लेडिठी झथे. तंकि ताकोख** "
" **झउथांत चंळींस राधोख, गिसामी डट ळोखथी घोमा झेघडरोख** "
" **वाठोख माषाठ. झोप्झ सी समडोम धटपें.** "

या प्रमाणें पत्र मानसिंहानें लिहून महाराजकुमारांजवळ आणलें ! त्याचे शेवटीं त्यांनीं आपल्या हातानें " **मझ पमटाम** " हीं अक्षरें लिहून पत्र पुरें केलें ! !

पहांटे एक मुसलमान फकीर ( आपला तरुण रामदासी ), एकतारी वर कबीराचीं पदें म्हणत गडा वर मोठ मोठ्या रस्त्यानें चालला होता. गडाची वेस उघडल्या वर, गाणें गात गात तो वेशींतून बाहेर पडला ! माची वर थोडा वेळ त्यानें फेरी मारली; मग गडाच्या पायथ्याशीं असलेल्या वाडींत येऊन तेथें त्यानें भिक्षा मागितली. दोहरे, पदें म्हणावीं; जी भिक्षा मिळेल ती झोळींत घ्यावी, भाविकांना पिराचा अंगारा द्यावा असा त्याचा क्रम संध्याकाळ पर्यंत चालला. कोणीं विचारलें, " सांईजी ! कोठें जातां ? " सांईनें उत्तर दिलें, " बेटा ! दिल्लीस ! " अंधार पडल्या वर सांईजी

दिल्लीच्या वाटेस लागले. मधून मधून ते मागें वळून पहात, कानोसा घेत. आपल्या मागावर कोणी नाहीं अशी खात्री झाली म्हणजे पुढें चालत. या प्रमाणें मध्यरात्रीपर्यंत त्यांनीं दिल्लीच्या रस्त्यानें मार्गक्रमण चालू ठेवलें होतें. उत्तर रात्र सुरू झाली, दक्षिणचा वारा सुटला ! सांईजीनें पांच दहा क्षण एके जागीं थांबून, कोणाची चाहूल वगैरे येत नाहीं असें पाहून उत्तरेचा रस्ता सोडून एकदम दक्षिणचा रस्ता –– आलेल्या रस्त्याहून निराळा — पकडला ! अत्यंत त्वरेनें चालून जितका रस्ता काटतां येईल तितका ते काटीत होते ! इतकी घाई दक्षिणे कडे जाण्याची त्यांना का लागली होती ?

" **शिल्पकारिकाः कुशीलवा दास्यो वा गीतवाद्यभाण्डगूढलेख्य-संज्ञाभिर्वा चारं निर्हरेयुः ।** "

असा कांहीं प्रकार होता काय ?

महाराज छत्रसालांचे कडे हि एक मानसिंहाचा विश्वासु हेर दुसरे दिवशीं निघून गेला !

# फकीरी पातशाहीचे पंत-प्रधान !

[ पाकळी पांचवी ]

य एनमापत्सु प्राणाबाधयुक्तास्वनुगृह्णीयुस्तानमात्यान् कुर्वीत ।

—पराशर

पितृपैतामहानमात्यान् कुर्वीत, दृष्टापदानत्वात् ते ह्येनमपचरन्तमपि न त्यजन्ति सगन्धत्वात् । -कौ०

शास्त्रविददृष्ट कर्माकर्मसु विषादं गच्छेत् । अभिजनप्रज्ञाशौचशौर्यानुरागयुक्तानमात्यान्कुर्वीत ।-बा०

पहिलें वचन पराशरांचें असून त्याचा भावार्थः— राजाच्या प्राणसंकटाच्या वेळीं जे उपयोगी पडतात व ज्यांची राजनिष्ठा निःशंक आहे अशांना अमात्य नेमावेत !

कौणपदंताचें दुसरें वचन असून त्याचा भावार्थः— ज्यांचे पिते व आजे पूर्वी अमात्य होते त्यांना अमात्य नेमावेत. त्यांना प्रसंगीं जरी ठपका देण्यांत आला, तरी त्यांना गतकालाचें ज्ञान असल्यानें व राजाशीं त्यांचा अत्रुटित संबंध असल्यानें, ते राजाला सोडून जाणार नाहींत, फितुरी बनणार नाहींत !

बाहुदंतीपुत्र नांवाच्या एका राजकार्यधुरंधरानें तर असें सांगितलें आहे कीं,:— उच्चकुलोत्पन्न, अत्यंत बुद्धिमान, शुद्ध आचार–विचारांचे, शूर,

राजनिष्ठ अशांना अमात्य नेमावेत. नुसतें तात्त्विक ज्ञान असणारे व राजकारणाचें प्रत्यक्ष ज्ञान नसणारे पुरुष राजकारणाच्या ऐन कार्यामध्यें भयंकर चुका करतात !

शिवप्रभूच्या देवा-ब्राम्हणांच्या-फकीर शाहीच्या-स्वराज्याचे पंत-प्रधान, तेव्हां पासून म्हणजे थोरल्या महाराजां पासून, या कथानकाच्या काळा पर्यंत, वर सांगितलेल्या व्याख्यां प्रमाणें वागणारे होते. त्यांच्या अंगीं वरील गुण होते. मोरोपंत पिंगळे, रामचंद्रपंत ( हुक्मत पन्हा ) थोरले बाळाजीपंत नाना आणि या कथानकांतील एक प्रमुख व्यक्ति थोरले बाजीरावसाहेब या व्यक्ति या सद्‌गुणांनीं मंडित होत्या ! तसें च भाऊसाहेब केळशीकर, हे जरी पंत प्रधान नसले तरी सर्व राज्याचे पोतदार असून अनेक वेळां मुख्य सेनापति झाले होते; त्यामुळें ते आठ अमात्यांत गणण्यास कांहीं हरकत नाहीं. ते हि या अमात्यांच्या व्याख्येच्या कसोटीस पूर्ण उतरल्याचें तत्कालीन इतिहास व कवि, फार काय प्रत्यक्ष श्री शाहु छत्रपती सुद्धा स्वमुखानें सांगत आहेत !

भाऊसाहेब, पैठण हून उत्तरेकडे गेल्या नंतर, श्रीमंत बाजीराव साहेब हे, गंगथडींत, सर लष्करांस त्यांचा अंमल बसविण्याचे कामीं मदत करण्यास गेल्याचें मागें आलें आहे. ती स्वारी संपवून श्रीमंत साताऱ्यास परत आले. पुढील सालीं पन्हां मोंगलाईत स्वारी करण्यास छत्रपतींनीं श्रीमंतांना आज्ञा केली. त्या प्रमाणें श्रीमंतांनीं सातारा सोडला. प्रथम तुळजापुरास जाऊन श्री तुकाईमातेचें दर्शन घेऊन तेथून श्री शंभुमहादेवाच्या दर्शनास शिखर-शिंगणापुरीं आले. तेथें त्या वेळीं छत्रपतींचा मुक्काम होता. देवदर्शन व राजदर्शन घेऊन पंत प्रधानांनीं आपल्या ढाला मोंगलाई कडे वळविल्या. वाटेंत त्यांचा मुक्काम कडेवळीत येथें झाला.

कडेवळीत गांवीं मराठ्यांची छावणी पडली होती. ही छावणी फकीरशाहीची म्हणजे शिवशाहीची होती; पातशाहीची नव्हती ! म्हणजे तिच्या उलट वर्तनाची होती. साम्राज्याच्या छावणीचें वर्णन मागें आलें आहे. फकीर शाही सैन्यांत कडक शिस्त होती. थोरले महाराज, सैन्याबद्दल नेहमीं म्हणत कीः—

" तुमच्या अंगीकृत कार्याची नासाडी जर तुम्हांस करावयाची असेल तर प्रति-पक्षास नुसत्या खूप शिव्या दिल्या म्हणजे झालें ! नुसत्या गप्पांनीं यश

कसें मिळणार ? जेव्हां सत्य-प्रस्थापनेसाठीं कार्य हातीं घ्यावयाचे तेव्हां अखेरीस युद्ध करावें लागतें. अशा युद्धांत अपयश येणार नाहीं. आल्यास त्याचीं कारणें आपल्या च ठिकाणीं शोधावीं लागतात ! या कारणांत प्रमुख म्हणजे सेनेचें असंघटन व शिपायांची दुर्बलता. कोणत्या हेतू साठीं लढावयाचें हे सैनिकास समजणें जरूर. त्याचें अज्ञान म्हणजे दौर्बल्य ! या दोषामुळें इतर सर्व दोष उद्भवतात. आपापसांतील भांडणें हा याचा च एक परिणाम ! तसेच वरिष्ठ अधिकाऱ्यांचे हुकुमांची तामिली न करणें; त्यांचे अधिकार, त्यांचीं पदें, त्यांची सत्ता हिसकावून घेण्यासाठीं प्रतिस्पर्धी गट उभारणें; क्षुल्लक कारणां साठीं सैन्यांत जातीय तंटे माजविणें इत्यादि दोष वरील अज्ञाना मुळें च उत्पन्न होतात. कांहींच्या मतें आमच्यांतील बेकी पातशाहीनें जाणून बुजून निर्माण केली आहे. तें ठीक च. पण एवढें च घोकत बसल्यानें दास्याची मुदत आम्हीं वाढवितों ! त्या साठीं सैन्यांत ऐक्य उत्पन्न केलें पाहिजे. त्यानें च उन्नतीस पोहोंचतां येईल. नाहीं तर स्वराज्याची घोषणा ही शत्रूचे थट्टेचा विषय बनेल. आमच्या अपयशाच्या कारणांची आम्हीं केलेली मीमांसा जर खरी असेल तर त्या अपयशा वर उपाय करण्यासाठीं बाह्य साधनांची वा परिस्थितीची गरज नसोन, ती गोष्ट सर्वस्वीं आपल्या हातची आहे. आम्हीं आमची सैन्याची संगठना सुव्यवस्थित करोन, त्याज बद्दल इतरांना आदर व शत्रूस दरारा वाटेल इतकी ती शुद्ध व बलवान केली च पाहिजे ! आपल्या या मार्गांत विघ्नें आणणाऱ्यांना नुसत्या धमक्या देऊन हें होणें नाहीं. त्या संगठनेप्रमाणें आम्हीं वागूंच वागूं याची खातरजमा आपल्या आचारानें आपण प्रतिपक्षाची करून दिली पाहिजे ! स्वातंत्र्य-संपादनाची तळमळ आम्हांस मना पासोन लागली आहे आमचा प्रयत्न हा तिचा पुरावा. या पुराव्याच्या कसोटी वरच स्वराज्यांतील सेवकांची व सैनिकांची शिस्त-प्रियता तथा सत्यपालनवृत्ति पारखली जाणार. स्वराज्याच्या पालनाचें व वर्धनाचें नियंत्रण व व्यवस्था श्री समर्थांनीं व त्यांच्या आनंदवन-भुवनानें आमच्या हातीं सोंपाविली आहे ! वास्तविक मीं श्री सद्गुरूचा व महाराष्ट्राचा एक चरणरज सेवक ! छत्रपति आम्ही नव्हों ! श्री कृपेनें हें पद लाभलें. आमचे जवळ आमचें स्वतःचें असें बलसाधन कांहींच नाहीं व पूर्वीं नव्हतें ! आम्हीं फकीर-अर्धनग्न फकीर जे

श्रीसमर्थ त्यांचे शागीर्द ! स्वराज्या साठीं आम्हीं फकीरी घेतली आहे!! आम्हीं ज्या आज्ञा सोडतों त्यांना मुलकी तथा लष्करी सेवक राजीखुषीनें आणि कळून सवरून मान्यता देतात हें च आमचें बलसाधन ! आमचे सेनापति प्रतापराव गुजर आहेत. ते मोहिमशीर असतात च. प्रसंगीं आम्हांस हि अंगानें युद्धास जावें लागतें. अशा समयीं युद्धाचें सर्वसामान्य नियंत्रण आमच्या हातीं ठेवावयाचें असेल तर सर्वांनीं अतिशय कडक शिस्त पाळली पाहिजे अशी आमची आज्ञा असते. जावत्काल सैनिक लोक पूर्ण शिस्तप्रियता व्यक्त करीत नाहींत तथा सत्य व परपीडा—अहिंसा—यांचा खरा अर्थ पूर्णतेनें मनांत बाणवून घेत नाहींत, तावत्काल सत्याधिष्ठित स्वराज्याची शक्यता आमच्या दृष्टिपथांत येणार नाहीं ! जीवन किंवा मृत्यु असा निकराचा झगडा आम्हीं अंगिकारला आहे ! महाराष्ट्राच्या फार मोठ्या कसोटीची ही वेळ आहे. कोणत्या हि खोट्या व पोकळ बतावणीनें आपलें कार्य होणार नाहीं. देशाच्या सेवकांच्या अंगीं वरील दोन महत्त्वाचीं तत्त्वें त्यांच्या खऱ्या अर्थानें वसत नसतील तर अथवा पातशाही, तिचे अधिकारी अथवा स्वराज्य—द्रोही हिंदवी माणसें यांच्या संबंधानें आपल्या अंतःकरणांत असलेला द्वेष, सूड—बुद्धि आपण सोडली नाहीं तर स्वराज्य देवा—ब्राह्मणांचें स्वराज्य—दुरावेल ! आमच्या सैन्याच्या हातीं आम्हीं जीं शस्त्रें देऊं, त्यांच्या यशस्वितेवर विश्वास नसणारें सैन्य जर आमच्या हातांखालीं असेल तर आमचें नेतृत्व कशास पाहिजे ? परकीय जोखडा पासोन सर्व भारत पूर्ण स्वतंत्र करण्यास इतर स्वराज्येच्छु व्यक्ती प्रमाणें—महाराणा प्रताप, महाराणा राजसिंह यांचे प्रमाणें—आम्हीं हि उतावीळ आहों ! पण आम्हांस कोणा हि मुसुलमानाचा अथवा दुसऱ्या कोणाचा हि द्वेष वाटत नाहीं ! मुसुलमानांचें बीजन करावें अशी हि इच्छा आम्हीं करणार नाहीं. मानव—जातीस कलंक लावणारीं व जीवनाचा तिटकारा आणणारीं कृत्यें या मुसुलमान पातशाहीनें सोडावीं व दीने—इलाहीनें तिनें वर्तावें ही आमची इच्छा ! हें कार्य तिच्या हातून होत नाहीं म्हणून आम्हीं तिच्या जागीं रामराज्य स्थापणार आहों. तेंव्हां तें स्थापण्यांत ज्याचें अंग प्रमुख त्या सैन्यानें अत्यंत कडक शिस्तीनें वागलें पाहिजे ! ”

या प्रमाणें महाराजांची आज्ञा असे ! त्या कठोर कर्तव्याच्या आज्ञेकडे

मराठी सैन्याचें लक्ष असे. ती आज्ञा तें पूर्ण पाळी. त्यामुळें या सैन्यांत चैन हा शब्द फार दुर्मिळ होता! लढाऊ शिपायां खेरीज बाजार-बुणगें फार कमी असे. लष्करांत स्त्रियांना नेण्याची सक्त मनाई असे. त्यामुळें शिपायांना च काय पण सरदारांना हि आपलीं कुटुंबें जवळ बाळगतां येत नसत. अशा ठिकाणीं शिपायांनीं बाजारबसव्या जवळ करावयाचें कसें शक्य होतें? त्याच प्रमाणें कंचन्या, गवयी, भांड, कथ्थक, तमासगीर यांची हि वर्णी लागणें अशक्य होतें. फक्त पवाडे म्हणणारे शाहीरांच्या निरनिराळ्या पथक्या असत. त्यांचे पवाडे मुख्यतः वीररसप्रधान असत! त्या पवाड्यांनीं प्रसंगीं निराश झालेल्या मराठी सैनिकांचीं मनें पुन्हां कार्यतत्पर बनविलीं जात! गोंधळांत आपलें च सैन्य लुटणारे भामटे या सैन्यांत औषधास हि मिळत नसत. दारू तर हिंदुधर्मांत पंचमहापातकांत गणली गेल्यानें तिच्या पोईचें एक हि दुकान, लष्करांत नसे!

या सैन्याच्या छावणीच्या अगदीं प्रारंभीं पहारेकऱ्यांच्या चौक्या असत. त्यांच्या मागें हूल स्वारांच्या राहुट्या असत. हे हूल-स्वार सर्वस्वी हरिजन जातींचे म्हणजे महार, मांग, चांभार, मेहतर इ० जातींचे असत. यांचें बहुतेक काम आजच्या सॅपरमैना कंपनीच्या कामासारखें असे. रस्ते साफ करणें. तात्पुरते पूल तयार करणें वगैरे कामें ही अघाडीच्या हि अघाडीची तुकडी करी. सैन्यांतील उच्च वर्णीय लोक, खास छत्रपति व पंतप्रधान म्हणजे क्षत्रिय आणि ब्राह्मण हे, या स्वारांना अस्पृश्य मानीत नसत! ते त्यांना शिवीत! त्या वेळीं लेंडी-स्वार म्हणून एक स्वारांचा वर्ग असे. यजमान घोड्या वर स्वार होऊन घोडा दौडूं लागला म्हणजे घोड्याच्या खोगीराची लेंडी जेथें त्याच्या शेपटांत अडकविली जाते तेथें त्या लेंडीत आपल्या हाताचीं बोटें अडकवून घोड्याच्या मागें पायीं पळण्यानें म्हणजे यजमानाच्या शरीर-रक्षणाचें, हें या स्वाराचें काम. घोडा किती हि जोरांत पळो हा स्वार तेवढ्या वेगानें पायीं पळे. आजच्या ऐकणाऱ्याला हें खोटें वाटेल! पण हें सत्य आहे. त्या वेळीं हा वर्ग होता. या स्वारांत हि हरिजनांचा भरणा असे.

हे हूल-स्वार सैन्याच्या आघाडीच्या हि अघाडी वर असल्यानें गांवा वर अगर शत्रु-सैन्या वर हल्ला करतांना प्रथम हे तुटून पडत. लांबून हे दिसले म्हणजे समजावें कीं, यांच्या मागून सैन्य येत आहे. यांना पाहिल्या वर

गांवकऱ्यांनीं किंवा शत्रूनें आपल्या गांवांत किंवा सैन्यांत हूल म्हणजे आवई म्हणजे हंकारा उठवावयाचा कीं परकें सैन्य चालून येत आहे. या कृतीवरून या स्वारांना हूल-स्वार हें नांव पडलें.

यांना जसें अस्पृश्य मानीत नसत, तसें च यांच्या व इतर उच्च वर्णियांच्या स्वारांच्या नोकरी मध्यें, वेतना मध्यें, **दर्जा मध्यें फरक नसे**. माझ्या (लेखका) जवळ तत्कालीन खास सरकारी लष्करी आज्ञापत्राच्या अस्सल बरहुकुम केलेल्या नकला आहेत. त्यावरून वरील माहिती सत्य ठरते. एकएकटा हा हूलस्वार असे. पुढें त्याची बढती होऊन त्यास सिलेदार करीत. या सिले-दाराच्या हाताखालीं कमींतकमी तीन पासून आठ, दहा, पंधरा हरिजन हूलस्वार असत. म्हणजे हें एक लहानसें पथक च बने. या पथकाच्या जमाखर्चाचें काम पहाण्यास बहुधां **ब्राह्मण** कारकून असे! सरकारी कामें उत्तमपणें पार पाडल्यास यांना नक्त बक्षिसें मिळत व इनामें हि मिळत. असल्या इनामदारांपैकीं एक हरिजन इनामदार सध्यां मिरजे जवळ आपलें इनाम उपभोगित आहे!

ही हूलस्वाराची पद्धति मराठी सैन्यांत फार जुनी आहे. आपल्या कथा-नकाच्या काळच्या म्हणजे शक १६५१ च्या सुमाराचा या हूलस्वारां पैकीं एकाचा वेहड्याचा अस्सलबरहुकूम उतारा खालीं देतों; त्या वरून थोडीशी कल्पना येईल.

" स्वारी राजश्री चिमणाजी बलाल. खर्च, बद्दल मुशाहिरा, हूलस्वार. वेशामी म्हाल नाक.

॥।॰ पोता पैकीं. माहे रबिलाखर

१५ परभारा, बद्दल झडती परगणे जावदा पैकीं, विद्यमान बाजी भीमराव, रुपये

१५॥।- रु.

माल नाक सिव नाक

२४ दुमाही ( दोन महिन्यांचा पगार )

५० साल मजकुरीचे नालबंदी पैकीं, तयारी बद्दल निम्मे नालबंदी, कर्ज, गुजारत रामचंद्र आबाजी याजकडे साल मजकुरीं कर्जाचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा करार केला आहे. त्या प्रमाणें

७४ रु. "

त्या वेळीं सैन्यांत पगार वांटण्याची सामान्य रीत अशी असे कीं:—

शिलेदार दसऱ्यास मुख्य ठाण्यावर हजर होई. त्याची हजेरी घेऊन त्याचें—व त्याचे हाता खालीं आणखी स्वार असल्यास त्यांचीं—नांव पटांत दाखल करीत. त्याचा पगार (मुशाहिरा) ठरविला जाई. गरीब स्वारांचा पगार एक आठवडा, पंधरा दिवसां वर ठरे. वरच्या दर्जाच्या स्वाराचा पगार दर महा किंवा दीड माही ठरे. पगार ठरल्या नंतर प्रथम जी रक्कम, तयारी साठीं स्वारास देत तिला "नालबंदी" म्हणत. हिच्यांत रोख रकम व कापडचोपड असे दोन प्रकार असत. कापडांत पागोटें, अंगरख्या साठीं कापड, शेला, शाल, जोठ, खादी पासोडी इत्यादि कापड मिळे. हें सरकारी जामदारखान्यांतून मिळे. याचा उपयोग स्वारानें आपला लष्करी पोशाक तयार करण्याकडे करावयाचा. रोख रकम साधारण दोन तीन महिन्यांच्या पगाराच्या बेरजे इतकी मिळे. पगारास "रोजमरा" नांव असे. ही रकम पोतें म्हणजे सरकारी खजिन्यांतून मिळे.

पुढें लष्कर कूच करून निघालें कीं व तें पुन्हां मुख्य ठाण्यावर परत येई पर्यंतच्या दरम्यानच्या काळांत ठरल्या प्रमाणें जसा असेल तसा आठवड्यानें, दोन आठवड्यांनीं, महिन्यानें, दीड महिन्यानें पगार रोख मिळे. या सर्व रकमांना रोजमरे म्हणत. ही रकम सरकार स्वतः तेथल्या तेथें देई किंवा त्या भागांत असलेल्या सरकारी सुभेदार-किल्लेदार वगैरे अधिकाऱ्यांना देण्यास सांगून, तेवढ्या रकमेची अधिकाऱ्यांवर काढलेली वरात—चिठ्ठी शिलेदाराजवळ देत. अधिकाऱ्यांजवळ पैसे शिल्लक नसल्यास, सैन्या बरोबर मोठमोठे सावकार घेतलेले असत, त्या सावकारांच्या नांवें वराता देत. ठराविक मुदतीनें पगार मिळे खरा पण मध्यें सण, वार, पितृपक्ष, श्राद्ध, लग्न, मौत इत्यादि प्रसंगीं रकम लागे ती सरकार देई; अगाऊ रोजमऱ्याचे पोटीं ती मिळे व पुढें त्यांत च ती वळती करून घेण्यांत येई. स्वारींत शत्रू कडून खंडण्या वसूल झाल्या म्हणजे त्या खंडण्यांच्या रकमेंतून हि पगार मिळे. या प्रकारास "झडती परभारें पैकीं" असें नांव असून त्याचे पोटांत "स्वारी हिंदुस्थान खंडणी" "स्वारी कर्नाटक खंडणी" अशी सदरें असत.

सैन्य, अगोटींत परत मुख्य ठाण्या वर आल्या नंतर जे सिलेदार आपल्या घरीं परत जात, त्यांना त्यांची नौकरी बजावलेल्या दिवसांचा हिशेब करून पगारा पैकीं उरलेली रकम देत, तीस "समजावीस" म्हणत. ही रकम हि

रोग्य व कापडचोपडाच्या रूपानें मिळे. रोख पुरेशी देण्यास सरकारास सबड नसल तर सिलेदार ज्या परगण्यांत रहात असेल तेथील सरकारी अधिकाऱ्या वर अगर त्या परगण्यांतील सरकारमान्य सावकारां वर सरकार वराता देई.

हा पगाराचा एकंदर प्रकार पाहिला म्हणजे तो अत्यंत गोंधळाचा असे हें सहज लक्ष्यांत येतें. सैनिकांना या मुळें नियमितपणें पगार मिळत नसे व त्या मुळें सैनिक नेहमीं असंतुष्ट असत; आणि पैशा साठीं, सेनापति जवळ धरणें घेऊन बसत. या प्रकारा मुळें मागें सांगिल्या प्रमाणें श्री० थोरले बाजीरावसाहेबांना, " आमचें कपाळ छिनत चाललें, वीष खाणें इतकाच अर्थ उरला ! " असले उद्गार नेहमीं काढावे लागत !

थोरल्या महाराजांचे काळीं हा प्रकार नसे. सर्व पगार नियमितपणें सरकारी खजिन्यांतून मिळे. हा प्रकार बहुधां राजाराममहाराजांच्या कारकीर्दीत सुरू झाला असावा. त्यांच्या राजवटींत त्या शिवाय गत्यंतर नव्हतें पण पुढें ही रीत आमच्या साम्राज्याच्या शेवट पर्यंत राहिली हें वाईट झालें. राजाराम महाराजांच्या राजवटींत अशी च शेवटीं घातुक ठरलेली गोष्ट – रीत – अंमलांत आली; ती म्हणजे इनामें देण्याची. या दोन्ही रीती राजाराममहाराजांच्या राजवटींत अपरिहार्य ठरल्या पण पुढें त्या समूळ उपटून काढण्याचा प्रयत्न कोणीं केला नाहीं, उलट वाढविण्या कडे प्रवृत्ति होती. त्यामुळें शिवशाही बुडण्याच्या वेळीं फौजेच्या पोटास द्यावयाचा पैका सरकारी खजिन्यांत नव्हता आणि इनामदार व वतनदार लोक आपल्या इनामाच्या तथा वतनाच्या सुरक्षिततें साठीं परकयास मिळाले !

हूल स्वारांना इतर उच्च दर्जाच्या स्वारा प्रमाणें १२ पासून २५ रु. पर्यंत दरमहा पगार असे. माझ्याजवळ असलेल्या टिपणांत हूलस्वारां पैकीं सये नाक मांग या सिलेदारास वार्षिक तनखा ४०० रु. व त्याच्या हातां खालील ३ स्वारांना १००० रु. मिळत असल्याचें एक टिपण आहे. शिव्या कोळी सिलेदार यास व याचे ३ स्वारांस मिळून एकंदर १२४७ रु. ची नेमणूक होती. या वेळच्या सिलेदारांत सर्वांत मोठा सिलेदार [ माझ्या टिपणांमधील ] सीद नाक महार होय. याचे हाता खालीं १२ हरिजन स्वार असत व एक ब्राह्मण कारकून असे. कारकुनास दरमहा १५ रु. व स्वारास दरमहा १५ पासून २० रु. पगार असे; खासा सीद नाक यास सालीना ४०० रु. रोख

व १०० रु. चें कापड वगैरे मिळे. याला च मिरज संस्थानांत एक गांव [ सरंजाम ] इनाम मिळाला आहे. हा फार पराक्रमी होता. लढाईंत अनेक वेळां यानें पराक्रम गाजविल्यानें याला सरकारनें बक्षिसें दिलीं होतीं, पैकीं एकदां १५ तोळयांचें सोन्याचें कडें होतें व एकदां १५० रु. किंमतीची एक मोत्यांची जोडी होती. याचा वंश सांप्रत आपल्या इनाम गांवीं वृत्ति भोगीत आहे.

स्पृश्य जातींतील स्वारांना हि १२ पासून २५ रु० पर्यंत दर महा पगार असे. वर सांगितल्याप्रमाणें **नोकरी व वेतन या बाबतींत या दोन्ही–स्पृश्य तथा हरिजन–जातींत मुळींच फरक** नव्हता !

आपल्या कथानकाच्या वेळीं व साधारणपणें नेहमीं, आमच्या स्वराज्याच्या घोडदळांत अजमासें **तीन हजार हरिजन स्वार** होते ! या शिवाय पायदळांत आणि तोफखान्याकडे जे हरिजन असत ते निराळे ! ठोकळ मानानें असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, **एकंदर स्वराज्याच्या** ( तिन्ही प्रकारच्या मिळून ) **सैन्यांत हरिजनांची संख्या शेंकडा पंधरा पर्यंत असे** ! हे आंकडे माझ्या पाशीं असलेल्या अस्सल कागदांच्या टिपणांवरून देत आहें.

सैन्यांत या **हरिजनांचा विटाळ मानीत नसत. खाशा पंत प्रधानांच्या दलबादल डेऱ्याजवळ** मशारनिल्हे शिदनाक महार, सर्या नाक मांग, राण नाक मांग, सुभान नाक महार या विश्वासु **हरिजन शिलेदारांच्या राहुट्या असत** ! असा तो काळ होता ! अस्तु.

या हूल स्वारांच्या सामान्य पथकां मागें स्पृश्य जातीच्या बिनीचीं ( अघाडीच्या फौजेचीं ) घोडदळाचीं कांहीं पथकें असत; त्यांच्या मागें तोफखाना, त्याच्या मागें पायदळ, त्याच्या मागें स्वराज्याचा जरीपटका व भगवा झेंडा आणि साहेबी नौबत ( प्रत्यक्ष युद्धांत हीं तिन्हीं निरनिराळ्या हत्तीं वर असत. झेंड्याच्या हत्तीस " ढाल–गज " म्हणत. ढाल = ध्वज; परंतु आज त्या ढालगज शब्दाला विपरीत अर्थ आला. रिकामटेकड्या व उलाढाल करणाऱ्या स्त्रीपुरुषांना, विशेषतः स्त्रियांना हा शब्द लावला जातो ! दुर्दैव त्या शब्दाचें ! " स्वराज्य " गेल्या नंतर जशी त्या शब्दाची थट्टा किंवा कुतर–ओढ होऊं लागली व सांप्रत होत आहे तसें या " ढाल–गज " शब्दाचें हि झालें आहे ) आणि त्यांच्या संरक्षक सैन्याचा वेढा, त्याच्या मागें पंत प्रधान किंवा त्या

मोहिमेच्या सरदाराचा म्हणजे मुख्य सेनापतीचा तंबु, त्याच्या मागें पुन्हां पायदळ, त्याच्या मागें पुन्हां घोडदळ आणि सेनापतीच्या तंबूच्या उजव्या-डाव्या बाजूंस उरलेलें घोडदळ असे. या प्रमाणें आमच्या एकंदर छावणीची मिसल असे ! अस्तु.

कडेवळीत गांवीं अशा प्रकारची ती फकीरशाहीची छावणी पसरली होती. तिच्या मधोमध असलेल्या " दलबादल " डेऱ्यांत त्या फकीरी पातशाहीचे पंत प्रधान श्रीमंत थोरले बाजीराव साहेब एका साध्या गादी वर लोडास टेकून बसले होते. त्यांच्या समोर खुरमांड्या घालून मल्हारबा होळकर बसले होते. दाराजवळ एक चोपदार व एक हुजऱ्या होता. श्रीमंतांचा पोषाक अत्यंत साधा व शुभ्र रंगाचा होता. अलंकारां पैकीं कानांत चौकडा व गळ्यांत एक पाचूच्या मण्यांची माला होती. त्यांना गुडगुडीची संवय असे ! थोडीं पळें गुडगुडी ओढल्या वर—

श्री— मल्हारजी ! पैठणास गुरुदेव, भाऊसाहेब व मीं मिळून जी मसलत योजली होती, ती तुला मागेंच सांगितली. त्या मसलतीचें काम गुरुदेव, कविराज आणि भाऊसाहेब यांनीं शिरांवर घेऊन ती बरीचशी रंगारूपास आणल्याचें हि तुला माहीत आहे. सवाई जयसिंग राजे यांचा ओढा पूर्वीपासून आपल्या कडे होता, पण तो प्रत्यक्ष कृतींत उतरविण्याचें कठीण काम गुरुदेव आणि भाऊ यांनींच केलें. एवढें च नव्हें तर राजपुताना व बुंदेलखंडचा सीमा प्रांत इकडील प्रमुख राजे, ठाकूर यांच्यांतहि त्यांनीं भेद पेरून टेविला आहे !

म— माझ्या ऐकण्यांत तर असें हि आहे जे, त्यांनीं कांहीं मुसुलमान जहागीरदारांना वळविलें आहे ! मुसुलमान पातशाहीविरुद्ध मुसुलमानांस उभे करण्यास मोठ्या दर्जाची मुत्सद्देगिरी लागते !

श्री— तें खरें; आणि भाऊ तसे थोर मुत्सद्दी आहेत. गुरुदेवां बद्दल तर बोलावयास नको. तो महात्मा आहे म्हणूनच आम्हांला या पातशाहीविरुद्ध जंग करण्याची हिंमत आली आहे ! मात्र तुझी एक शंका चुकीची आहे. या पातशाही विरुद्ध मुसुलमान प्रजा किंवा सरदार उठले, याबद्दल तुला आश्चर्य वाटतें ! होय कीं नाहीं ?

म— आज्ञा ! वाटतें खरें !

**श्री**— पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. येथें धर्माचा कांहीं संबंध येत नाहीं. आज दिल्लीस मुसुलमान पातशाही ज्या प्रकारें रयतेशीं वागत आहे, त्याचा हा परिणाम आहे! समज, या पातशाहीच्या ऐवजीं तेथें हिंदूपातशाही असती व तिनें असले च अत्याचार, जुलूम चालविला असता, तर तिच्या विरुद्ध, या आजच्या मुसुलमान सरदारांप्रमाणें हिंदू सरदार व रयत उठली असती. अरे! जुलूमशाहीस हा हिंदू व मुसुलमान असा भेद नसतो. तिच्या वरवंट्याखालीं सर्व जातींची दामटी वळते! अशा प्रसंगीं जातिविशिष्ट धोरण आंखून तसें वागणें आणि उठल्या सुटल्या त्याचें तुणतुणें वाजविणें हें विन मुत्सद्देगिरीचें नव्हे निखालस चुकीचें आहे!

**म**— सरकारांचें म्हणणें सर्वस्वीं खरें आहे. थोरल्या महाराजांनीं जें धोरण स्वतः पाळलें व आमच्या साठीं आंखून ठेवलें तें असें च होतें!

**श्री** — नाहीं तर काय? दमाजी थोरात, कृष्णराव खटावकर हीं माणसें कोण होतीं? मुसुलमान होतीं काय? हिंदू च होतीं; एक तर **ब्राह्मण** होता! असें असोन त्यांनीं आमच्याशीं म्हणजे **देवा-ब्राह्मणांच्या** स्वराज्याशीं द्रोह केला! त्या वेळीं आपण त्यांची हिंदू म्हणून गय केली काय? त्यांना शिक्षा लावणें हें या आमच्या राज्याचें कर्तव्य च होतें. निजाम पुण्या वर चालून आला; त्यानें वाटेंत व पुण्यास अनेक धार्मिक अत्याचार केले म्हणून आम्हीं त्याची खोड मोडली, त्याला गाय बनविलें! पण यांत तो केवळ धर्मानें मुसुलमान ही आमची भावना नव्हती! **मुसुल-मान म्हटला कीं तो द्वेषार्ह अशी आमची आकुंचित व धर्मांध राज-नीति नाहीं! मुसुलमानी राज्यांतील अत्याचार बंद करण्यास जसे आम्ही तातडीनें धांवून जाऊं, तसें हिंदू राज्यांत चाललेल्या छळास नेस्तनाबूद करण्यास हि ताबडतोब घोडा फेंकण्यास माघार घेणार नाहीं.**

**म**— आज्ञा! आपाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे, उदाजी चव्हाण, वाडीकर खेम सावंत, फार काय कान्होजी आंग्रे व चंद्रसेन जाधवराव यांनीं या राज्यांत अत्याचार माजविला असतां थोरले नानासाहेब सरकारांनीं व श्रीमंतांनीं त्यांची खोड मोडली आहे!

**श्री**— झालें तर! तीर्थरूप नानांचा दंडक हा च होता. सांगण्याचा मुद्दा

एवढा च जे जाणत्या माणसांनीं **दुष्टांचा नाश व सुष्टांचें रक्षण** करावें आणि तें करीत असतां **जातीजातींच्या भानगडींत पडूं नये !** कुराणे-शरीफ मध्यें " **मन जाऽअ बिल हसनाति फलहू खैरुन् म्मिनहा व हुम म्मिन फज़इन् य्युमइज़िन् आमिनुना व मन जाऽअ बिस्सइअति फकु-ब्बत् वजुहुहुम् फिन्नारि**" ( जो सत्यधर्म आचरील, सुष्टपणानें वागेल त्याला उत्तम गति मिळेल, त्याला ईश्वर बक्षीस देईल, त्याला संकटमुक्त करील, त्याला न्यायदिनाच्या भयानक प्रसंगांतून वांचवील. पण जो दुष्टपणानें वागेल त्याला ईश्वर नरकाग्नींत फेंकून देईल ) हें आयत याच अर्थाचें आहे नाहीं बरें ? सारांश, **आमच्या स्वराज्याचा हा पाया आहे.** तो जोंपर्यंत शाबूत आहे तो पर्यंत ही हिंदवी पातशाही टिकेल ! भाऊसाहेब, ही पातशाही टिकविण्याच्या खटपटींत आहेत. आतां पर्यंत त्यांचे कडून जीं पत्रें येत त्यावरून त्यांच्या या उद्योगाची कल्पना चांगली स्पष्ट होते. मात्र गेल्या बरे च दिवसांत त्यांचे कडून पत्र नाहीं त्यामुळें जरा काळजी वाटते.

**म**– त्यांचें शेवटचें जें पत्र आलें होतें, त्यांत बंगपाचा व महाराज छत्रसा-लांचा झगडा चांगलाच सुरू झाल्याबद्दल व आपण त्या मनमुबींत गुरफटलों गेल्या बद्दलचा मजकूर होता. तसें च वेळ पडल्यास आपल्या सरकारी फौजेची मदत लागेल असें हि सुचविलें होतें. पण त्या नंतर मात्र पत्र नाहीं. मला वाटतें कांहीं तरी आणीबाणीची वेळ येऊन ठेपली असावी !

श्री –– होय, असें असेलसें वाटतें. पण माझा त्यांच्या मुत्सदीपणा वर व शौर्या वर फार भरंवसा आहे ! ते कोणत्या हि संकटांतून सही सलामत बाहेर पडतील; कारण त्यांचे पाठीशीं त्यांची स्वतःची व त्यांच्या तीन पूर्वजांची तपश्चर्या उभी आहे ! म्हणून त्यांचें नेहमींचें वर्तन श्रींच्या म्हणण्या प्रमाणें चाललें आहे.

" सदा देवकाजी झिजे देह ज्याचा । सदां रामनांम वदे नित्य वाचा !
स्वधर्मे चि चाले सदां उत्तमाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥–– "
जय, जय, रघुवीर समर्थ !

**म –– जय, जय, रघुवीर समर्थ !**

इतक्यांत तंबूचे बाहेर लांब अंतरावर " **जय, जय, रघुवीर समर्थ !**" असा नाद झाला !

**श्री—** ऑं ? आतां बाहेर कोणीं रघुवीराचा गजर केला ? आवाज ओळखीचा वाटतो.

**म—** आवाज लांबून व अस्पष्ट ऐकूं आल्यानें ओळख पटली नाहीं.

आतां तंबूचे दारा बाहेर पुन्हां " **जय जय रघुवीर समर्थ !** " असा गजर झाला आणि तेव्हढ्यांत चोपदार हि आंत येऊन नमन करून म्हणाला कीं, " सरकार ! भाऊसाहेब नाईक आले आहेत ! "

**श्री—** ( उठून ) मल्हारी ! चल भाऊसाहेबांना घेऊन येऊं !

दोघे उठून तंबूचे बाहेर गेले. श्रीमंतांची व भाऊसाहेबांची दृष्टादृष्ट होतां च दोघांनीं हि " **जय जय, रघुवीर समर्थ !** " म्हणून परस्परांस क्षेमालिंगन दिलें ! मल्हारराव होळकरानें भाऊसाहेबांना लवून रामराम केला. पुष्कळ महिन्यांनीं, जवळ जवळ दहा साडे दहा महिन्यांनीं ही भेट होती. दोघे श्रीराम–भरता प्रमाणें एकमेकांवर प्रेम करणारे; तेव्हां त्यांच्या बद्दल औपचारिक वर्णन देण्याची काय आवश्यकता ?

सर्व मंडळी आंत आली. श्रीमंतांनीं भाऊसाहेबांना हात धरून आपल्या गादीवर च बसविलें ! मल्हारजी पुन्हां समोर बसले.

**श्री—** भाऊसाहेब ! आपण शतायुषी व्हाल ! आतां च आपली आठवण काढली होती. प्रकृति ठीक आहे ना ?

**भा—** होय ! श्री कृपेनें ठीक च आहे.

**श्री—** राजपुतान्या कडील राजकारण आपण बरें च शिजविलें. आपलीं पत्रें येत होतीं च. आपल्या प्रयत्नानें दौलतीचा पुष्कळ च फायदा होणार आहे ! छत्रपती महाराजांनीं हि आपली नवाजीश बहुत केली !

**भा—** ही महाराजांची कृपा ?

**म—** पण अलीकडे दोन तीन महिन्यांत आपल्या कडली वार्ता कळली नाहीं. कांहीं विशेष भानगड होती काय ?

**भा—** होती ! नव्हे आहे. आपल्या कडे शेवटचें पत्र लिहिलें तें ध्यानांत असेल च ?

**श्री—** होय ! पिताजींचा व बंगषाचा झगडा सुरू झाला असोन प्रसंगीं मदतीस यावें लागेल, असा मजकूर त्यांत होता.

**भा—** तो प्रसंग येऊन ठेपला ! बंगष हा पन्नास साठ हजारांची प्रचंड

फौज घेऊन पिताजी वर घसरला आहे. त्यास अडथळा करण्याची एक मसलत योजून, राजकुमार हिरदेसांच्या हातून ती चालीस हि लाविली आहे. दुसऱ्या मसलतींत गढवाल पासून इंदुर पर्यंतचे जमीदार, आणि राजे सवाई जयसिंह यांच्या साह्यानें राजपुतान्यांतील बरचसे रजवाडे-ठाकूर सामील करून घेतले आहेत.

श्री— हा प्रचंड उद्योग आपण पार पाडला तेव्हां धन्य आहे आपली !

भा— गुरुदेवांनीं व कविराजांनीं तो पार पडला; मी नव्हें.

म— पण भाऊसाहेब ! गुरुदेवांचें आशीर्वादपर पत्र आलें होतें, त्यांत त्यांनीं आपला च पुढाकार नमूद केला आहे !

श्री — मल्हारजी ! भाऊसाहेब, आपल्या तोंडून आपल्या कार्याचें वर्णन कधीं च करणार नाहींत हें नेहमीं लक्षांत ठेव ?

भा — तें असू द्या. सध्यां पिताजी वरील संकट टाळण्यास आपल्यास तांतडी करावयास पाहिजे. त्या कामासाठीं मी तिकडून आलों. पिताजींना इकडून मदत गेली पाहिजे. त्यांनीं त्या साठीं दोन पत्रें माझ्या पाशीं दिलीं व मला रवाना केलें. एक पत्र महाराजांना लिहिलें असून दुसरें आपल्याला लिहिलें. पिताजींच्या छावणींतून निघून प्रथम मी साताऱ्यास गेलों. तेथें समजलें कीं, सरकार स्वारी शिखर महादेवा ( शिंगणापुरा ) स आहे. तेथं जाऊन भेटून पिताजींचे पत्र दिलें व मुखजबानी सर्व हकीकत कथन केली. पिताजींनीं सवड झाल्यास प्रत्यक्ष महाराजांना च बोलाविलें होतें; पण सवड न झाल्यास आपल्याला पाठविण्यास लिहिलें. महाराजांची प्रकृति थोडीशी नादुरुस्त असल्यानें त्यांनीं आपल्याला च पिताजींच्या मदतीस पाठविण्याचें ठरविलें. त्या प्रमाणें माझ्या जवळ आपल्यास देण्या साठीं स्वारांनीं आज्ञा–पत्र दिले आहे. तसें च पिताजींनीं महाराजांना लिहिलेलें पत्र हि आपल्या अवलोकनार्थ दिलें आहे.

श्री — पिताजींनीं मला हि एक पत्र लिहिलें आहे म्हणालां ना ? तें आपल्या जवळ असेल च.

भा — होय, आहे. तें खास आपल्याला द्यावयाची आज्ञा पिताजींची असल्यामुळें, तें मीं महाराजांच्या निदर्शनास आणलें नाहीं. तें मग देतों. प्रथम ही महाराजांच्या आज्ञापत्राची थैली घ्या.

असें म्हणून भाऊसाहेबांनीं आपल्या कमरेस बांधलेल्या शेल्यांतून दोन गझनीच्या थैल्या काढून त्या पैकीं एक श्रीमंतांचे हातीं दिली.

ती हातीं घेतल्यावर व तिच्या वरील मुद्रा शाबूत आहे असें पाहिल्यावर श्रीमंतांनीं त्या थैलीस आपल्या कपाळानें स्पर्श केला व मग ती उघडली. तिच्यांत दोन पत्रें होतीं.

त्या पैकीं, भाऊसाहेबांनीं प्रथम महाराज छत्रसालांचें पत्र उचलून श्रीमंतांचे हातीं दिलें.

भा — हे पिताजींचें पत्र, महाराजांना लिहिलेलें. प्रथम हें वाचावें.

श्रीमंतांनीं त्या पत्रास वंदन करून घडी उलगडली व पत्र मोठयानें च वाचण्यास आरंभ केला. पत्र पुढील प्रमाणें होतें:—

" ॥ श्रीरामजी ॥

श्री महाराजाधिराज क्षत्रियकुलावतंस महाराजा चिरंजीव श्रीशाहु छत्रपति महाराज, एते श्रीमहाराजाधिराज श्रीमहाराजा श्रीराजा छत्रसालरायज़ देव के आशीर्वाद। आपर, उहां के समाचार भले चाहिजे। इहां के समाचार, चिरंजीव विजयी भव राजेश्री बाबूजी भाऊसाहेब आप कों कथन करेंगे। अभी अधिक लिखने का समय नहीं है। आप का और हमारा भाईचारा तीन पिढीयोंसे चला रहा है। हमारे गुरु श्री मर्यादापुरुषोत्तम श्री १०८ श्री सिवाजी महाराज के आप नाती हो। जैसे बडे महाराज दुष्टों का दमन करने के लिये और सज्जनों का रक्षण करने के लिये तुरंत दौड जाते थे, वैसे आप भी हो। सुनीये:—

**सक्र जिमि सैलपर, अर्क तम फैलपर। बिघन की रैलपर लंबोदर लेखिए॥ राम दसकंधपर, भीम जरासंधपर। शाहुजी! ज्यों सिंधु पर कुंभज बिसेखीए॥ हर ज्यों अनंगपर, गरुड भुजंगपर। कौरव के अंगपर पारथ ज्यों पेखिए॥ बाज ज्यों विहंगपर, सिंह ज्यों मतंग पर। दुर्जन चतुरंगपर शाहुराज देखिए॥**

आप की प्रशंसा मैं क्या करूं?

**साजि दल सहज सितारा महाराज चलैं। बाजत नगारा पढैं धारा-धर साथसें॥ राव उमराव राना देस देस पाति भागे। ताजि ताजि गढन गढोंई दस माथसे॥ पैग पैग होत भारी डावाँडोल भुवि गोल।**

**पैग पैग होत दिग्ग मैंगल अनाथसे ॥ उलटत पलटत गिरत झुकत उझकत । शेष फन वेद पाथिन के हाथसे ॥**

महाराज! विनंति है कीं, आप, इस संकटमेंसे मुझे मुक्त करें। यदी आपको समय न मिले, तो चिरंजीव राजेश्री विजयीभव बाजीराव पेशवा को भेजना। ज्यादा क्या लिखूं? **आसीर्वाद!**

**लेखन सीमा समु झसति** "

पितार्जीचें हें पत्र वाचतांना श्रीमंतांच्या मुद्रेवर आदर व कारुण्याची छटा पसरली होती! त्यांनीं त्या पत्रास पुन्हां वंदन करून तें एकीकडे ठेविलें.

मग भाऊसाहेबांनीं श्रीशाहुमहाराजांचें आज्ञापत्र श्रीमंताचे हातीं दिलें. तें श्रीमंतांनी हातीं घेऊन प्रथम मस्तकावर ठेवून मग त्यास वंदन करून मोठ्यानें वाचण्यास प्रारंभ केला!

" ॥ श्रीरामसमर्थ ॥

स्वस्ति श्री क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहुछत्रपति स्वामि यांणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजेश्री बाजीराउ पंडित प्रधान, यांसी आज्ञा केली ऐसी जे; सांप्रत राजेश्री बाबूजी नाईक याहीं, महाराज पितार्जी तीर्थस्वरूप छत्रसाल राजे यांचें पत्र प्रविष्ट केलें. त्यांतील भावार्थः—ते संकटांत सांपडले आहेती, त्यांतून त्यांची मुक्तता होय तें करणें. त्यांहीं स्वामींस पाचारण केलें आहे. तथापि तें न बने. स्वामींचे प्रकृतीस स्वास्थ्य न होय. म्हणोन आज्ञा जे, तुम्ही तूर्त मोंगला (निजामा) वरी न जाणें. पत्रदर्शनीं पिताजींचे साह्यास जाणें. वरकड मजकूर राजेश्री बाबुरावजी मुखजबानी सांगतील त्या वरोन कळों येईल. थोरले महाराजांहीं, पितार्जीस अपत्यसमान लेखिलें! स्वामींस तरी ते तीर्थरूप श्रीशंभुराजांचे ठायीं! तऱ्ही अविलंबें त्यांची कुमक करणें. महंमद बंगष, पातशाही सुभा. ऐशियास मोगली मनसुबा. इमान देऊन आपला मतलब साधितील! त्याचा विश्वास मानावा ऐसा अर्थ नाहीं!

ज्याचे हातें पिताजींचें राजकारण असेल त्या पासोन साधावयाचें तें साधणें ! बंगाशावर, हांव भरी होवोन चालोन न जाणें.राजेश्री बाबुरावांचे विचारें वर्तावें. तुम्ही बुधमंत, कार्यकर्ते, यशस्वी, सेवक आहांत ! विचारास चुकणार नाहीं ही स्वामींस निशा आहे. तरी बहुत विचारें करून जें करणें तें करोन पिताजींची बाजू सर होऊन ये, तें करणें. पातशहा तुम्हासीं विवेकावरी आहेती; कृष्णाजीपंतीं, शहासी लगामीं लाविलें आहे. हें ध्यानीं ठेविजे. बहुत बहुत सावधपणें मनसुबा करणें. मोगली विचार तुम्हांस न कळेसा काय आहे? कुमार हिरदेसा याहीं नेताजी—गनिमाई चालीस लाविली आहे. आपला नक्षा राहोन, योजिला मनसुबा सिद्धीस पावे, ते गोष्ट करणें. जो विचार करीत असाल व घडोन येत असेल, तो वरचे वरीं हुजूर लेहोन पाठवीत जाणें.

( या पुढें, खास महाराजांनीं स्वहस्तें खालील मजकूर लिहिला होता. )

**आन वृत्त दिनचर्येचें वरचेवरी लिहिन. फुड मनसुबा काय व शहासी बोली काय, मुद्याची, तेहि पिताजी, कृस्णपंत आन बाबुराव यांचे विचारें ठरवन. आन स्वामीस लिहिन. मुख्ये अर्थ पिताजीच संकट निवारण करन. बहुत काय लिहिन. सूज्ञ असा.**

मर्या

[ सहा मेहरात्री मुद्रेत ] दयं विरा

जते "

महाराजांचें पत्र वाचतांना श्रीमंतांचे मुद्रेवर आदर व निश्चयाची झांक दिसत होती. पत्र वाचून संपल्या वर त्यांनीं पुन्हां वंदन करून तें लखोट्यांत घालून ठेवलें त्या नंतर भाऊसाहेबांनीं दुसरी थैली श्रीमंतांच्या हातीं दिली. पूर्वी प्रमाणें तिला वंदन करून त्यांतील पिताजींचें स्वतःच्या नांवाचें पत्र श्रीमंतांनीं बाहेर काढून त्यास हि मस्तकाचा स्पर्श केला आणि तें मोठ्यानें वाचण्यास प्रारंभ केलाः—

" ॥ श्रीरामजी ॥

**श्री पंडित चिरंजीव राजेश्री विजयीभव समस्त राजकाजधुरंधर श्री बाजीराउ पंत प्रधान, एते श्रीमहाराजाधिराज श्रीमहाराजा**

श्री राजा छत्रसालरायजू देव के आशीर्वाद। इहां के समाचार, चिरंजीव विजयीभव राजेश्री बाबूराव जी आपको श्रुत करेंगे। ये समय अधिक लिखनेका नहीं। आप, मेरे चिरंजीव हिरदेसा समान हो। इस आपत्तीमेंसे मुझे निकालो। यदी महाराजा चिरंजीव शाहु छत्रपतीको आनेको अवसर नहीं हो तो आप जरूर पधारिये गा। रावसाहेब—

[ राग— झिंझोटी ]

॥ मैं किहि कहों विपति अति भारी,। श्रीरघुवीर दीन हितकारी ॥ ध्रु०॥
॥ मम राज, भवन, प्रभु ! तोरा, । ताहीं वसे आय बहु चोरा. ॥ १ ॥
॥ अति कठिन करें बरजोरा, । माने नहीं विनय निहोरा. ॥ २ ॥
॥ मरदें मोहिं, जानि अनाथा,। अति करें उपद्रव नाथा ! ॥ ३ ॥
॥ कोऊ सुनै न मोर पुकारा, । भागेहु नाहिं उबारा. ॥ ४ ॥
॥ चिंता यह मोहिं अपारा, । अपयश ना होय तिहारा. ॥ ५ ॥
॥ कह छत्रसाल, सुन हो ! बाजी ! । लूटें बंगष रे ! मेरी बाजी! ॥ ६ ॥

बेटा, बाजीराव ! और तो क्या लिखूं ?

( दोहा )

॥ जो गति ग्राह-गजेन्द्र की, सो गति मेरी आज। बाजी जात बुंदेल की राखो बाजी ! लाज ॥

बेटा, बाजीराव ! तुमको सहस्र आशीर्वाद।

लेखन
सीमा समु
लसति

"

हें पत्र वाचतां वाचतां श्रीमंत सद्गदित झाले ! पत्र संपल्या वर हि किती वेळ तरी ते या च अवस्थेंत होते. त्यांचें लक्ष समोर खिळलेलें दिसलें. जणूं काय त्यांना असहाय्य पिताजी समोर दिसत होते !

एकदां द्रोणाचार्यांना यमुनेंतील एका मोठ्या नक्रानें पाण्यांत ओढलें असतां, इतर शिष्यांना गुरुदेवांस सोडविण्याचा धीर झाला नाहीं. आचार्यांनीं अर्जुना कडे आशेनें पाहिलें. त्या नरवीरानें शेवटीं नक्रास मारून गुरुदेवांस सोडविलें ! हा प्रसंग त्यांना दिसूं लागला.

दुसरा एक प्रसंग, श्रीमंतांच्या डोळ्यां पुढें आला. एकदां यमुने वर स्नानासाठीं म्हणून वसुदेव गेले होते. तेथें हि अशा च एका नक्रानें वसुदेवांचा पाय धरून त्यांना आंत ओढण्यास प्रारंभ केला. तीरा वरील लोकांचे प्रयत्न निष्फळ झाले. भगवान श्रीकृष्ण घरीं होते. त्यांना ही वार्ता कळल्या वर ते धांवत यमुनातीरीं आले आणि त्यांनीं चक्रानें नक्रास मारून पित्यास सोडविलें!

तिसरा एक प्रसंग, श्रीमंतांचे डोळे पाहूं लागले ! तो प्रसंग साक्षात् गजेन्द्रमोक्षाचा होता; आणि तो च पिताजींनीं आपल्या पत्रांत स्वहस्ताक्षरें लिहिला होता !

या प्रसंग पाहण्याच्या तंद्रींत अर्धी घटका गेल्या वर श्रीमंत भाना वर आले.

श्री— काय येथ पर्यंत अवस्था आली आहे काय ? आम्हां तरुणांचे, पिताजी हे आचार्य आहेत ! मला तर ते तीर्थरूप नानांचे ठायीं आहेत. त्यांचें संकट निवारलें पाहिजे. त्या साठीं महाराजांचा आशीर्वाद व अनुज्ञा हि मिळाली आहे. मग आतां उशीर कशाला ? मल्हारजी ! फौजेची कमरबस्ती करण्याची आमची आज्ञा आतांचे आतां सेनापतींना कळीव. उद्यां पहांटे गोरक्ष मुहूर्तें ढाला उत्तरेस फिरल्या पाहिजेत. ( जोरानें ) पिताजी, महाराज छत्रसाल ! आपण मला नानांचें ठायीं पूर्वी पासून च आहां. आज आपण हि या पत्रानें त्या नात्या वर शिक्कामोर्तब केलें ! आपणांस या संकटांतून सोडवीन तर च नानांच्या पोटीं जन्म घेतल्याचें सार्थक ! ( रागानें उभें राहून ) बंगष ! पिताजींना एकाकी समजून त्या वृद्ध गजेंद्रास पकडणार काय ? तूं मोठा नक्र असलास आणि तुझें बळ, त्या जुलमी पातशाहीच्या दर्याच्या आश्रयानें जरी अतुल असलें तरी ( छाती वर हात मारून ) हा बाजीराय, हा विसाजीरूपी विष्णु, या माझ्या ( भाऊ साहेबांच्या पाठी वर डावा हात ठेवून ) मित्राच्या, या गरुडाच्या, या वैनतेयाच्या साह्यानें, एका झेपेंत तुझ्या वर झडप घालून ( उजव्या हातानें तरवार निष्कोशित करून ) तुला अल्लाचे भेटीस पाठविल्या शिवाय व त्या माझ्या गजेन्द्रास मुक्त केल्या शिवाय कदापि हि रहाणार नाहीं ! !

भा— रावसाहेब ! आपलें हें वचन प्रमाण पाहून माझें हृदय उचंबळून येत आहे. मल्हारराव ! श्रीमंतांच्या आज्ञेची तामीली करा. रात्रीं पुढील मसलत ठरवूं. जय, जय, रघुवीर समर्थ ! रावसाहेब ! या मोहिमेंत गुरुदेवांनीं " **जय, गजराज** " हा परवलीचा शब्द ठरविला आहे आणि तो सध्यां चालूं आहे.

श्री— " **जय, गजराज** " ! हा शब्द ठरविला काय ? उत्तम ! योग्य ! मग उद्याच्या निर्याणास हा एक शुभ शकुन च होय ! "**जय, गजराज**" !

भा— **जय, गजराज** !

म-- **जय, गजराज** !

दुसरे दिवशीं पहाटें ही फकीर–शाहीची छावणी तेथून हालली. ती उत्तरेच्या मार्गास लागली. दर कूच दर मजल करीत सैन्य नर्मदे वर येऊन थडकलें. तत्पूर्वी तीन दिवस भाऊसाहेबांनीं एक आजुरदार काशीद, सांडणी वरून नंदलालजी कडे पाठवून आपण येत असल्याचें व ठरल्या प्रमाणें हंडिया, नालछा इत्यादि तीन चार घाट मोकळे करून ठेवण्याची सूचना केली होती. त्या प्रमाणें श्रीमंताचें सैन्य हंडिया जवळ आलें तेव्हां त्यांना तो घाट खुला करून ठेवलेला आढळला. नंदलालजींनीं सामोरे येऊन श्रीमंतांची व भाऊसाहेबांची भेट घेतली. मंडलोईजींनीं सैन्याची सर्व प्रकारची व्यवस्था, सरबराई राखली. त्यांच्या आग्रहानें एक मुक्काम तेथें झाला.

रात्रीं श्रीमंतांच्या दलबादल डेऱ्यांत मंडळी बसली होती. नंदलालजी माळव्यांतील " देवतार्चना "ची झडती श्रीमंता जवळ देत होते ! इतक्यांत चोपदारानें येऊन कळविलें कीं, " बाहेर एक मुसुलमान फकीर, सरकार भेटीच्या अपेक्षेनें उभा आहे ! " तें ऐकून भाऊसाहेब बाहेर आले. थोडया पळांनीं ते आंत येऊन, त्यांनीं निवडक मंडळी खेरीज इतरांना रजा दिली. मग ते श्रीमंतांच्या जवळ येऊन त्यांनीं त्यांच्या कानांत कांहीं सांगितलें. श्रीमंत उठले. दोघे कनार्थीचे बाहेर गेले. बाडा बाहेर, सांईजी आपल्या एकतारीची तार छेडीत खालीं मान घालून आपल्याशीं च "**आझादी विद्या फैलायेंगे** " असा कायसासा गाण्याचा एक चरण गुणगुणत होते ! मिर्ध्यानें [ चोपदार ] श्रीमंत व भाऊसाहेब आल्याचें सांईजीस हळूंच सुचविलें. त्यांनीं वर पाहिलें; हळूं च " **जय गजराज** ! " म्हटलें. या दोघांनीं त्यांना वंदन

केलें. त्यांनीं "**जय, जय, रघुवीर समर्थ !**" या ब्रीद वाक्यानें यांना आशीर्वाद दिला !

तिघे जण डेऱ्यांत आले. भाऊसाहेब पुढें होते, त्यांनीं खूण केल्या वरून आंतली सर्व मंडळी उठून उभी राहिली व तिनें सांईजी आंत आल्या वर त्यांना वंदन केलें. श्रीमंतांनीं सांईजीस गादी जवळ बसविलें.

श्री— कविराज ! काय बातमी आहे ? ही मंडळी खलबतखान्यांतील च आहे; तेव्हां यांचे समक्ष सांगण्यास कांहीं हरकत नाहीं. नंदलालजी ! भूषणजींना आपण ओळखलें च असेल !

नंदलालांनीं होकारार्थी मान डोलावली !

भू— भाऊसाहेबांनीं पिताजींचें पत्र आणलें तों पर्यंतची बातमी आपल्याला ठाऊक च आहे. नेताजी – गनिमाईचा मजकूर हि त्यांनीं सांगितला असेल. त्या नंतर तिचा उपक्रम हि पत्र द्वारें आपल्याला कळविण्यांत आला. त्या पुढील घटना आतां सांगावयाची आहे.

असें म्हणून कविराजांनीं महंमद बंगषानें ठरविलेली चंदनगडाची गुप्त मसलत बयान केली. ती ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. मग कविराजांनीं आपली एकतारी जवळ घेऊन तिची खुंटी बाहेर काढली, खुंटी काढून एकतारीच्या दांडींत त्यांनीं बोट घालून कागदाची एक अगदीं लहान सुरळी बाहेर काढून भाऊसाहेबांच्या हातीं दिली !

भाऊसाहेबांनीं ती मोकळी केली.

भू— ही चिठ्ठी महाराज कुमारांनीं दिली आहे.

श्री— भाऊसाहेब ! वाचा पाहूं.

भा— सांकेतिक आहे.

श्री— संकेत नेहमींचा आहे ना ?

भा— नाहीं ! या मसलत प्रकर्णा साठीं आम्हीं मुद्दाम नवीन बनविलेला आहे !

श्री— मग तर आपण च वाचा !

नं— ( हंसून ) भाऊसाहेब ! संकेत नका वाचूं ! उलगडा करून वाचा ! आपण बनविलेला संकेत आपण च उकलून वाचल्या शिवाय आम्हां सर्वांना कसा समजणार ?

भा— ( हंसून ) ठीक, तर ! ऐका—

" ॥ श्रीरामजी ॥

**सेवेसीं विनंती. उपरी. नेताजी गनिमाई अंधीं साधली. जैतपुरीं पांच हजार फौज आहे. खान मकरी. त्यानें बाकीची कुल फौज गुप्तपणें वाघवनांतील चंदनगडा वरी ठेविली आहे. संधि साधोन आम्हांस बंदींत टाकोन, पिताजी वर दोन्ही फौजा येकवटोन चालोन जाणार. योग्य ती तजवीज करणें."**

( मकरी = कावेबाज )

**भा**— हें पत्र मानसिंहानें लिहिलेलें दिसतें. शेवटीं महाराज कुमारांनीं " **जय गजराज** " हीं अक्षरें स्वहस्तें लिहून पत्र पुरें केलें आहे !

**श्री**— खानानें असा डाव टाकला आहे काय ? थोडया वेळानें याचा विचार करून काय ठरवावयाचें तें ठरवूं. कविराज लांबून आले आहेत. तूर्त त्यांची व्यवस्था करावयास पाहिजे.

मंडळी उठली. नंतर दुसरे दिवशीं निवडक मंडळींत बसून भाऊसाहेबांनीं व श्रीमंतांनीं एक मसलत ठरविली. त्या बद्दलचीं दोन सांकेतिक पत्रें लिहून दोन सांडणीस्वार रवाना करण्यांत आले. एक पिताजींच्या कडे व दुसरा महाराज कुमारांकडे गेला.

मसलतींत ठरल्या प्रमाणें नंदलालजींना हंडिया येथें च राहण्यास सांगण्यांत आलें. कदाचित् बंगषाचें पत्र जाऊन निजाम पिच्छा वर आला तर त्यास येथें अटकाव करण्यास कोणी तरी पाहिजे च ! श्रीमंतांची छावणी हालली. आतां रोजच्या मजली लांबीच्या धरल्या गेल्या.

अशा च एका मजलीचा रस्ता, मराठी लष्कर काटीत होतें. सकाळची वेळ होती. रस्ता माळव्यांतील होता. मागें सांगितल्या अनुक्रमानें फकीर शाहीचें सैन्य वाट चालत होतें. आमचें सैन्याचें कूचाचें नेहमींचें गाणें निराळें होतें. तथापि या खेपेस तें बदललें होतें.

सैन्य, उत्तर हिंदुस्थानांतून जावयाचें होतें. कामगिरी हि या प्रांतांतील होती. तेव्हां इकडील हिंदुमुसुलमान वगैरे सर्व जातींना, त्यांत हि किसान, मजदूर, खेडूत यांना तें गाणें सहजा सहजीं समजावयास पाहिजे, इतक्या सोप्या हिंदी भाषेंत तें रचलें होतें. पंडितांची संस्कृत-

प्रचुर हिंदी किंवा मौलवींची फारशीअरबीप्रचुर उर्दू भाषा या सामान्य जनतेला काय समजणार ? शिवाय या गाण्यांत, हें शिवशाहीचें सैन्य कोणत्या कार्या साठीं निर्माण करण्यांत आलें, थोरल्या महाराजांचें स्वराज्य स्थापण्यांतील ध्येय काय, सुष्टांचें पाळण व दुष्ट निर्दाळण करीत असतां त्या दुष्टांबद्दल हि सूड–भावना कशी नसावी, त्यांच्या अत्याचारांवरून शेवटीं स्वतःचा देह हि कसा वारून–ओंवाळून–टाकावा, गरिबांचे दुःख मिटविण्या साठीं स्वतःचें सर्व आयुष्य नंग्या फकीरींत कसें वेचावें, त्या गरीब भाईंना संकटांतून पार कसें पाडावें, प्रतिपक्षियांच्या व अज्ञानी आणि स्वतःबद्दल मत्सरानें लोकांत बुद्धिभेद मुद्दाम माजविणाऱ्या नाकर्त्या, उत्तराच्या आणि शिखंडीच्या वर्गांतील स्व-पक्षियांच्या शिव्या गाळ्या व अवहेलना शांतपणें कशा सहन कराव्या, दरिद्री नारायण अर्धपोटीं आयुष्य वेंचीत आहे तेव्हां स्वतः शिळी भाकर व कोरडे हरभरे खाऊन अंतरात्मा कसा शांत करावा, आणि शेवटीं आझादीची विद्या साऱ्या भारतांत कशी फैलवावी आणि त्या आझादीच्या आनंदाची झळक पतितांनीं अनुभवावी म्हणून प्रसंगीं नंगे होऊन सूळा वर जाण्याचा प्रसंग आला तर हंसत हंसत कसें चढावें इत्यादि भावना प्रगट करावयाच्या होत्या ! !

ही सर्व कल्पना भाऊसाहेबांची होती ! तीस अनुसरून वरील साऱ्या भावना ज्यांत उघडया होतील, सामान्य जनतेच्या हृदयास जाऊन भिडतील, असें हें गाणें रचण्यास त्यांनीं कविराजांस पूर्वी च सांगितलें होतें. त्यांच्या हातचा तो मळ होता ! त्यांनीं आपल्या तिकमापूरच्या कुलस्वामिनी भुइया देवीचें ध्यान केलें. ध्यानाच्या तंद्रींत त्यांना स्फूर्ति झाली. त्या दैवी स्फूर्तीनें, त्या आंतल्या आवाजानें एक गाणें रचून म्हटलें ! भूषण हे तर श्री "सरस्वतीचें निजस्थान" होते ! त्यांच्या पाशीं **कला व सद्विद्या** दोन्ही होत्या. सद्विद्ये विरहित कला ती अवकळा, ती कळावंतिणीची कला ! त्यांच्या जवळ कलेचें व सद्विद्येचें माहेर होतें. त्यांच्यांतील, माळणी–कोळणींना हि लाजविणारें भांडण तेथें नव्हतें. कविराजां जवळ नुसती एक काव्य–कला नसून, त्यांचें जीवन नाना कलांनीं व्यापिलें होतें. त्यांच्या काव्यांत पुरुषार्थाचें वैभव, जगदेश्वराचें महत्त्व, मोक्षाचा पडिभर समर्थ–संप्रदायाच्या गुप्त पंथाचें सार, स्वधर्माचा आश्रय, मनाचा मनोजय, सामर्थ्यवंतांची सत्ता, सकळ सिद्धींचा निर्धार इत्यादि अलौकिक गुण होते. त्यांचें काव्य नुसतें "शृंगारिक टिपडें" नव्हतें ! गाणें रचल्या नंतर

भाऊसाहेबांस त्यांनीं म्हणून दाखविलें. त्यांना तें आवडलें. सर्व जनतेला समजण्या साटीं तें हिंदी–हिंदुस्थानींत रचलें होतें !

एक दोन दिवसांत कविराजांनीं तें सर्व सैन्या कडून पाट करून घेतलें. आज हि या सकाळच्या वेळीं कूच चालू असतां हें गाणें चालू होतें. गाण्याच्या ताला वर सैनिक चालत होत ! कविराज एक एक चरण म्हणत होते व सर्व सैन्य त्यांची साथ करीत होतें. गाणें पुढील प्रमाणें होतें:—

( राग जंगला, ताल चलंत )

**" हम नंगे उमर बितायेंगे । भारत पर वारे जायेंगे ॥ धृ० ॥**
**सूखे चने चबायेंगे । भाईयोंको पार लगायेंगे ॥ १ ॥**
**रूखी रोटी खायेंगे । गरीबों के दुःख मिटायेंगे ॥ २ ॥**
**गाली ताना: खायेंगे । आनंद की झलक दिखायेंगे ॥ ३ ॥**
**सूलों पर नंगे जायेंगे । आजादी विद्या फैलायेंगे ॥ ४ ॥ "**

शिपायांच्या मांडचोळण्याच्या गजव्यांत आणि स्वारांच्या खोगिरा वर टाकलेल्या पडशांत कच्चे हरभारे होते. गाणें गातां गातां सैनिक सकाळची न्यहारी म्हणून ते " सूखे चणे " चावत होते ! सैनिक च काय पण खासे पंत प्रधान व भाऊसाहेब हि, घोडे साधारण सत्रक चालीनें चालत असतां, आपल्या पडशांतून आदल्या रात्रीची भाकर हातांत घेऊन, कोरड्यास कांहीं नसतां हि ती तसली " रूखी रोटी " खात होते !!

इतक्यांत रस्त्याच्या कडेस मक्याचीं शेतें लागलीं. हा फाल्गुनाचा महिना होता. माळव्यांत फाल्गुनांत मका शेतांत उभा असतो. मक्याची ही एक निराळी जात असून तिला तिकडे रिंगणी म्हणतात.

मक्याचें जवळचें शेत पाहून श्रीमंतानीं मागें पाहून लेंडी-स्वारास म्हटलें–

**श्री–** अरे ! शीद नाक ! या शेताच्या मालकास घेऊन ये !

शीद नाक शेतांत गेला. त्यानें आपल्या बरोबर त्या शेताच्या मुसुलमान मालकास बरोबर आणलें. मुसुलमानानें तें लष्कर पाहून जीव टाकला ! तो गर्भगळीत होऊन लटलट कांपूं लागला ! त्याला शीद नाकानें श्रीमंतां पुढें उभें केलें. शेतकऱ्यानें कांपत कांपत सारखा कुर्निसात करण्याचा सपाटा लावला !

**श्री–** मिय्या ! यह खेत आपका है ?

**शे–** ( कांपत, घोड्या पुढें जमीनी वर साष्टांग दंडवत घालून ) जी, हां !

जहांपन्हा ! यह...खे...खेत...जहांपन्हां का (स्वतः कडे बोट दाखवून) यही गुलाम का...है...स...स...सरकार ! मैं आपका...गुलाम...खिदमतगार...बंदा...हूं. (पुन्हां पायां पडला).

श्री– (त्याचे पाठीवर हात फिरवून) मिय्या ! डरना मत ! गये साल इस खेतका वसूल आपने कितना पाया ?

शे– (धीर धरून व हात जोडून) गरीब परवर ! खरीपका वसूल पांचसों असरफिया हुवा...मगर—

श्री– मगर क्या हुवा भाई ?

शे– (दुःखानें) मगर गाम के पटेलने उसमेंसे ढाई सों असरफीया जुलूम जबरदस्तीसें छीन लियी, सरकार !

श्री– रब्बी का तो कुच वसूल हुवा होगा न ?

शे— नहीं, जहांपन्हा ! खेतमें अच्छा फसल (धान्य) आया था...लेकीन...

श्री— लेकीन क्या ?

शे—(संशयाच्या दृष्टीनें सर्व सैन्या कडे व श्रीमंता कडे पाहून) जहांपन्हा ! आप पातशाही सिपाहसालर, अमीर उल् उमरा...

श्री— भाई मैं समझा ! हम पातशाही अमीर नहीं ! मैं फकीरशाहीका सिपाही हुं ! यह सब लष्कर मेरा हैं. अब डरना नहीं ! जो कुच्छ सच्ची बात होगी सो बता देना !

शे— (धीरानें) कहता हूं सरकार ! खेतमें फसल खडा था, उस वख्त शाही फौज इधरसे जाती थी; लष्करनें मेरा खेत लूट लिया ! गरिबोंका कोई वाली नहीं सरकार ! (त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले)

श्री— अच्छा ! तो उस रब्बी की कितनी किंमत आती ?

शे— चारसों असरफिया, हुजूर !

श्री— ठीक ! हाल खेतमें जो रिंगणीका फसल खडा है उसकी किंमत कितनी होगी ?

शे— (हात जोडून) अंदाजा, छ सों असरफिया, जहांपन्हा !

श्री— (शेजारीं मल्हारराव होळकर होते. त्यांच्या कडे वळून) मल्हारी ! तुझ्या हमीणींतील पंधरा शें असरफिया या शेतकऱ्यास दे ! मिय्या ! साल गुदस्त तुम्हारे पटेलनें और शाही फौजनें तुम्हारा जो साढा छ सों असरफिया

का नुकसान किया, उसके बदले ( मल्हारराव साडे सहा शें असरफिया देतात त्या घेऊन ) ये साढा छ सों असरफिया लो ! मेरे लष्कर के लिये तुम्हारे ये रिंगणीका फसल की मुझे जरूरी है. तुमने इसकी किंमत जो छ सों असरफिया कही ( मल्हारराव सहा शें असरफिया देतात त्या घेऊन ) सो ये ले लो ! और ( मल्हारराव पुन्हां अडीच शें असरफिया देतात त्या घेऊन ) ये ढाई सों असरफिया, हम तुमको बक्षीस देते हैं ! अब खेतकी यह फसल हमारे सुपूर्द करनेके लिये, तुम्हारी कुच्छ तक्रार तो नहीं ?

शेतकऱ्यानें पंधरा शें असरफिया घेतल्या ! त्याचा आनंद गगनांत मावेना ! त्याला हें जणूं स्वप्न च वाटलें ! साऱ्या हयातींत त्याला असला प्रसंग कधीं हि अनुभवास आला नव्हता ! कसा येणार ? जुलुमी साम्राज्यांत असा प्रसंग कधीं च अनुभवास यावयाचा नाहीं !

शे— ( एक सारखा पायां पडून सद्गदित ) गरीब परवर ! आप कौन हो वह मैं नहीं जानता ! लेकिन ( ढालगजा वरील भगव्या ध्वजा कडे पाहून ) इस निशान परसे सूझता है कीं, पूना साताराके पातशहाके आप कोई बडे सरदार हो ! ( हात जोडून ) हुजूर ! जिस पादशाहींमें, सरकारके मुवाफिक गरीब परवर पैदा होते हैं, उस पातशाहीको और पातशाहको कभी बुरा वख्त नहीं आवेगा ! ( पायां पडून ) खुदाताआला सरकारको और सरकार के पातशाहको हमेषां आनंदमें रक्खें. हमारी दिल्लीवाली पातशाही जुलमी, कहारी बन चुकी है ! भगवान आपको सुखी रक्खे ! ( पुन्हां पायां पडतो )

श्रीमंत व त्यांच्या बरोबरीची मंडळी हळू हळू पुढें चालूं लागली. श्रीमंतांनीं व भाऊसाहेबांनीं शेतांतून हिरव्या मिरच्या व मक्याचीं कणसें आणवून तीं तशीं च हातावर चोळलीं आणि त्यांचा तो कच्चा हुरडा खात खात व मिरच्या तोंडीं लावीत ते पुढें निघाले !

श्रीमंतांनीं मल्हाररावास पुढील वळणार सैन्याचा दुपारचा मुक्काम करण्यास आज्ञा फर्माविली. मल्हारराव त्या तजविजेस लागले. श्रीमंत व भाऊसाहेब वळणाकडे गेले. त्यांच्या मागोमाग पिछाडीचे स्वार हि गेले. शेतकरी तेथें च उभा राहिला होता. त्याचे डोळ्यांतून सारखे आनंदाश्रु टपकत होते. आतां सरते शेवटचा स्वार त्याच्या जवळ आला. त्याला शेतकऱ्यानें सलाम करून विचारलें—

शे— नाईक साहेब! यह कौनसे सरदार की सवारी है?

स्वा— ( ऐटींत ) अरे, भाई! यह दक्खनके पेसवा साहेब की सवारी है!

शे— क्यौं नाईक साहेब! नीले, बूंदवाले, घोडे पर जो सवार थे, वे कौन थे? उनका जरीका पट्टेदार पाग था, उसमें हुम्मा के पीस का तुर्रा, जडाव का सरपेच, पन्नाकी कुइरी और मोतीयोंका तुर्रा था; पाग के अंदर सरत्राण था; कानों मे चौकडा था; अंग में गर्दनसे घुटने तक बख्तर था; एक हाथ में ढाल और दूसरे में समशेर थी, दहने बाजू कमान और तीरकी भातोडी थी! वे सरदार उंचेपुरे, गोरे और सूरतपाक थे! उन्होंने मेरा खेत का फसल खरीद किया! वे रिंगणीके भुट्टे हाथपर मलते थे और मिर्च के साथ दाना खाते थे!! नाईक साहेब! वे सरदार कौन थे?

स्वा— ( आनंदानें ) अरे, भाई! वे ही पेसवा साहेब! हम मरेठे तुम्हारे पातसाही फौजके तरीके लूटफाट नहीं करते! जो कोई सिपाही लूटफाट करे, रयतको सताये, तो उसका हाथ या पैर कलम करनेका हमारा फौजी रीवाज है!

शे— ( सद्गदित ) अहा! माषाल्ला! वे ही पेशवासाहेब! वे पेशवासाहेब आदमी नहीं, देव हैं! खुद खुदा हैं! गरीबोंका, किसानोंका, मजदुरोंका दुःख जाननेवाले हैं! गरीब नवाज हैं! गरीब परवर हैं! गरीब पालनहार हैं! उन्हीके लष्करमें के नाईकसाब! आपकी शुक्रगुजारी करता हूं! (सलाम करतो)

स्वा— अलेकुम सलाम! मेरे दोस्त!

दोन प्रहरची वेळ होत आली म्हणून वळणा जवळील एका राईत ओढ्याच्या कांठीं या छावणीचा तळ पडला. दुपारचें जेवण करून लागलीं च पुढें कूच व्हावयाचें होतें; म्हणून डेरे-राहुट्या न लावतां च सैन्यानें झाडां खालीं तळ ठोकला.

इकडे तो मुसुलमान शेतकरी आपल्या शेताच्या पलीकडील थोड्या अंतरावर असलेल्या एका शेतांतील मोटवणा वर येऊन दाखल झाला. तेथें बहुतेक मुसुलमान शेतकरी दुपारचें जेवण जेवीत बसले होते! याला पाहून एक शेतकरी म्हणला—

शे— का रे, अहंमद! त्या लष्करानें तुझें शेत लुटलें कीं नाहीं? काय

करशील, बाबा? जो येतो तो आम्हांस लुटतो! आमच्या या पादशाहीनें तर कहर चालविला आहे! नाहीं रे महंमद?

**म**— नाहीं तर काय अल्ली! पाटला पासून पादशाहा पर्यंत सर्व च आम्हांस लुटतात. पाटील पांच असरफिया खाईल तर पातशाहा पांच लाख मोहरा खाईल!

**बहादूर**— आणि जसा पातशाह तसें त्याचें लष्कर! लष्करानें आपल्या वाटेंत जेवढीं शेतें लागतील त्या सर्वांची खुशाल पायमल्ली करावी! किसानांचीं घरें लुटावीं व मजुरांना वेठीस धरावें!

**शिकंदर**— त्यातलें च हें लष्कर असेल! नाहीं रे, अहंमद? बरें बाबा! तूं स्वतः सहीसलामत सुटलास एवढें च पुष्कळ झालें! जाऊं दे पीक गेलें तर!

**अह**— दोस्त हो! तुमचा सर्वांचा अंदाज साफ चुकला! ते आमचें पातशाही लष्कर नाहीं!

**म**— (आश्चर्यानें) अँ? मग कोणाचें?

**अह**— अहो! तें मरेठ्यांचें आहे! पूना-सातान्यास त्यांचा पातशहा राहतो ना? त्याचें आहे.

**अल्ली**— अरे! दिल्लीवाला मुसुल्मान पातशहा काय अगर पूना सातान्याचा मरगट्टा पातशहा काय? दोन्ही सारखे च!

**म**— नाहीं तर काय? दोघे हि रयतेस लुटणारे गरीबांचे काळ!

**ब**— दोघांचें हि लष्कर म्हणजे भूतखाना! किसानांच्या मुंड्या मुरगळणारी सैतानशाही!

**अह**— दोस्त हो! तसें नाहीं. आपली दिल्लीची पातशाही तुम्हीं म्हणतां तशी भूतखान्याची आहे! सैतानी आहे! पण, मरेठ्यांची तशी नाहीं!

**अल्ली**— मग काय ती देवांची आहे?

**अह**— होय! होय! देवांची आहे! त्यांच्या लष्कराचा असा सख्त नियम आहे कीं, किसान, मजदूर, रयत यांना छळावयाचें नाहीं; लूटफाट करावयाची नाहीं! बायकांच्या अंगास हात लावायचा नाहीं! शेत किंवा गांव लुटणाऱ्याचे हातपाय छाटले जातात!

**म**— अरे, वाः! हें सच असेल तर मरेठ्यांची पातशाही म्हणजे हरून

अल् रशीदची, अकबरशहाची, जहांगीरची पातशाही झाली ! बेहष्त झाली !

अह — होय ! बेहष्त आहे ! स्वर्ग आहे !

असें म्हणून अहंमदनें आपल्या पोटकुळीस खोंचलेली एक अंगोछा ( रुमाला ) ची पुरचुंडी सोडली व तींतून असराफिया काढल्या ! सर्वजण आश्चर्यानें " आ " वासून त्याचेकडे पाहूं लागले !

म — अहंमद ! अरे हें काय ?

अह — अरे, या असरफिया ! एक नाहीं, पंधराशें ! मरेठेशाही म्हणजे देवांची पातशाही मीं म्हटलें ना ? हा त्याचा पुरावा !

असें बोलून अहंमदनें आपली सर्व हकीकत हळूं हळूं सर्वांना सांगितली. सर्वांना फार अचंबा वाटला !

अह — अहो ! एवढा मोठा पेशवा, सर्व मरेठेशाहीचा वझीर-इ-आजम ! पण घोड्यावर बसून रिंगणीच्या भुट्ट्यांना हातां वर मळून त्याचा कच्चा च हुरडा खातो आणि मीरच तोंडीं लावतो ! अहो ! आमच्या पातशाहींतील मिजास जशी त्या पेशवासाहेबाजवळ नाहीं, तशी च त्याचे शिपायां पाशीं हि नाहीं ! ते रुखे चणे खातात व मजली मारतात !

ब — अरे ! असें जो वागेल, तो च रयतेस जुलूमशाहींतून सोडवील आणि आजादी मिळवून देईल !

अह — अहो ! त्यांचें कूचाचें गाणें च तसें आहे !

त्या वर सर्व जण म्हणूं लागले कीं, " चला ! आपण त्या पेशवासाहेबां कडे जाऊन आपापलीं पिकें बेचन करूं; म्हणजे आमच्या पातशाहीनें लुटालूट करून जीं आमचीं घरें धुवून नेलीं त्यांत थोडी फार तरी लक्ष्मी खेळेल व आमच्या औरतां बच्यांच्या तोंडांत तोंडभर तरी घांस जाईल ! चला ! चला ! "

खरोखर ती सर्व मंडळी श्रीमंतांच्या छावणीकडे आली. अहंमदनें पहिल्या चौकी वरील पहारेकऱ्याला आपल्या येण्याचें कारण सांगितलें. त्यानें योग्य ती व्यवस्था करून गांवकऱ्यांची विनंति श्रीमंताच्या कानांवर जाईल अशी तजवीज केली. श्रीमंतांचा खास मिर्धा आला व त्यानें या मंडळीस थेट श्रीमंत विश्रांति घेत होते त्या स्थळीं नेलें.

मंडळीनें पाहिलें कीं, चार मोठे भाले जमीनीमध्यें गाडले आहेत, त्यां वर एक कांबळें आच्छादलें आहे. त्याच्या छायेंत जमिनी वर नुसता एक घोड्या-वरील गाशा हांथरला आहे व त्यावर दोन पुरुष रिंगणीचा हुरडा खात बसले असून, तोंडीं लावण्यासाठीं हिरव्या मिरचा व कोथिंबीर मधून मधून खात आहेत !

अहंमदनें हळूं च सर्वांना सांगितलें कीं, " त्या दोन पुरुषां पैकीं चौकडा कानांत असलेली व्यक्ति म्हणजे च मरेठे पातशाहीचे, वझीर–इ–आजम होत"! तें ऐकून त्या सर्वांना फार आश्चर्य वाटलें. त्यांना प्रथम तें खरें वाटेना ! कारण उघड होतें. त्यांच्या पातशाहीच्या वझिराची त्यांना भेट होणें हें च प्रथम अशक्य ! खेडुतांना, वझिरापर्यंत प्रवेश मिळावयाचा कसा ? एकाद्या शिपायानें, फार तर त्याच्या जमादारानें खेडुतांची भेट घ्यावयाची व त्यांना धाक दप-टशा देऊन किंवा त्यानें काम होत नाहीं असें दिसून आल्यास हाणमार करून त्यांच्या कडून आपली–छावणीची–सरबराई करून घ्यावयाची ! यदाकदाचित् नशीब शिकंदर असल्यास वझिराचें दर्शन लांबून व्हावयाचें ! वझिराचा थाट काय विचारावयाचा ? बहुमोल कापडाचा त्याचा शामियाना असावयाचा, त्याची गादी ठेवण्या साठीं मुरादाबादचा एक उंची कारागिरीचा कोच असा-वयाचा, त्यावर गजनीच्या कापडाची गादी असावयाची, मागें टेकण्यास भर-जरी लोड व दोन्हीं बाजूंस दोन गिरद्या असावयाच्या, समोर उत्कृष्ट कुसरीच्या चौरंगावर लखनौची उत्कृष्ट गुडगुडी असावयाची, मागें पुढें पांच सहा हुजरे असावयाचे ! वझीर आपल्या घरीं असो किंवा मोहीमशीर होऊन एकाद्या रानांत त्याचा डेरा लागलेला असो, त्याच्या या थाटांत, बडेजावींत रती भर फरक व्हावयाचा नाहीं ! या गोष्टी या शेतकऱ्यांना माहीत होत्या आणि म्हणून त्यांनीं असल्या साध्या स्थितींत जेव्हां श्रीमंतांना पाहिलें तेव्हां त्यांना वर सांगितल्या प्रमाणें प्रथम " हे च वझीर–इ–आजम, " हें खरें वांटे ना !

अहंमदनें श्रीमंता पुढें साष्टांग कुर्निसात केला व आपल्या सोबत्यांची इच्छा सांगितली. त्यांनीं–सध्यां आवश्यकता नसतां हि, गरिबांना दोन पैसे मिळून त्यांच्या तोंडांत चार दाणे जावे म्हणून–भरपूर किंमत देऊन त्या किसानांचें पीक विकत घेतलें !

या कृत्याचा नैतिक परिणाम त्या किसानांवर फार झाला! दिल्लीच्या पातशाहींतील व मराठ्यांच्या पातशाहींतील ठळक फरक त्यांना स्पष्ट दिसून आला! त्यांनीं अगदीं अंतःकरणापासून मराठे पातशाहीला दुवा दिला!

परत जातांना एक किसान म्हणाला— "भाई हो! मरेठ्ठेंची पातशाही म्हणे फकीरी पातशाही आहे! तेव्हा तिचा वझीर-इ-आजम ज्याला व्हावयाचें असेल त्यानें आपलें सारें आयुष्य असें च वितविलें पाहिजे! दोस्तों!—

**कहीं है बादशाहे तखतेनशीं। कहीं कासा लीये गदा देखा।**
**कहीं आबद बना कहीं जाहद। कहीं गरीब का पेशवा देखा॥"**

---

# सुरुंगा खालीं सुरुंग ! [ पाकळी सहावी. ]

**ज्ञाते सुरङ्गापथे प्रतिसुरङ्गां कारयेत् ।**

शत्रूच्या सुरुंगाची दिशा समजली म्हणजे त्या सुरुंगाचा नाश करण्या साठीं आपण प्रतिसुरुंग म्हणजे काटसुरुंग निर्माण करावा ही राजनीती च आहे !

गुरुदेव व भाऊसाहेब यांनीं ठरविलेली नेताजी–गनिमाई महाराजकुमारांनीं केली, पण ती अर्धवट साधली. महंमद बंगष जरी मदांध होता तरी अगदीं च अक्कलशून्य नसल्यानें त्यानें या गनिमाईच्या खालीं एक सुरुंग खोदला. त्याचें वर्णन मागें आलें आहे. आतां या सुरुंगाला कसा उडवून द्यावयाचा, तो कसा निष्फळ करावयाचा याचा विचार हिरदेसांस पडला. एक सबंध दिवस त्यांनीं विचार करण्यांत घालविला.

त्या दिवशीं संध्याकाळीं जैतपूरच्या गडा खालीं एक सांडणीस्वार येऊन थडकला. रात्र पडूं लागली तेव्हां तो हळूं हळूं गड चढून वर गेला. स्वार मुसुलमान असल्यानें व त्यानें खुद्द महंमदखानास भेटावयाचें आहे असें सांगितल्यानें मुख्य वेशींतून आंत प्रवेश मिळण्यास त्याला फारसा त्रास झाला नाहीं. शिवाय त्याचा पोषाक आणि रुबाब शाही स्वाराचा होता !

स्वारानें प्रथम खान ज्या वाडयांत होता तो रस्ता धरला. पण बरा च रस्ता चालून गेल्यावर व रस्त्या वर थोडें थांबून आणि आपल्या कडे कोणाचें लक्ष नाहीं असें हेरून त्यानें तो रस्ता सोडला व सरकार वाडयाचा सुधारला !

वाड्याच्या पहारेकऱ्यास त्यानें कांहींसें सांगितलें. पहारेकरी आंत जाऊन थोड्या वेळानें बाहेर आला आणि त्यानें आपल्या शेजारच्या दुसऱ्या पहारेकऱ्यास त्या स्वाराला दिवाणखान्यांत घेऊन जाण्यास सांगितलें.

स्वार आंत गेला. तेथें महाराज कुमार होते. त्यांना पाहून स्वारानें लवून वंदन केलें आणि " **जयगजराज** ! " असा शब्द उच्चारून एक पत्राची थैली आपल्या अंगरख्याच्या आंतील गजव्यांतून काढून त्यांच्या हवालीं केली. कुमारांनीं थैली घेऊन व तिची मुद्रा पाहून ती फोडली व आंतील सांकेतिक पत्र काढून वाचलें. पत्र श्रीमंतांकडून आलेलें होतें व त्यांत एक प्रकारची योजना उद्धृत केली होती. ती अत्यंत गूढ व श्लेषार्थानें मांडली असल्यानें कुमारांखेरीज इतर कोणाला हि तिचा बोध झाला नसता !

कुमारांनीं हुजऱ्यास स्वाराची व्यवस्था लावण्यास व थोड्या वेळानें मानसिंह व नूरखान यांना बोलावून आणण्यास सांगितलें. दीड घटकेनें मानसिंह व नूरखान दिवाणखान्यांत येऊन दाखल झाले. कुमारांनीं श्रीमंताकडून आलेल्या पत्राची बातमी त्यांना न सांगतां, महंमदच्या चंदनगडच्या कारस्थाना वर काय उपाय योजना करावी त्या बद्दल त्यांचा सल्ला विचारला.

**नू**— महंमदानें असा डाव टाकला आहे खरा. त्यानें पांच हजारां खेरीज बाकीची सर्व फौज चंदन गडावर गुप्तपणें ठेविली असून त्या वर काईमला नेमलें आहे.

**मा**— एवढें च नाहीं तर संधि साधून प्रथम महाराज कुमारांना दग्यानें पकडून चंदनगडाचे भुयारांत बंदींत टाकावयाचें आणि अचानक पिताजी महाराजां वर हल्ला करून त्यांना पकडावयाचें ! नूरखान ! महंमदला आपल्या दोघांचा हि संशय आला आहे. आपल्या हातून थोडेसें जरी संशयास्पद वर्तन घडलेलें त्याच्या नजरेस आलें तरी आपल्या दोघांना हि चंदनगडचें भूयार पहावें लागेल !

**हि**— म्हणून आपण तिघांनीं आतां फार सावधपणें वागलें पाहिजे.

**मा**— तें तर खरें च, पण मुख्य काम हि साधलें पाहिजे. तिकडे काईमनें पिताजीं वरील हल्ल्याचे गडबडींत ताईसाहेबांना अचानक पळवून नेण्याचें ठरविलें आहे !

**नू**— चंदनगडास मीं माझा एक विश्वासु माणूस पाठवून तेथें हें सैन्य

असल्याची खात्री करून आपल्यास कळविलें च होतें ! मग आतां पुढची व्यवस्था कशी करावयाची ?

हि— या व्यवस्थेचें सामान्य स्वरूप आपण ठरविलें पाहिजे, हें खरें ! तेवढ्या साठीं मी इतके दिवस विचार करीत होतों. सध्यां खाना जवळ दोन्हीं ठिकाणची धरून पस्तीस चाळीस हजार फौज आहे; आतां आपली फौज पाहूं. माझे स्वार पांच शें व नूरखान ! आपले दोन हजार मिळून येथें आपली प्रत्यक्ष अशी अडीच हजार फौज आहे. आज, येथील महंमदच्या फौजे वर जर आपण हल्ला केला तर त्याचा पराभव करूं ! कारण येथें त्याची पांच हजार फौज आहे. आमचा एक शिपाई शत्रूच्या चौपट लोकांना भारी आहे. पण या कृत्यानें सर्व काम भागत नाहीं. काईम व त्याची प्रचंड फौज तशी च शिल्लक राहते. तिचा धुव्वा उडविण्यास आपल्याला श्रीमंत व गुरुदेव यांच्या येण्या पर्यंत वाट पाहिली पाहिजे. ही कालगत कशी लावावी तिच्या बद्दल माझ्या मनांत एक कल्पना ठरत आहे ! महंमदाला त्याचा डाव खेळूं देऊं; पण तो पुरा होण्याच्या ऐन वेळीं उधळून देऊन, उलट त्याचे च गळ्यांत अडकावून देऊं ! त्यानें नेताजी–गनिमाई मोडण्या साठीं जो सुरुंग खणला आहे, त्या सुरुंगा खालीं आपण आपला सुरुंग खणूं आणि ऐन वेळीं त्याचा सुरुंग उडवून देऊं !

मा — म्हणजे नाटकांत पुन्हां एक नाटक होणार तर ?

हि — होय ! मात्र या पोट–नाटकांत आपण तिघे च प्रमुख पात्रें आहों ! ( स्वगत ) श्रीमंतांच्या पत्रांत भाऊसाहेबांनीं लिहिलेली योजना, जशी सर्वच्या सर्व यांच्या जवळ प्रगट करावयाची नाहीं, तशीं, श्रीमंत व भाऊसाहेब यांचीं नांवें हि प्रकट करावयाचीं नाहींत ! ( प्रकट ) हें नाटक कसें रंगवायचें तें उद्दिक ठरवूं. मात्र त्यांतील पहिल्या प्रवेशाचा प्रारंभ, मानसिंग ! तुमच्या हातून करविणार आहे. त्याची नांदी कशी म्हणावयाची तें मग सांगेन !

नू — मला वाटतें नाटकास सुरुवात करण्या पूर्वीं सवाई राजेसाहेब, श्रीमंत सरकार, पिताजी महाराज आणि गुरुदेव यांना या नाटकाचें सूत्रमय संविधानक कळवून ठेवावें म्हणजे गोंधळ होणार नाहीं.

हि— तें अवश्य करूं. ( स्वगत ) वास्तविक तशी व्यवस्था श्रीमंतांनीं

आधीं च केली आहे. पिताजींना ही मसलत समजली आहे व त्यांचे कडून बाकीच्या मंडळीला ती आतां पर्यंत समजली हि असेल. पण यांना हें सर्व आतां च उघड करून सांगणें योग्य नाहीं. ( प्रकट ) मानसिंह ! तुम्हांला व तुमच्या हेरांना या प्रसंगीं बरेंचसें आणि तें हि जबाबदारीचें काम पडेल. तुमच्या या खुपिया बेहड्यांत आपल्या बाजूस वळलेलीं व अत्यंत विश्वासु अशीं किती माणसें आहेत ?

**मा**— आपल्या कामा पुरतीं आहेत. अशांना, दुय्यम प्रतीच्या कामांवर पाठविण्यास मुळीं च हरकत नाहीं ! अव्वल दर्जाचें काम मी स्वतः कडे ठेवून घेतों.

**हि**— ठीक आहे ! उद्यां या च वेळीं दोघे येथें या. मीं योजलेला बेत, श्री कृपेनें पार पडेल असें माझें मन मला सांगतें.

इतक्यांत एक हेर आला व त्यानें सर्वांना वंदन करून, तो मानसिंहाचे कानीं लागला. त्याचें म्हणणें ऐकून घेऊन मानसिंहानें त्याला बाहेर लावून दिले.

**मा**— ( आनंदानें ) सरकार ! मोठ्या आनंदाची बातमी ! आपल्या नाटकास शुभ शकुनानें प्रारंभ झाला !

**नू**— कोणता शकून रे ! तास पक्षी डावे बाजूनें गेला कीं ( हंसून ) बाज पक्षी उजवे बाजूनें उडाला ?

**मा**— नूरखान ! तुमच्या शेवटच्या शब्दाप्रमाणें च झालें आहे ! बाज पक्षानें नर्मदेवरून उड्डाण केलें असून, त्याची झेंप जवळजवळ येत चालली आहे !

**हि**— ( स्वगत ) हें मला आधीं च समजलें आहे. एक गोष्ट मात्र उत्तम आहे कीं, मानसिंहाचे हेर, हेरगिरीचीं कामें चांगल्या प्रकारें बजावीत आहेत. श्रीमंतांचा स्वार व याचा हा हेर एके च दिवशीं ही बातमी घेऊन येतात या वरून ही हेरगिरी चांगली चालली आहे खास. ( प्रकट ) हें खरें काय ?

**मा**— अगदीं खरें ! आंता आलेला हेर ही च बातमी घेऊन आला होता ! **जय गजराज !**

**नू**— खरें च आहे तर मग. **जय, गजराज !**

**हि**— श्री समर्थांची कृपा ! **जय, गजराज !**

थोड्या वेळानें कुमाराचा निरोप घेऊन नूरखान व मानसिंह निघून गेले.

दुसरा दिवस गेला. तिसरे दिवशीं काईम हा चंदनगडाहून जैतपूरच्या किल्ल्यांत गुप्तपणें येऊन दाखल झाला. संध्याकाळीं तो आपल्या खोलींत सचिंत बसला होता. दुल्लया त्याचे बरोबर च येथें आला होता. त्यानें तयार करून दिलेली गुडगुडी ओढीत व तोंडानें एक गाणें गुणगुणत काईम बसला होता. तो मनाशीं हळूं हळूं पुटपुटूं लागला.

का— माझ्या कारभाऱ्या जवळ त्या अस्मानी परीस कशी पकडावी या बद्दल चर्चा केली होती; परंतु त्याचें डोकें या कामीं बथड ठरलें. बाबांचे प्रमाणें या हिरदेसाची मला हि अडचण आली आहे आम्हां दोघांना हि याला दूर कसा करावा याची तरकीब कांहीं सुचत नाहीं. या कामीं फार उशीर करणें ठीक दिसत नाहीं. झटपट व गुप्तपणें काम उरकलें पाहिजे कारण बहुतेक बुंदेलखंड जिंकला गेला व त्या वर मांडलिक राजा म्हणून हिरदेसाची नेमणूक हि झाली. त्या मुळें छत्रसाल आतां वर तोंड करणार नाहीं, सारांश बाबांचें इकडील काम संपलें. छत्रसालाचा धुव्वा उडविण्याचा त्यांचा हेतु आहे खरा; पण त्यांचा कांहीं नेम नाहीं. लहर फिरली तर ते एकदम दिल्लीस परत फिरतील, मग माझें काम कसें होणार ? म्हणून झटपट करून हें पन्नाचें रत्न – हा पन्ना – चोरून आणलें पाहिजे ! माझ्या मनांतून तिची छबी हलत-नाहीं, तिच्या सौंदर्यास कोठें तोड आढळली नाहीं. खुद्द बादशाही जनान-खान्यांत हि असलें स्वर्गीय सौंदर्य नसेल ! हे प्यारी ! ( प्रकट )—

**“ क्यौं मुंह छुपाओ हमसे ? तकसीर क्या हमारी ? । हर दमकी हमनशीनी, फिर यह हजाब क्या है ? ॥ ’**

ऐ परी ! मी तुझ्या विरहानें जळत असतां, माझ्या पासून तोंड कां छप-वितेस ? माझा कांहीं अपराध कां आहे ? आपण दोघे सदोदित एकत्र रहावें अशी माझी इच्छा होती व आहे म्हणून तर बाबांच्या या मोहिमेंत मी दाखल झालों ! आतां या मोहिमेच्या कटकटीतून सुटलों. या मसलतींत मानसिंहाचा उपयोग होईलसें वाटतें.

असें म्हणून काईमनें मानसिंहास बोलावण्यास हुजऱ्या पाठविला. थोड्या वेळानें मानसिंह आला व त्यानें थोडें जोरानें खांकरलें. त्या मुळें काईम भाना वर आला व त्यानें याच्या कडे पाहिलें. मानसिंहानें आदब बजावली. काईमनें त्याला जवळ बसण्यास सांगितलें.

**मा**— खानसाहेब ! आपली अशी ही काय स्थिति झाली आहे ! असे उदास कां बनलां ? आणि आपण तर सैन्यासह दिल्ली कडे गेलां होतां ना ? मग इकडे परतलांत कसे ?

**का**— ( स्वगत ) याला खरें सांगावयास काय हरकत आहे ? याला पूर्वी पासून माझें हें – त्या परीचें – गुह्य माहित च आहे ! ( प्रकट ) मानसिंह ! मी वांटेतून च परतलों. कांहीं काम आहे. तें असो. माझ्या उदासीचें कारण तुम्हांस माहीत असून पुन्हां कां विचारतां ?

**मा**— ( आठवल्या सारखें करून ) खानसाहेब ! आपण काय म्हणतां तें मला अजून समजत नाहीं !

**का**— अहो ! त्या कारणा साठीं तर तुम्ही उज्जनीची यात्रा केली होती !

**मा**— ( आठवल्या सारखें करून ) अ ? ... हां ... हां ... तें ताई-साहेब प्रकरण ?

**का**— होय ! तें च तें प्रकरण !

**मा**— मग आतां काय त्याचें ? माझ्या बावळटपणा मुळें तें सिद्धीस गेलें नाहीं ! माझ्या कसुरी बद्दल माफी असावी ! ( दुःखानें ) माझ्या मुळें आपलें काम बिघडलें !

**का**— ( त्याचे पाठी वर हात मारून ) त्या बद्दल वाईट वाटूं देऊं नका, त्या बाबतींत तुमचा दोष नव्हता; आणि त्या बद्दल मीं मागें च नाहीं का तुम्हांस माफी केली ? छीः ! आता काय त्याचें ? पण त्या च विषयीं मी तुम्हांस कांहीं विचारणार आहें !

**मा**— आपले फार उपकार आहेत या गरीब नोकरा वर ! पण, आतां तशी संधि येईल कीं नाहीं याची मला शंका आहे ?

**का**— कां म्हणून ?

**मा**— कारण, ती तर सध्यां तिच्या पिताजीच्या घरीं बंदोबस्तांत आहे !

**का**— ( आर्जवानें ) ती आपल्या हातीं लागणार नाहीं कां हो, मानसिंह ?

**मा**— कशी लागणार ? मागची गोष्ट निराळी होती; त्या वेळीं पंछी घरट्या बाहेर होता ! आतां तो बंदिस्त घरट्यांत आहे.

**का**— ( स्वगत ) हा युक्तिबाज आहे. बुढ्या व बुरसलेल्या कारभाऱ्या पेक्षां, या जवान व डोकेबाज मानसिंहाचा सल्ला आपल्याला उपयोगी पडेल. याचे

पाशीं आपली योजना उघडी करून ठरविण्यास हरकत नाहीं ! (प्रकट) मान-सिंह ! तुम्ही माझे विश्वासु मित्र आहां ना ?

**मा**— अशी शंका आपल्याला कां आली ? शंका येण्याजोगें वर्तन माझ्या हातून आतां पर्यंत घडल्याचें मला तर कांहीं आठवत नाहीं !

**का**— पण मीं कधीं तसें म्हटलें ? म्हणून च तर हें काम पुन्हां तुमच्या सल्ल्यानें करावें म्हणतों ! पण—

**मा**— पण काय ? मी आपल्या गळ्याची शपथ घेऊन सांगतों कीं, माझ्या हातून होईल ती मदत मीं आपणांस करीन !

**का**— शाबास ! कोणती हि युक्ति करा पण तिला पकडून माझ्या हवालीं करा.

**मा**— ( स्वगत ) महाराजकुमारांनीं ठरविलेल्या नाटकाची नांदी रचण्यास वेळ आपोआप चालून येत आहे. हें जाळें विणण्याची सुरुवात केली पाहिजे ! सुरुंगा खालीं खोदावयाच्या काट सुरुंगाची पहिली कुदळ आतां मारली पाहिजे ! ( प्रकट ) मीं प्रयत्न करीन च पण आपण हि कांहीं युक्ति ठरविली असेल ना ?

**का**— अजून ठरविलीं नाहीं; ठरवायची आहे आणि त्यांत तुमची मदत पाहिजे आहे. प्रथम या महाराजकुमारांना समजूं न देतां हें काम कसें उरकावें याची पंचाईत पडली आहे !

**मा**— ( विचार करून ) तें मी करतों. ( त्याचे कानांत ) या प्रमाणें केलें पाहिजे. ही गोष्ट महाराजकुमारांचे मनांत भरवून त्यांना येथून हाल-विण्याची खटपट मी करीन. पण पुढचें काम सोपें नाहीं.

**का**— पण, राजा छत्रसालांची छावणी कोणत्या गुप्त ठिकाणीं आहे तें अजून कोठें आपल्याला समजलें आहे ?

**मा**— अरे, हा ! मी किती विसराळू ? तें च सांगण्यास मी आतां आलों होतों; पण आपल्याला दुःखांत निमग्न झाल्याचें पाहून सांगावयाचें विसरलों ! खानसाहेब ! किस्मत आपके उपर बहोत प्यार है ! राजाजींच्या छावणीचें ठिकाण, माझ्या हेरा कडून आतां च मला समजलें !

**का**— ( आनंदानें ) कोठें आहे ती छावणी

**मा**— आपल्याला सांगितलें तरी तें स्थळ आपल्या ध्यानांत येणार नाहीं.

कारण तें ठिकाण फारसें कोणाच्या ऐकिवांत नाहीं. तें असो. ( विचार करून ) मीं आतां सांगितल्या प्रमाणें महाराजकुमारांना बाहेर लावून देऊं व मग आपल्या सैन्या सह राजांजी वर अचानक हल्ला करून ताईसाहेबांस पकडूं ! पण एक शंका मनांत आली आहे.

**का**— कोणती ?

**मा**— आपल्या जवळ तर सारे पांच हजार सैन्य आहे. राजांजी जवळ हि साधारण इतकें च लष्कर आहे. तेव्हां हें काम पार कसें पडावें ? कारण राजाजींचें लष्कर जिवा वर उदार झालेलें असणार. ( विचार करून ) एक आपलें चुकलें. ( स्वगत ) तुझ्या तोंडून तुझा म्हणजे तुझ्या बापाचा सुरुंग उघडा करतो.

**का**— काय चुकलें ?

**मा** — आपण आपली सर्व फौज दिल्लीस पाठविली ती चूक झाली. निदान दोन तीन हजार तरी येथें ठेवण्यास पाहिजे होती. ( विचार करून ) पण आतां काय ? होऊन गेली ती गोष्ट ! आतां याला काय तोड करावी ?

**का**— मानसिंह ! निरुत्साही होऊं नका. मीं व बाबांनीं हि आतां पर्यंत तुमचे जवळून एक गोष्ट चोरून ठेविली होती; पण आतां सांगतों; कारण त्या मुळें तुमच्या मसलतीस जोर येईल !

**मा**— कोणती गोष्ट ? खानसाहेब ! आपण माझ्या वर पूर्ण विश्वास ठेवल्या खेरीज—कोणती हि गोष्ट चोरून न ठेवतां–मला हें नाजूक काम कसें पार पाडतां येईल ?

**का**— थोडी माझी चूक झाली खरी. पण बाबांचा तसा हुकुम होता म्हणून ही चूक केली; असो. हें पहा ! आतां तुम्हीं म्हणालां त्या प्रमाणे आपली फौज दिल्लीस पाठविली नाहीं—

**मा**— ( आश्चर्यानें ) ऑं ? पाठविली नाहीं ? मग ती कोठें आहे ?

**का**— तें च सांगतों. बाबांना, महाराजकुमारांनीं तसें करण्यास सांगितलें होतें खरें, पण त्यामुळें त्यांना कुमारांचा संशय आला. तथापि कुमारांना त्याचा सुगावा लागूं नये आणि आपलें काम हि अडूं नये म्हणून त्यांनीं कुमारांच्या या सल्लयाच्या किल्लया खालीं एक सुरुंग पोखरला ! त्यानीं बाह्यात्कारीं कुमारांचें म्हणणें मान्य करून, ती दिल्लीस पाठवावयाची फौज (हळूं च)

तिकडे न धाडतां त्या वाघवनांतील चंदनगडा वर गुप्तपणें ठेविली आहे. मला हि तेथें च त्यांनीं ठेविलें आहे. मी काल तेथें च होतों. आतां तेथून च आलों व तुम्हांला मुद्दाम बोलावणें पाठविलें! मग त्या फौजेनें आपलें काम भागेल ना ? ही गुप्त गोष्ट फक्त बाबा, त्यांचा दिवाण, मी व माझा कारभारी यांना च माहीत आहे. संभाळा ! बाहेर फोडूं नका !

मा— नाहीं ! (आनंदानें) वाः ! वाहवा ! फार उत्तम झालें. देव पावला ! बाबासाहेब व आपण मुत्सद्दीपणांत बिरबलास हि मागें सारलें आहे ! बस ! बस ! एवढ्यानें आपलें काम सहज भागेल ! आतां आपली मसलत मीं सहज पार पाडीन. आतां मला दुप्पट हुरूप आला ! मी आतां पासून च तयारीस लागतों. तरी मला शंका आली कीं आपण दिल्लीच्या मार्गास लागलां आणि आज इकडे कसे येतां व मला निरोप कसा धाडतां ? बरें ! आपण किंवा बाबासाहेबांनीं राजाजीं वरील हल्ल्याचा एखादा दिवस ठरविला आहे काय ?

का— नाहीं. अजून ठरविला नाहीं. तो ठरविण्या साठीं तर बाबांनीं मला येथें बोलाविलें ! पण आतां तें काम तुम्हीं च करा. तुम्हीं कराल तें मीं बाबांना सांगेन. या नाटकाचे या पुढें तुम्ही च सूत्रधार ! नाटक मात्र चांगलें रंगलें पाहिजे !

मा— तें आतां सांगण्याची गरज नाहीं. मात्र या पुढें माझ्या सल्ल्यानें आपण व बाबासाहेब यांनीं चाललें पाहिजे ! हें नाटक असें चांगलें रंगवितों कीं, आपल्या दोघांना त्याची आठवण साऱ्या जन्मभर येत राहील ! (स्वगत) याची कामुक वृत्ति चेतविली पाहिजे; तिच्या पाया वर माझ्या नाटकाची उभारणी होणार ! (प्रकट) त्या परीला पकडायची आहेना ? तिला प्रयागला घेऊन जावयाचें आहे ना ?

का— [ हर्षानें ] होय, तर! तेवढ्या साठीं तर ही सारी खटपट !

मा— ठीक आहे ! मी तें सारें करतों ! मात्र माझ्या वर सारा विश्वास ठेवा; आणि मीं सांगेन त्याचे बाहेर यत्किंचित् हि तुम्हीं किंवा बाबासाहेबांनीं पाऊल टाकूं नका ! आतां रजा घेतों. थोड्या दिवसांत सर्व बेत योजून आपल्यास कळवीन.

का— बाबां बद्दल तुम्हीं मुळीं च काळजी करूं नका ! ते माझ्या मुठींत

आहेत ! माझ्या वरील प्रेमा मुळें माझ्या कोणत्या हि गोष्टीस ते आडकाठी आणीत नाहींत ! शाबास ! मानसिंह ! तुमच्या मसलतीनें, आज मेरा नसीब कुतुब मिनार पर चढ गया है !

मानसिंह मनांत हंसत व बाह्यतः गंभीर मुद्रा करून काईमला सलाम करून निघून गेला. रात्रीं महाराजकुमारांच्या खलबतखान्यांत मानसिंह येऊन दाखल झाला. तेथें कुमार व नूरखान बसले होते, कुमारांना मानसिंहानें वंदन केलें.

**हि**— काय, काय झालें मानसिंह ?

मानसिंहानें काईमशीं झालेल्या गोष्टी व बेत सांगितला.

**मा**— येथ पर्यंत नाटकाची सुरुवात झाली. सरकार ! आतां फक्त स्थळ व दिवस ठरवावयाचा आहे, तो आपल्या विचारें ठरवूं.

**हि**— शाबास मानसिंह ! तुम्ही काईमच्या अंतरंगांत बरे च शिरला आहां. दिवस ठरवावयाचा तो श्रीमंतांचे व सवाई राजांच्या प्रतिनिधींच्या आणि गुरुदेवांच्या येथें येऊन पोहोंचण्याचे सुमाराचा ठरविला पाहिजे. होय कीं नाहीं नूरखान ?

**नू**— जी, हां ! श्रीमंत तर दोन तीन मजलां वर आले आहेत; तसें च सवाई राजेसाहेबांनीं गुरुदेवांच्या हातां खालीं धाडलेल्या फौजेचा हि तळ सुमारें इतक्या च पेणां ( पेण=मुक्कामाची जागा ) वर आहे. तुमच्या हेरां कडून अशी च बातमी आली आहे ना मानसिंह ?

**मा**— होय ! अशी च.

**हि**— मग या सर्व बातम्यांचा मेळ घालून दिवस नक्की करूं; नक्की केल्या वर त्याची बातमी, पिताजी, गुरुदेव व श्रीमंत यांना कळवूं. प्रथम तो काईम व महंमद यांच्या तोंडून कायम करून घेतला पाहिजे. सध्यां तुम्ही काईमला मुहूर्त काढून देणारे ज्योतिषी बनलां आहां, खरें ना मानसिंह ?

**मा**—( हंसून ) आज्ञा !

**नू**— तसें च आणखीं एका बाबतींत तुम्हांस तसें बनलें पाहिजे. आलें का लक्ष्यांत ?

**मा**— होय ! स्थळाच्या ना ?

**नू**— होय ! स्थळाचे बाबतींत. सध्यां पिताजींचा तळ आहे, ती जागा

आपल्यास तितकीशी सोयीची नाहीं. कारण तेथें जाळें पसरल्यास हा महंमद कोल्हा त्यांतून निसटण्याचा संभव आहे; म्हणून जागा बदलली पाहिजे व निवडावयाची ती अशी मोक्याची पाहिजे कीं शाही लष्करांतील एक हि आदमी तेथून निसटूं शकणार नाहीं! महाराजकुमार! या बाबतींत आमच्या दोघां पेक्षां आपल्याला च जास्त माहिती असणार!

हि — खरें आहे. मीं सर्व बुंदेलखंड पालथा घातला आहे! पिताजींच्या शिकवणी प्रमाणें माझ्या राज्यांतील सर्व मार्‍याच्या जागा अनेक वार हिंडून स्मरणांत कायमच्या दाखल करून ठेविल्या आहेत! गनिमी लढाई खेळण्यास असल्या माहितीची फार जरूरी असते. शत्रूस मैदानांतून ओढून काढून आपल्यास पाहिजे असलेल्या अडचणीचे जागीं त्याला खेंचून आणून, तेथें त्याच्याशीं लढून त्याचा धुव्वा उडवायचा तर असल्या जागांची पुरेपूर माहिती पाहिजे या गोष्टी पिताजी, शिवाजी महाराजां जवळ शिकले! पहाड, त्यांतील दरे, दरकुटे, खनाळ, वांकणें, घाट्या, नद्यांच्या दरडी, खळ्या, विशेषतः या आपल्या चंबळच्या भुडळ्या, फटे (फांटे) यांची मला चांगली माहिती आहे!

या नंतर अर्धा घटका कुमार, विचारांत गढून गेले. मग—

हि— मला वाटतें आपली योजना सर्वतोपरीं शेवटास जाण्यास "काळघाट" ही जागा फार सोईस्कर आहे.

नू— त्या घाटाचे सामान्य स्वरूप कसें आहे?

हि— चारी बाजूंनीं अत्यंत उंच पर्वत असून त्यांच्या आंत हें काळ-घाटाचें मैदान आहे. हे पहाड अतिशय बिकट असून मैदानांतून त्या वर चढून जाणें आज पर्यंत कोणांस च साधलें नाहीं! शिवाय त्या पहाडांच्या पोटांत, एकाएकीं दृष्टीस न पडणार्‍या अशा कांहीं गुंफा आहेत! मैदान सपाट नसून, साधारण चढउतारांचें व अनेक भुडळ्यांनीं भरलेलें आहे; त्यांत पुष्कळ च सैन्य मावूं शकेल. त्यांत शिरण्यास पूर्व – पश्चिम तोंडाची अशी एक खिंड – घाट – असून तिची लांबी, दोन तोंडांची मिळून, एक दीड कोस आहे. भुडळ्यांत हि छपून बसण्यास जागा आहेत घाटाच्या एका बाजूच्या पर्वताच्या पलीकडे एक दुसरें मैदान आहे, त्याला "अंगार मैदान" म्हणतात. तेथें अनेक कोटी काजवे, सूर्यास्ता पासून सूर्योदया पर्यंत चमकत असतात! या वरून ती जागा कशी असेल तें तुम्हीं समजूं शकाल! त्याच्या

लीकडे चंदनगड आहे. सारांश, सर्व अंगांनीं आपल्यास उपयोगी पडणारें हें स्थळ आहे! ही जागा हलेकांच्या फारशी माहितींतील नाहीं ही गोष्ट हि आपल्या फायद्याची आहे!.... हो! आणखी हि एक गोष्ट आहे... (स्वगत) पण ही गोष्ट यांना सांगूं नये; किती झालें तरी हे दोघे हि मूळचे शत्रुपक्षीय. म्हणून पहाडांवरील .... सर्व भांडवल आतां फोडूं नये ... श्रींच्या आज्ञे प्रमाणें आपला मगज कांहीं तरी राखला पाहिजे! (प्रकट).... पण ती तुम्हांस आयत्या वेळीं दाखवून तुम्हां सर्वांना आश्चर्यचकित करून सोडावयाचें माझ्या मनांत असल्यानें, ती सध्यां सांगत नाहीं!

नू— कांहीं हरकत नाहीं. समरांगणाचें इतकें वर्णन समजलें, तेवढें पुरें. बरें, आतां व्यूह कसा रचावयाचा व कोणत्या दिवशीं चंदनगडचा मुरुंग, त्या खालीं आपला सुरुंग लावून उडवावयाचा आणि त्या च वेळीं रणधुमाळी कशी माजवावयाची त्याचा बेत ठरवूं.

त्या नंतर बरा च वेळ या तिघांनीं एकत्र बसून कांहीं एक बेत — मसलत —मुक्रर केला. त्या बेताच्या पूर्णते साठीं कुमारांना जैतपूर गडाहून हलणें आवश्यक होतें; नाहीं तर त्यांना बंदींत टाकण्याचें महंमदानें योजलें होतें तें सिद्धीस जाण्याचा संभव होता! त्याचा हा सुरुंग लटका पडण्या साठीं या मंडळीनें बैठकींत काट — सुरुंग तयार केला!

दुसरे दिवशीं मानसिंहानें, काईमची एकांतांत भेट घेतली व त्याला कांहींसें सांगितलें. काईमला तें ऐकून फार आश्चर्य वाटलें आणि मानसिंहाच्या कारस्थानी—बुद्धी बद्दल त्याला फार आदर वाटला. मानसिंह परत जाण्यास निघाला, तेव्हां काईमनें, “आपण हा सर्व बेत बाबां कडून मान्य करून घेऊं” असें त्यास वचन दिलें.

मा—पहा, खानसाहेब! ती परी तुम्हांला जलदीनें मिळवायची आहे ना? मग या बेता खेरीज दुसरा उपाय नाहीं. या च कारस्थानानें ती तुमच्या हातीं लागेल! बरें या मसलतीनें कुमार हि आपल्या मार्गांतून आपोआप दूर होत आहेत. तेव्हां, या साऱ्या गोष्टी, हे सारे मुद्दे, बाबासाहेबांना समजावून सांगा व त्यांची पूर्ण संमति घ्या; आणि मला त्या प्रमाणें म्हणजे बाबासाहेबांची संमति मिळाली आहे, असें आज सायंकाळीं कळवा म्हणजे रात्रीं खलबतखान्यांत कुमारांना घेऊन येतों.

**का–** ( आनंदानें ) तें सर्व मी करतों. बाबा, माझ्या शब्दा बाहेर नाहींत. कसें हि करून ती नाजनी माझ्या हातीं लागली पाहिजे ! बरें, तर तुम्ही आतां जा. संध्याकाळीं मी तुम्हांस निरोप धाडतों.

मानसिंह निघून गेला. थोड्या वेळानें काईम आपल्या बापाच्या दिवाण-खान्यांत गेला. तेथें महंमद व मलिका बसली होती. मलिकेनें दिलेले शराबीचे जाम, महंमद पीत होता. काईम आलेला पाहून मलिका तेथून उठून आपल्या खोली कडे निघून गेली.

नंतर काईमनें, त्याला मानसिंहानें सांगितलेला बेत, हळू हळू बापास सांगितला. महंमदानें पहिल्या सपाट्यास तर तो बेत मोडून काढला; पण काईमनें त्याची नाना प्रकारें समजूत घातल्या वर शेवटीं तो कबूल झाला. नाहीं तरी त्याला महाराज छत्रसालांचा पुरा मोड करावयाची इच्छा होती च आणि आतां पर्यंत ती सफळ झाली नव्हती. काईमनें जी योजना सुचविली, तिचा सर्व बाजूंनीं विचार करून आपली इच्छा पूर्ण होईल असें त्याला वाटल्या वर च त्यानें काईमनें म्हणणें कबूल केलें ! बापाची संमति व अनुज्ञा घेऊन काईम आपल्या कोठींत परत आला व त्यानें संध्याकाळीं मानसिंहास, रात्रीं कुमारांना खलबतखान्यांत घेऊन येण्या बद्दलचा निरोप पाठविला !

रात्रीं ठरल्या प्रमाणें खलबतखान्यांत महंमद व काईम बसले असतां, महाराजकुमार, मानसिंह व नूरखान तेथें आले. बापलेकांनीं कुमारांचें खडी ताजीम देऊन स्वागत केलें. हुजऱ्यास राबता बंद ठेवण्यास, महंमदानें हुकूम केला. त्यानें च बोलण्यास प्रारंभ केला.

**म–** मग, राजासाहेब ! आपण जावयाचें नक्की ठरवितां तर? मला काईमनें तसें सांगितलें म्हणून विचारतों !

**हि–** होय, खानसाहेब ! मला गेलें च पाहिजे ! आमच्या घराण्यांत हा कुळधर्म आज अनेक पिढ्या चालत आला आहे ! चैत्र शुद्ध एकादशीस या गरुडेश्वर क्षेत्रांतील गरुडवाहनाचें दर्शन वडील राजपुत्रानें घेऊन तो समारंभ पार पाडला च पाहिजे ! हा एकंदर उत्सव पांच-सहा दिवसांचा असतो. तो नवमीस सुरू होऊन पौर्णिमेस संपतो. म्हणजे निदान हा आठवडा तरी मला येथें राहतां येणार नाहीं ! माझा अगदीं नाइलाज आहे !

**नू—** कुळधर्म च आहे म्हणतां, मग तेथें दुसरा उपाय नाहीं !

**का**-- नूरखानांचें म्हणणें दुरुस्त आहे. पण आपण सर्व लवाजम्या सह जाणार काय ?

**हि**— नाहीं. माझ्या पांचशें स्वारां पैकीं, बरोबर संरक्षणा करितां म्हणून फक्त शंभर स्वार नेईन; बाकीचे येथें च राहतील. तूर्त आपल्या इकडे शांतता आहे. दंगाधोपा बिलकूल नाहीं, तेव्हां अधिक स्वार नेण्याची जरूरी नाहीं.

**म**— जशी आपली इच्छा. काय मानसिंह ! तुम्हांस काय वाटतें ?

**मा**— ( महंमदास डोळ्यानें खुणावून ) राजाजींच्या कुळधर्माच्या आड कोण कशास येणार ? त्यांना जाऊं द्यावें !

**का**— मला हि तसें च वाटतें. ( महंमदास खूण करतो )

**म**– माझी मुळींच हरकत नाहीं ! महाराजाजी ! म्हणजे एक आठवडा आपण या धार्मिक कृत्यांत अडकणार तर ? आज अष्टमी आहे; उद्यां पासून सप्ताहास प्रारंभ करावयाचा म्हणजे आज च आपणांस येथून निघालें पाहिजे

**हि**-- होय ! मी सारी तयारी करून च आतां आपली परवानगी घेण्यास आलों आहे. आपण परवानगी दिली, आनंद झाला ! आतां ताबडतोब निघणार च आहे. आमच्या दिवाणजीस गरुडेश्वर माहीत आहे. ते येथें राहणार आहेत. तशी च गरज लागल्यास आपण त्यांना कळवावें म्हणजे ते मला कळवितील !

**मा**-- मला नाहीं वाटत मध्यें च कांहीं काम निघेल म्हणून, खरें कीं नाहीं खानसाहेब ? आपला सप्ताह संपे पर्यंत आम्ही येथें च चैनींत दिवस काढूं, कांहीं महत्त्वाची हालचाल करणार नाहीं. (महंमदास खुणावून) नाहीं खानसाहेब ?

**म**— होय, असें च ! दौरा वगैरे तहकूब. आपण आल्या नंतर मग पुढचें पाहूं. नाहीं रे बेटा ?

**का**-- होय, बाबाजान !

**हि**-- बरें आहे ! माझें म्हणणें आपण मान्य केल्यानें मला मोठा आनंद झाला !

**का**-- वाः ! वाः ! आपल्या बाहेर कां आम्ही आहों ?

**हि**-- ठीक ! मग मी आतां रजा घेतों.

असें म्हणून महाराजकुमार उठले. त्यांना दारा पर्यंत पोहोंचविण्यास बाप-लेंक हि उठले.

**म** — नूरखान ! राजाजींना त्यांचे कोठी वर पोहोंचवा.

**नू**— जी, हां !

नूरखान व कुमार तेथून निघून, वाड्याचे बाहेर पडले व रस्त्यास लागले. थोड्या वेळानें आसपास कोणीं नाहीं असें पाहून, दोघे परस्परां कडे पाहून हंसले !

**नू**— मला त्या दिवशींच्या हमीदनें म्हटलेल्या गजलाची आतां आठवण झाली—

**" जो और की बस्ती रखे, उस्का भी बस्ता है पुरा ।**
**जो और के मारे छुरी, उसके भी लगता है छुरा ॥ "**

येथपर्यंत तर ठीक जुळलें !

**हि**— पुढचें हि जुळेल ! तें काम मानसिंह करील !

इकडे दिवाणखान्यांत बाप-लेंक व मानसिंह परत येऊन बसले.

**मा**— बाबासाहेब ! आपण राजाजींच्या म्हणण्यास ताबडतोब रुकार दिला, तें चांगलें केलें !

**म**— तुम्हीं मला खूण केली व थोड्या वेळां पूर्वीं काईमनें, तुम्हीं सांगाल त्या प्रमाणें वागावें असें मला सांगितलें होतें च म्हणून मीं रुकार दिला ! बहुधां ही सर्व योजना तुमची दिसते !

**मा**— आपला तर्क खरा आहे ! खानसाहेबांची योजना पुरी करावयाची तर राजाजींचा कांटा येथून दूर करावयास पाहिजे. त्या साठीं मीं च हीं योजना ठरविली ! कुमारांनीं मला प्रथम या उत्सवा बद्दल विचारलें तेव्हां त्यांच्या बेताला मीं भर दिली व ते जेव्हां आपणां जवळ ही गोष्ट काढतील, तेव्हां त्यांचें म्हणणें उचलून धरण्याचें कबूल केलें. आतां आपलें काम आपोआप होईल. पण—

**म**— पण काय मानसिंह ?

**मा**— ( दुःखानें ) पण, बाबासाहेबांना माझा इतबार पूर्णपणें येत नाहीं, अशी आज कांहीं दिवसां पासून माझ्या मनाला शंका आली आहे !

म— तुमची शंका बरोबर होती ! समजलें काय ? होती, पण आतां नाहीं ! मध्यंतरीं मला तुमचा संशय आला होता खरा पण तो आतां नाहींसा झाला आहे ! तुम्ही खरोखर च आमचे विश्वासु नौकर आहां ! तसें नसतें तर नाना प्रकारच्या युक्त्या योजून, जी गोष्ट मला हि साधली नाहीं, ती तुम्हीं अशी साधून आणली नसती ! मीं व्यर्थ तुमचा संशय घेतला, त्या बद्दल राग मानूं नका !

मा— ( हर्षानें ) मी धन्य झालों ! मी पातशाहीचें निमक खातों आहें तेव्हां तिच्याशीं निमकहराम कसा होईन ? आणि आपल्या सारख्या उपकार-कर्त्यांच्या विरुद्ध कसा जाईन ? बरें तें असो. आणखी तर कोणाच्या विरुद्ध आपल्या मनांत शुभा ( शंका ) नाहीं ना ?

म— मानसिंह ! आज, मी अशा प्रसंगीं खोटें कशाला बोलूं ? तुमच्या प्रमाणें खुद्द महाराजकुमार आणि नूरखान यांच्या बद्दल माझ्या मनांत काल पर्यंत शंका होती !

मा— मग आतां तर नाहीं ना ?

म— नाहीं ! आतां मुळीं च नाहीं.

मा— बाबासाहेब ! कुमार भोळसट आहे ! नुसता शिपाईगडी ! एक घाव दोन तुकडे करणारा ! मुत्सद्देगिरी त्यांना मुळीं च माहीत नाहीं ते तसे असते तर स्वतःच्या पिताजींशीं मुत्सद्दीपणा लढवून त्यांनीं तक्त मिळविलें नसतें काय ? पण तो त्यांचा स्वभाव च नाहीं ! आपण होऊन आपले किल्ले शत्रूच्या हवालीं करणारा काय मुत्सद्दी म्हणावा ? ते निव्वळ सरळ शिपायी आहेत. खुल्या दिलाचे आहेत; आणि म्हणून तर मला हें कपट-नाटक रचतां आलें ! तेव्हां आपण त्यांचे बद्दलचा संशय मनांतून पार काढून टाका ! तसें च तो बुड्ढा नूरखान ! तो निव्वळ कर्मठ आहे. एक वेळ तो जेवण सोडील पण पांच वेळचे नमाजांत कधीं हि अंतर पडूं देणार नाहीं ! त्याला हाज करण्याची फार उत्कंठा लागली आहे. त्याचें लक्ष संसारांत मुळीं च नाहीं. मीं च त्याला थोपवून धरला आहे. सारांश, तो अगदीं सोवळा आहे ! अशाचा संशय घेणें म्हणजे आपला आपण संशय घेण्या सारखें आहे ! पण आतां आपण त्यांच्या बद्दल निर्धास्त झाल्याचें ऐकून बरें वाटलें !

म— नाहीं, आतां तुम्हां तिघां बद्दल हि माझें मन निःशंक झालें आहे ! खुदाची कसम ! त्याचें प्रत्यंतर आतां च दाखवितों !

असें म्हणून महंमदानें चंदनगडाची सर्व मसलत मानसिंहास सांगितली. जणूं कांहीं ही गोष्ट आपल्यास प्रथम च समजली असें भासवून मानसिंह म्हणाला—

मा— शुक्राल्ला ! आतां माझी खात्री झाली ! बाबासाहेब ! आपण फार मोठे मुत्सद्दी आहां ! अहो ! आपल्या सारख्या बिरबला पुढें त्या दोघां भोळ्या शिपाईगड्यांचा काय पाड ? असो. माझ्या योजनेला या आपल्या योजनेचा फार फायदा होणार आहे ! माझी बहुतेक योजना पुरी होत आली आहे. फक्त दिवस ठरवावयाचा आहे ! आपल्या मनास, या सप्ताहांतील कोणता दिवस येतो ?

म— तें माझ्या पेक्षां तुम्हीं च ठरवा. आतां या पुढे या बाबतींत तुमच्या च सल्ल्यानें चालविण्याचें मीं ठरविलें आहे ! तो दिवस तुमच्या योजनेंत बसला पाहिजे म्हणून तुम्हीं ठरवा. तुम्हीं ठरवाल तो मला पूर्ण मान्य आहे.

का— होय, मानसिंहजी ! तुम्हीं च ठरवा !

त्या वर मानसिंहानें मोठा गंभीर चेहरा करून अर्धी घटका विचार केला. विचार करीत असतां, तो बोटें घालीत होता, तोंड वेडेंवांकडें करीत होता व तोंडानें " हा ठरविला तर ... नको, ती युक्ति फसेल ... बरें, हा ... पण त्यामुळें त्याना म्हणजे कुमारांना परत येण्यास संधि मिळेल ... आणि यानें ... महाराज छत्रसाल सावध होतील ... " या प्रमाणें पुटपुटत होता ! पुन्हां अर्धी घटका डोळे मिटून त्यानें विचार चालविला ! बाप—लेक त्याचे कडे एकाग्रपणें पहात होते. शेवटीं त्याची मुद्रा आनंदीत झाला व त्यानें टाळी वाजविली !

मा— बस ! हा च दिवस उत्तम आहे ! यानें सर्व बेत उत्तम उतरतील ! बाबासाहेब ! चैत्र शुद्ध द्वादशी, रवीवारचा दिवस ठरवितों ! कारण कुमारांच्या सप्ताहांतील हा दिवस मुख्य व सर्वांत गडबडीचा आहे ! तसे च सप्ताहांत तो अगदीं मध्यें येतो ! त्यामुळें त्यांचा इकडे येण्याचा संभव अजिबात नाहीं ! शिवाय महाराज छत्रसाल यांची छावणी गुप्तपणें सध्यां ज्या ठिकाणीं पडली आहे, तेथें जाऊन छापा घालण्यास सर्व बाजूंनीं हा च दिवस ठीक

आहे ! तेव्हां या दिवशीं मध्यरात्रीं छापा घालण्याचें मीं ठरविलें आहे ! आपली कांहीं आडकाठी नाहीं ना ?

म-- मुळीं च नाहीं ! " चैत्र शुद्ध द्वादशी, रविवार, मध्यरात्र " कायम ! या पुढें तुम्हीं सांगाल त्या प्रमाणें करण्यांत येईल.

का-- बाबा म्हणतात त्याला माझी पूर्ण संमति आहे !

या नंतर थोडा वेळ त्या तिघांत कांहीं वांटाघाटी झाल्या, कांहीं बेत ठरला व मग मानसिंह तेथून बाहेर निघाला. मानसिंहानें महाराजकुमारांच्या कोठींत जाऊन त्यांना सर्व हकीकत सांगितली ! नूरखानास हि त्या च वेळीं तेथें बोलाऊन आणलें होतें !

त्या तिघांनीं पुन्हां आपला पुढील कार्यक्रम तपासून नक्की केला ! पहांटेच्या प्रहरीं महाराजकुमार आपल्या शंभर स्वारांसह जैतपूर-गडांतून बाहेर पडले. सात आठ कोस रस्ता चालून गेल्या नंतर त्या स्वारांपैकीं तीन स्वार फुटून तीन निरनिराळ्या दिशांस रवाना झाले. गुरुदेव, पिताजी व श्रीमंत यांच्या छावण्या त्या त्या दिशांस असून त्यांना ठरलेल्या बेताची पूर्व सूचना देण्यास हे स्वार गेले, हें काय स्पष्ट सांगावयास पाहिजे ?

# गजेन्द्र – मोक्ष !

[ पाकळी सातवी ]

**" तं वीक्ष्य पीडितमजः सहसावतीर्य स ग्राहमाशु सरसः कृपया-ज्जहार। ग्राहाद्विपाटितमुखादरिणा गजेंद्रं संपश्यतां हरिरमूमुच-दुस्त्रियाणाम् ॥ "**

राजपुतान्यांतून, जैतपूर कडे जो एक राजरस्ता जात होता, त्या रस्त्या वर एका पहाडाच्या दरींत एक छावणी पडली होती. एके दिवशीं – मागल्या प्रसंगा नंतर दुसरे दिवशीं – सायंकाळीं, त्या छावणी कडे एक घोडेस्वार आपला घोडा भरधांव फेकीत येत होता. थोड्या वेळानें तो छावणीच्या पहिल्या चौकी जवळ येऊन थडकला. घोड्या वरून खालीं उतरून त्यानें पहारेकऱ्याच्या कानांत कांहीं सांगितलें. त्यानें आपल्या एका सोबत्यास घोडा जवळच्या झाडास बांधावयास सांगून, दुसऱ्या शिपायास, स्वाराला छावणींतील मुख्य अधिकाऱ्या कडे घेऊन जाण्यास सांगितलें.

स्वार, मुख्य अधिकाऱ्या पुढें आला व त्यानें " **जय गजराज !** " असें म्हणून साष्टांग दंडवत घातलें ! अधिकाऱ्यानें स्वारास बसवून घेतलें आणि त्यानें सांगितलेली सर्व हकीकत शांतपणें ऐकून घेतली ! नंतर स्वाराची पुढील व्यवस्था लावण्यास शेजारच्या शिपायास सांगून ते दोघे निघून गेल्या नंतर, त्या अधिकाऱ्यानें " धूरमंगद ! " अशी हांक मारली व धूरमंगद आल्या वर त्याचे कानांत कांहीं सांगितलें !

दीड दोन घटकांनीं छावणींतील प्रमुख मंडळी, त्या अधिकाऱ्याच्या डेऱ्यांत आली. अधिकाऱ्यानें हुजऱ्यास राबता बंद ठेवण्यास सांगून, त्या मंडळींशीं कांहीं खलबत केलें. सर्वानुमतें एक योजना ठरली. मग मंडळी आपापल्या गोटांत गेली. छावणींत सर्वत्र धांडोरा पिटला गेला कीं, मध्यरात्रीं —चैत्र शुद्ध पक्ष असल्यानें व ती रात्र नवमीची असल्यानें उत्तम चांदणें होतें—कूच करावयाचें आहे. धांडोरा ऐकून सर्व सैनिकांनीं व अधिकाऱ्यांनीं आपापलीं जेवणें उरकून, सामान वगैरे बांधून हळू हळू आपली तयारी केली.

कूचाची नौबत झडली! सैन्य कोरबंदीच्या शिस्तीनें उभें राहिलें. इतक्यांत मुख्य अधिकारी आपल्या "रामबाण" नांवाच्या अत्यंत तेजस्वी घोड्या वर बसून, सैन्या पुढें येऊन उभे राहिले. अधिकाऱ्यांच्या डोई वर जटामुकुट मूळचा च होता, त्या वर आतां हुरमुजी रंगाची पाग लपेटली होती. अंगांत पायाच्या घोट्यांपर्यंत हुरमुजी मेखळा होती; डावे हातीं घोड्याची अनीन असून उजवे हातीं भगवा ध्वज होता आणि कमरेस बांधलेल्या छाटींत मोठी कुबडी खोंचलेली दिसत होती! अधिकाऱ्यांना पाहतां च सर्वांनीं त्यांना लष्करी अभिवादन केले; त्यांनीं तें स्मित मुखानें ग्रहण केलें!

इतक्यांत शेजारचा रजपूत वीर धूरमंगद बुंदेल्यानें सर्वां कडे तोंड करून म्हटलें—

धू— भाईयों! श्रीगुरुदेव, आपणां सर्वांना कांहीं सांगणार आहेत, तरी शांतपणें त्यांची आज्ञा ऐका!

ते गुरुदेव च होते! ठरल्या प्रमाणें सवाई जयसिंह व इतर मोठमोठ्या राजांनीं आपापलीं निवडक सैन्यें त्यांच्या स्वाधीन केलीं होतीं; तसें च साधारण प्रतीचे राजे, ठाकूर, जहागीरदार स्वतः आपल्या फौजा घेऊन या फौजेंत मिसळले होते. या मंडळींत बरेचसे जहागीरदार मुसुलमान हि होते आणि सैन्यांतील शिपायांच्या संख्येंत हि मुसुलमानांचा भरणा बरा च होता! मागें ठरल्याप्रमाणें, हिरदेसां कडून पहिली सूचना मिळाल्या बरोबर गुरुदेवांनीं फौज जमा केली. नंतर जसजशा सूचना येत त्या त्या प्रमाणें त्यांनीं आपल्या सैन्याची हालचाल ठेविली. आजच्या स्वारानें शेवटची सूचना आणली. आज नवमी; उद्याचा एक व परवाचा दुसरा दिवस टाकून तेरवां मध्यरात्रीं

तो प्रसंग घडवावयाचा आहे! त्यामुळें सर्व गोष्टींचा विचार करून गुरुदेवांनीं एक योजना ठरवून त्या प्रमाणें वागावयास प्रारंभ केला; अस्तु.

गुरुदेवांनीं सर्व सैन्या कडे तोंड करून बोलण्यास प्रारंभ केलाः—

**गुरु**— रींवा नरेश अवधूत सिंहजी! सरदार धूरमंगद! और मेरे सब प्यारे हिंदू-मुस्लीम भाईयों और लडकों! हम, यहां इकठे हुए सब भाई **खुदा-इ-खिदमतगार** याने **रामसेवक** हैं. आपण हमीदपूरच्या मशिदींतील त्या खुदादरबारची आठवण करा! आजच्या दिल्लीच्या जुलमी, साम्राज्यास, पातशाहीस नेस्तनाबूद करून तेथें फकीरशाही, रामराज्य स्थापण्याची सौगंद तुम्हीं पुढाऱ्यांनीं घेतली आहे! "शपथ मोडणाऱ्याला व कृतघ्नाला अल्ला कृपा-दान करीत नाहीं." ( सु० ३९ ) रावणाचें राज्य व आजची पातशाही यांत कांहीं फरक नाहीं. रावणाची शक्ति लागून वीर लछमनजी म्हणजे राजा छत्रसाल घायाळ झाला आहे. आपलें हें सैन्य, लछमनजीस संकटांतून सोड-विण्यास निघालेल्या मारुतीरायाच्या-सुग्रीवाच्या-सैन्या प्रमाणें आहे! आमचे आगवान ( सेनापति ) हे अवधूत सिंहजी आहेत! आजचे महावीर हनुमान, राजाजी! तुम्ही च आहां! धूरमंगद! तुम्ही या रामसेनेंतील अंगद आहां! या रामसेनेची धुरा आज तुमच्या हातीं आहे! चित्रकूट नरेश! बनपूर नरेश! मैंहूर नरेश! असोथर नरेश! हमीरपूर नरेश! आपण सर्व या सेनेचे निर-निराळे सेनापती आहां! भाईनों! उदेपूर, जयपूर व बुंदी येथील राण्यांनीं आपली फौज या महत्कार्यास मदत करण्यास धाडली आहे! त्या प्रमाणें जे जे मुसुलमान जहागीरदार आम्हांला सहाय्य झाले त्यांच्या पैकीं हे कांहीं जण आपल्या फौजे सह जातीनें हजर आहेत व कांहींनीं आपली फौज पाठविली आहे! कांहीं हिंदू जहागीरदारांनीं हि आपली शिबंदी पाठविली आहे! या सत्कार्याचें ( हातांतील ध्वज पुढें करून ) हें निशाण आहे! ये खुदाका निशान है! ये रामधुजा फहरती है!

असें म्हणून गुरुदेवांनीं ध्वजास वंदन केलें! सर्वांनीं त्या झेंडयास वंदन केलें. गुरुदेव गाऊं लागले! गाण्याचें एक एक कडवें ते प्रथम म्हणत व मग सर्व जण त्याची आवृत्ति करीत! जणूं काय त्या सैन्याचें तें कूचाचें गाणें च होतें! गुरुदेव म्हणूं लागलेः—

( राग मालकंस )

**अब देखो ! राम-धुजा फहरानी ॥ धृ० ॥ हलकत ढाल, फरक्कत नेजा । गरद उठी असमानी ॥ १ ॥ लछमनवीर, बालिसुत अंगद । हनूमान अगवानी ॥ २ ॥ कहत मंदोदरी, " सुन, पिया रावण ! । कौन कुमति लिया आनी ? ॥ ३ ॥ अग्रके स्वामी, गढ लंका घेरी । अजहुं समझ अभिमानी " ॥ ४ ॥**

**गुरु**—आज नई देहलीमें फकीरशाहीका तख्त स्थापन करने के लिए हम सब हिंदू-मुस्लीम भाई एक हुवे हैं ! हमने एक्का किया है ! हमारी इत्तेफाक हुई है ! हमारी सबोंकी जात एक ही है—

( राग सिंधोरा )

**" हमारी जात नूरानी ! रहे इक हाल पर दायम ।**
**कि जिसकी चमकसे चमके यह मिहर ओ माह सतारे हैं ॥"**

हमारी जात असली स्वरूप की, याने प्रकाशस्वरूप आत्माकी, याने खुदाका ध्यान करनेवालों की, मायने खुदा-इ-खिदमतगारों की है ! यही अवस्थामें हम कायम रहेंगे ! यह हमारी जातका जो तेज झलक रहा है, उस तेजसे ही यह सूरज, चांद और तारे चमक रहे हैं !! सज्जनों का पालन और दुष्टों का नाश यह हमारा कर्तव्य है. यही हमारा हक याने सच्चा धर्म है. इस धरमका पालन करते समय—

**" न दुशमन है कोई अपना, न साजन ही हमारे हैं ।**
**हमारी जाने मुतलकसे हुवे यह सब पसारे हैं । "**

इस बात पर जरूर ध्यान देना चाहीये. आपना काम फक्त हक-महजब की खिदमत करना इतना ही है ! उस के लिए—

**" मरेंगे यारो ! तलब में हक की । जो नाम तालिब लिखा चुका हैं ॥"**

इस हक के जंग में मरेंगे तो बेहेश्तमें जाओंगे, बचेंगे तो स्वराज्य मिलाओंगे.

**" कुल हल तरब्बसून बिनाऽइल्लाऽइहदिल हसनैनि "**

बस ! ऐ, मेरे यारों ! हक याने सत्य धरमके लिए, आप सब मरनेको तैयार हों ?

सर्वांनीं एक जबाननें घोष केला कीं, "तैयार हैं ! तैयार हैं !! "

**अवधूत**— गुरुदेव ! महाराज छत्रसालांना संकटांतून सोडविण्या साठीं,

आपल्या आज्ञेनें ही रामसेना तयार झाली आहे! आपल्या आशीर्वादानें आमची फत्ते होईल!

**धूरमंगद**— "या कामांत प्राण गेला तरी माघार घेणार नाहीं," अशी शपथ, या सेनेंतील प्रत्येक खुदाइखिदमतगारानें घेतली आहे! तेव्हां गुरुदेवांनीं बिलकूल काळजी करूं नये!

**गुरु**— महाराजकुमारांच्या सूचनेवरून आज आपण निघत आहों! आज चैत्र शुद्ध नवमी आहे! आज **रामनवमी** आहे. रावणनिर्दालक श्रीरामप्रभु आज अवतीर्ण झाले! आजचा मुहूर्त सर्व मुहूर्तांत श्रेष्ठ आहे!! आज आजादीचा श्रीरघुपति जन्मला!

**अव**— आज्ञा! गुरुदेव!

**गुरु**— महंमदची जैतपूरची व चंदनगडा वर छपविलेली मिळून एकंदर फौज पुष्कळ आहे. तथापि, मानसिंहानें त्या फौजे पैकीं निम्या फौजेची सोय लावण्याचें पत्करलें आहे! आपली कुल फौज जेवढी आहे, तेवढी, महंमदच्या उरलेल्या निम्या फौजेशीं टक्कर देण्यास पुरें आहे, असें मला वाटतें.

**अव**— आज्ञा! खेरीज, श्रीमंतांची फौज येत आहे च! तेव्हां या आमच्या दोन फौजा एकत्र झाल्या म्हणजे आम्हीं महंमदाच्या फौजेच्या लाह्या फोडूं!

**धूर**— खेरीज पिताजीं जवळ चार पांच हजार फौज असून, आयतेवेळीं नूरखान आपल्या दोन हजार फौजेचे तोंड पाठमोरें करून महंमदाला घाबरून सोडणार! सारांश, गुरुदेवांच्या आशीर्वादानें विजय आमचा च आहे!

**गुरु**— ठीक आहे! तथापि गाफील होऊं नका! आज **श्रीरामनवमी** आहे तर परवांची एकादशी **कामदा** आहे! ही एकादशी संपेपर्यंत दुर्वासानें महाराज अंबरीषास छळलें पण द्वादशीस भगवंतांच्या सुदर्शनानें दुर्वासाला हतप्रभ करून, अंबरीषास संकटमुक्त केलें! आतां तो च प्रसंग पुन्हां ओढवला आहे. दिल्लीच्या अत्याचारी साम्राज्यरूपी दुर्वासानें, महाराज छत्रसालरूपी अंबरीषास आजपर्यंत गांजलें! तेरवां रामरहीमच्या या खुदाइखिदमतगाररूपी सुदर्शनाच्या हातून या आजच्या दुर्वासाचा पराभव होईल! आणि आजचा अंबरीष मुक्त होईल! तसें च आपणां सर्वांचा काम-हेतु-पूर्ण होऊन परवांच्या कामदा एकादशीचें नांवहि सत्य होईल!! कारण—

( राग बिभास )

**शरन गए प्रभु कोन उबारे ॥ धृ० ॥ जित जित भीर परी भक्तनकों। चक्र सुदर्शन तहां सम्हारे ॥ १ ॥ महाप्रसाद बैठ अंबरीषहि। दुर्वासको कोप निवारे ॥ २ ॥ ग्राह ग्रसत गजको, जल डूबत। नाम लेत वांको दुःख टारे ॥ ३ ॥**

काल घाटांत ठरलेल्या वेळीं आपण पोहोंचूं अशा बेतानें मजली चालूं द्या.

दुर्वासाला शिक्षा करणारे प्रभु ( प्राणनाथ देव ) ससैन्य निघाले !

आज चैत्र शुद्ध एकादशी. महाराज छत्रसालांनीं, कुमाराकडून आलेल्या निरोपानुसार आपली पहिली छावणी सोडून या **काळघाटांत** छावणी ठोकली होती. छावणीची रचना एका व्यूहासारखी केली होती. व्यूहाभोंवतीं, डोळ्यांत तेल घालून पहारा चालला होता; चुकून सुद्धां एकादें चिटपाखरूं आंत येणें शक्य नव्हतें. महाराजांचा तोफखाना पहाडी असल्यानें वाटेल त्या डोंगराळ भागांत त्याला नेतां आणतां येई. जेजाल्यांच्या उंटांची हि एक तुकडी होती. थोरल्या महाराजांप्रमाणें, पिताजींचा भर पायदळापेक्षां घोडदळावर जास्त असल्यानें त्याची संख्या जास्त होती. गनिमी युद्धांत घोडदळ च अधिक उपयोगी पडतें. मात्र हे घोडे स्थानिक असावे लागतात. परप्रांतीय घोडे कुचकामाचें ठरतात. आमच्या महाराष्ट्रांत मावळी, भीमथडी, गंगथडी घोडे जसे उपयोगी ठरतात, तसे काठेवाडी, सिंधी, पंजाबी उपयुक्त ठरत नाहींत. मग अरबी, तुर्की कसे ठरणार ? ते फक्त शोभेचे ठरतात. सह्याद्रि आपल्या कठोर अवयवांनीं त्यांच्या खुरांचे टवके उडवितो ! पिताजींचें राज्य महाराष्ट्रा प्रमाणें विंध्याद्रीच्या अंका खालचें ! तेव्हां त्यांनीं थोरल्या महाराजांचें युद्ध-शास्त्र अंमलांत आणलें यांत काय आश्चर्य ? शिवाय, शिष्यानें गुरूचाच कित्ता गिरविला नाहीं तर गुरुभक्ति सटावणार नाहीं काय ? पिताजी जवळ थोडेसें गजदळहि होतें. यद्यपि या काळीं गजदळाची रीत मागें पडली होती तरी रामायण– कालापासून प्रसिद्ध असलेल्या विन्ध्याटवींतील त्या अंजन जातीच्या हत्तींचें एक छोटेसें दल पिताजींनीं उपयोगांत आणले होतें ! बाकीचा सैन्याचा भरणा पायदळाचा होता.

सबंध दिवस व्यूह-रचनेंत गेला. हरिदिनी असल्यामुळें पिताजींना उपवास

होता. रात्रीं खलबतखान्यांत पिताजी व त्यांचें मंत्रिमंडळ बसून युद्धचर्चा चालली होती. कुमार जगतराज म्हणाले—

**ज** — भाऊसाहेबांनीं बसविलेलें नाटक येथ पर्यंत तर चांगलें रंगलें, आतां शेवटच्या अंकास सुरवात झाली आहे !

**पिताजी** — होय ! बहुतेक पात्रांचा निरनिराळ्या ठिकाणांतील कार्याचा व्याप संपत आला असून, अखेरच्या कार्या साठीं त्या सर्वांची गांठ एकत्र पाडण्याचा प्रवेश सिद्ध होत आला आहे !

**हमीद** — महाराजकुमारां कडून वेळोवेळीं ज्या बातम्या समजत, त्यां वरून आपण आपले धोरण ठरवीत होतों; त्या मुळें आतां पर्यंत आपलें नुक-सान असें कांहीं च झालें नाहीं ! मला एवढें च आश्चर्य वाटतें कीं, एवढी मोठी पातशाही व तिच्यांतील या महंमद बंगषा सारखे शूर सरदार पण ती पातशाही व हे सरदार इतके आंधळे कसे ? यांना या आमच्या नाटकाची, या नेताजी–गनिमाईची शंका कशी आली नाहीं ?

**पि** — बेटा, हमीद ! तुझें म्हणणें खरें झालें असतें, पण केव्हां ?

**ह** — केव्हां, पिताजी ?

**पि** — जर हे साम्राज्य अकबराचें असतें, म्हणजे दीनिइलाहीचें असतें, फकीरशाहीचें, सत्यधर्माचें म्हणजे हिंदवी असतें तर ! असलें साम्राज्य डोळस असतें ! पण आजचें साम्राज्य अत्याचारी, जुलमी आहे ! दिल्ली दरबार म्हणतो कीं, "आम्हीं साम्राज्य–भावना मागें च सोडून दिली आहे !" पण हें म्हणणें वरकरणी आहे ! अजून ती भावना, या दरबारच्या प्रत्येक कृतींत प्रतीत होते आहे ! अजून जुलूम – कायदा व सुव्यवस्था या नांवा खालीं – चालू आहे ! जुलूम करणारा किती हि बळकट व फौजबंद असला तरी शेवटीं आंधळा च असतो; म्हणजे त्याच्या बुद्धींतील शहाणपणा, चातुर्य किंवा त्याची ज्ञानयोग–व्यवस्थिति, कार्याकार्यव्यवसायिका बुद्धि म्हणजे च आत्मसाक्षात्कारी बुद्धि त्याचे जवळ शिल्लक रहात नाहीं ! तो सुर न राहतां असुर होतो ! रजनीचर बनतो ! साम्राज्याच्या – असुरी संपत्तीच्या – धुंदींत अचुक मार्ग दाखविणारा शुद्धबुद्धीचा, आत्मसाक्षात्काराचा, आंतल्या आवाजाचा दैवी नंदादीप तेथें तेवत नाहीं ! कुराणे शरीफमध्यें ईश्वरीसाक्षात्कार कोणास होतो तें सांगितलें आहे. "**व्व अहिदुन् फमन् काना यरजू लिकाउअ**

रब्बिहि फल् यअमल अमलन् सालिहन् " म्हणजे ईश्वरीसाक्षात्कार ज्याला पाहिजे असेल त्यानें सत्यमार्गाचा अवलंब केला पाहिजे. तथापि महंमद अगदीं च आंधळा नाहीं ! त्यानें हि चंदनगडचें एक नाटक रचलें आहे कीं नाहीं ?

ह — आज्ञा ! पिताजी ! पण चंदनगडी सुरुंगाखालीं आमचा अंगार — मैदानी काट सुरुंग आहे च ना ? बाकी एवढें खरें कीं, अकबरशहाच्या किंवा शहाजहांच्या वेळीं दिल्ली दरबारांत जेवढे शूर व मुत्सद्दी लोक होते त्याच्या पाव पटीनें हि आतां नाहींत ! जे इतर सरदार आहेत ते केवळ जुलमी, लांचखाऊ व शीलानें भ्रष्ट आहेत ! या तिन्हीं दुर्गुणांत आाण दुसऱ्या वर कशी मात करूं एवढें च यांचे पुढें काम असतें व तेवढें च ते करतात ! अल्लाला असले लोक आवडत नाहींत असें कुराणाच्या २८ व्या सुरांत म्हटलें आहे. गेल्या दोन पिढ्या असल्या च लोकांच्या निपजल्या ! मात्र हे आपले दुर्गुण झांकण्या करितां ते स्वतःस अकलमंद म्हणजे बुद्धिवान, बुद्धिजीवी म्हणवितात !

ज — याचा च अर्थ ही जुलमी पातशाही घसरणीस लागली आहे ! माणूस काय, राज्य काय अथवा असलें मोठें साम्राज्य काय, वैभवाच्या गिरी वरुन उतरणीस लागलें कीं, प्रथम बुद्धिनाश होतो आणि बुद्धिनाशा नंतर सर्व नाश होतो असा नियम तर भगवंतांनीं च ठरवून ठेवला आहे !

पि—— या पातशाहीची कथा काय घेऊन बसतां ? चौदा चौकड्यांचा रावण, कीं ज्याच्या साम्राज्या वर केव्हां हि सूर्य मावळला नाहीं, त्याचें शेवटीं काय झालें ? जों पर्यंत त्याचा पापाचा घडा भरला नव्हता, तो पावेतों त्याचें राज्य साऱ्या पृथ्वी वर होतें; त्याच्या साम्राज्यांत स्वर्ग–मृत्यु–पाताळ हे तिन्ही लोक होते, म्हणजे असलें ब्रह्मांडव्यापी साम्राज्य पूर्वी कोणाचें झालें नव्हतें व पुढें हि कोणाचें होणार नाहीं; त्याचा दरारा सर्व विश्वांत होता ! तों पर्यंत त्याच्या दरबारांत बिभीषणा सारख्या सत्यवर्तनी मुत्सद्याचा मान होता; पण जेव्हां रावणानें, सीतामातेस पळवून नेलें तेव्हां त्याच्या वैभवसूर्यास ग्रहण लागलें ! त्याला मोठा गर्व होता कीं, आपल्या चारी बाजूंनीं समुद्र असलेल्या बेटावर, लंके ( **लंका** हा तामील शब्द असून त्याचा अर्थ बेट आहे ) वर कोण हल्ला करील ? तो आपल्यास रत्नाकराचा, महोदधीचा स्वामी म्हणवी ! परंतु त्याचीं शंभर पापें भरलीं ! घडा भरला ! वेदवती, नलकूबर, नंदी, सीतामाई

यांचे शाप फळास आले! बिभीषणास हांकलून देण्यांत आलें; मारीच, माल्यवान, कुंभकर्ण यांच्या सदुपदेशास लाथाडण्यांत आलें! तेव्हां शेवटीं व्हावयाचा तो च परिणाम झाला! रावणराज्य संपलें आणि "सोने का गढ लंक बनायो, सोने का दरबार" अशा सुवर्णमय लंकेंतील सुवर्णखचित दरबारांत बिभीषणाच्या हस्तें रामराज्य स्थापित झालें!!

इतक्यांत चोपदारानें येऊन सांगितलें कीं, "बाहेर एक मुसुलमान सरदार आले आहेत." तें ऐकून कुमार जगतराज बाहेर गेले व थोड्या पळांनीं त्या सरदारांसह आंत आले. सरदारानें डेऱ्याच्या दाराचे आंत प्रवेश करतांना "जय, गजराज!" असें म्हणून, पिताजींच्या चरणां वर मस्तक ठेविलें! सरदार खालीं बसले व म्हणाले—

स—रावणाची शेवटची घटका भरत आली, पिताजी! त्या रावणा वर भगवान् श्रीरामरायांना चालून जावें लागलें पण आजचा रावण आपण होऊन भगवान पिताजीं कडे, या काळ घाटांत, कालमुखीं पडण्या साठीं चालून येत आहे! रामरायास, शेवटच्या हल्ल्यांत मातली व गरुड हे मदतीस आले होते! आज पिताजींच्या सहाय्यास राजपुतान्यांतील—मरुभूमींतील—मातली व सितारा गढा वरील गरुड हे झेंपा टाकीत जवळ जवळ येत आहेत, आले आहेत! रामरावणयुद्ध फाल्गुनी आमावास्येस संपलें, आजच्या रामरावणीययुद्धाची अखेरी उदईक होईल! **जय, गजराज! जय जय रघुवीर समर्थ!!**

पि—बेटा, हिरदेसा! ( होय! ते मुसुलमान सरदार दुसरे तिसरे कोणी नसून खासे महाराजकुमार हिरदेसा च होते!) ठीक आहे. प्रसंग येऊन ठेपला! पुढील व्यवस्था कशी करावयाची, ती आम्हीं तुझ्या संदेशानुरूप केली आहे. आणखी कायकाय करावयाचें तें उद्यां ठरवूं. सध्यां तूं विश्रांति घे.

पिताजींच्या सूचने वरून मंत्रगृह रिकामें झालें!

चैत्र शुद्ध द्वादशीचा दिवस उजाडला. जैतपूर गडा वर व चंदनगडा वर सर्वत्र गडबड उडाली होती. महंमदानें गडा वरील आपलें सर्व सैन्य—यांत नूरखानाचें दोन हजार सैन्य व महाराजकुमारांचे चार शें स्वार होते—एकवटलें आणि त्या सह त्यानें गड सोडला मानसिंहाच्या एका हेराला काळघाट माहीत असल्यानें त्यानें वाटाड्याचें काम पत्करलें होतें. सैन्य काळघाटाच्या मार्गास लागलें. महंमद मनांत मांडे खात होता!

शेवटच्या दिवशीं रावण, श्रीरघुपती वर चालून जात असतां, नगरांतून बाहेर निघतांना मनांत मांडे खात होता कीं:—

**" रामवृक्षं रणे हन्मि सीतापुष्पफलप्रदम् । प्रशाखा यस्य सुग्रीवो जाम्बवान्कुमुदो नलः ॥ "**

पण हे मनचे मांडे मनांत मोडले व रावणाला अखेरीस यमलोकीं जावें लागलें !

महंमद, काईम व मानसिंह यांच्यांत ठरल्या प्रमाणें शेवटचे दोघे चंदनगडा वर गेले होते. आतां तर बापलेकांचा, मानसिंहा वर पूर्ण विश्वास बसला होता ! आणि का नाहीं बसणार ? त्याच्या अक्कलहुशारीनें हा योग जुळून आला होता ! त्याच्या बिरबली बुद्धीच्या प्रभावानें महाराजकुमारांचा अडथळा दूर झाला होता ! त्याच्या चाणक्यनीतीनें महंमदाच्या हातीं महाराज छत्रसाल लागणार होते व काईमचा जनानखाना ताईसाहेब सजविणार होत्या ! पण—

मध्य रात्रीच्या सुमारास महंमदाचें सैन्य काळघाटांत जाऊन थडकणार होतें; त्या च सुमारास काईमचें चंदनगडा वरील अर्धे सैन्य हि तेथें दाखल होणार होतें. दोघांनीं मिळून एकदम पिताजींच्या छावणी वर छापा घालावयाचा व त्यांना गिरफदार करावयाचें; त्या गडबडींत काईमनें ताईसाहेबांना पकडावयाचें ठरलें होतें ! चंदनगडा वरून एका वेळीं सर्व फौज हलल्यास व प्रमुख रस्त्यानें गेल्यास वाटेंतील लोकांस संशय येईल व ते लोक ती बातमी पिताजींना देऊन त्यांना सावध करतील म्हणून मानसिंहानें पुढील युक्ति काढली ! काईमनें आपल्या बरोबर फक्त अर्धे सैन्य न्यावें; शिलकीचें अर्धे सैन्य घेऊन मानसिंहानें मागून सात आठ घटकांनीं गड सोडावा. मानसिंहास काळ घाटांत जाण्याचा एक आड रस्ता – अंगार मैदानांतील – माहीत असल्यानें तो या सैन्या सह घाटांत आयते वेळीं येऊन पोहोचेल ! त्याचें सैन्य राखीव म्हणून ठेवावें. पितापुत्रांच्या सैन्यानें च काम भागेल; पण कदाचित् न भागल्यास सूचना मिळाल्या बरोबर मानसिंहानें आपल्या सैन्यानिशीं महाराजांच्या सैन्या वर घसरावें. या हल्ल्यानें पिताजींचा पराभव हमखास होईल च होईल ! अशी ही मानसिंहानें योजलेली व पितापुत्र आणि नूरखानानें संमति दिलेली युद्धयोजना होती ! पण—

काईमनें आपलें अर्धें सैन्य घेऊन गड सोडला. त्याचें सैन्य नेहमीच्या

रस्त्यानें चाललें होतें. तिकडे महंमदाचें हि सैन्य वाट चालत होतें. मध्यरात्रीं पूर्वी तीन घटका असतां दोन्ही सैन्यांच्या गांठी पडल्या! हल्ला करण्यास अजून तीन घटका अवकाश होता म्हणून मानसिंहाच्या हेरानें घाटाच्या शेजारच्या एका गर्द झाडीच्या दऱ्यामध्यें या सैन्यास छपवून ठेवलें! पितापुत्र, मानसिंहाच्या सैन्याची वाट पहात होते, पण—

काळघाट वरून शांत दिसत होता; घाटांत घनदाट झाडी असल्यानें तो निर्मनुष्य हि दिसत होता! जणूं तेथें नुसती शांतता च नांदत होती! घाटांत फक्त तंबू–डेरे–राहुट्या तेवढ्या दिसत होत्या! प्रळयकाळा पूर्वीची च शांतता ती!

महाराज छत्रसालांच्या शामियान्यांत पिताजी व त्यांची निवडक मंडळी रणवेष घालून सज्ज होऊन बसली होती! महाराज घनगंभीर स्वराने म्हणाले—

पि— आज काळ घाटांतील काळ रात्र! सकाळ पासून तुम्हां सर्वां वर सर्वत्र बंदोबस्त करण्याचें सोंपविलें होतें त्या प्रमाणें बंदोबस्त ठेवला गेला आहे ना?

**जगतराज**— आज्ञा! महंमदच्या सैन्याच्या वाटा, परत जातांना बंद करण्याचें काम हमीदभाईनीं स्वतः कडे घेतलें आहे. नूरखानांनीं आयते वेळीं आपल्या कडे येण्याचें ठरवून ठेवलें च आहे. त्यांची फौज व दादांचे चार शें स्वार आपल्यास मिळाले म्हणजे आपली फौज जवळ जवळ अडीच हजारांनीं वाढेल व महंमदची तितकी कमी होईल! काइमची निम्मी फौज त्या अंगार मैदानांत...म्हणजे तितकी आणखी कमी होणार! तथापि, या सर्व वजाबाक्या होऊन हि महंमदची एकूण फौज आपल्या फौजेच्या तिपटीवर येईल!

या नंतर मुख्य सेनापति पृथ्वीसिंह म्हणाले—

**पृ**— पण ठरल्या प्रमाणें, थोड्या वेळांत गुरुदेव व श्रीमंत येऊन दाखल होतील! शिवाय महाराजकुमारांनीं योजलेली युक्ति...हे राजगड व भूपालगड ...सारांश या सर्व गोष्टी, योजना, जमल्या म्हणजे आम्ही महंमदाच्या सैन्याचा पालापाचोळा उडवून देऊं, सरकार!

**हमीद**—आपली फौज, महंमदाच्या फौजेच्या निम्मी असती तरी भगवान महाकालाच्या कृपेनें आम्हीं त्या शत्रूच्या फौजेची पोळजत्रा केली

असती, पण आपल्या योजना सफल झाल्या—व त्या होणारच—म्हणजे आमची च फौज थोडीशी अधिक होईल ? पिताजींनीं मुळीं च काळजी करूं नये ! कारण कुराणाच्या ५२ व्या सुरांत म्हटल्या प्रमाणें महंमद व त्याचें सैन्य "असत्याचें उपासक आहे. त्यांचा कट सिद्धीस जाणार नाहीं. त्यांचा निःपात होईल. अल्ला त्यांचें रक्षण करणार नाहीं."

पि— बेटा ! काळजी नाहीं; पण सावधगिरी घेतली पाहिजे ! बाकी हिरदेसा व मानसिंह यांनीं नूरखानाच्या साहाय्यानें प्रथम काईमला व त्याच्या मुळें महंमदला जाळ्यांत गुंतविण्याचें काम चांगलें केलें ! या जाळ्याचें मूळ म्हणजे काईमची वैषयिक कामना ! राजकारणी पुरुष असल्या कामने वर मोठीं मोठीं राजकारणें उभारतात ! ती च गत या प्रकरणांत होत आहे. असल्या कामासक्त पुरुषांची अल्लानें निर्भत्सना केली आहे. ( सूर. ७० ) या प्रकारा वरून पातशाहीच्या एका अंगाचा आपल्यास चांगला बोध होतो ! विवेका ऐवजीं विकाराचा प्रभाव ज्या ठिकाणीं अधिक पडतो, तेथें कर्तव्य-नाश ठरलेला च ! आणि असले विकारी अधिकारी ज्या साम्राज्यांत प्रमुख जागीं आहेत, ते साम्राज्य अधःपाताच्या मार्गास लागलें तर नवल काय ? तथापि महाकालाची, त्या गरुडवाहन विष्णूची प्रार्थना नेहमीं प्रमाणें करावयास पाहिजे ! उठा ! प्रार्थना करूं या !

असें म्हणून पिताजी उठले; सर्व मंडळी उठली ! मागें सांगितल्या प्रमाणें एके दिवशीं—पिताजींनीं, छत्रपतींना व पंतप्रधानांना ज्या दिवशीं पत्रें लिहिलीं— ताईसाहेबांचें गजेन्द्रमोक्षाचें पद ऐकल्या वर पिताजींनीं, त्या प्रसंगाच्या दोन तसबिरी कुशल चित्रकारां कडून तयार करून घेतल्या व एक आपल्या खलबतखान्यांत व दुसरी ताईसाहे-बांच्या खाजगी खोलींत ठेविली ! चित्रांचें कलम मोंगली नसून अस्सल राज-पुतानी होतें ! अशा त्या खलबतखान्यांतील गजेन्द्रमोक्षाचे तसबिरी समोर निजावयास जाण्या पूर्वी दररोज पिताजी गजेन्द्रमोक्षाचा धांवा म्हणत असत ! त्या नियमास अनुसरून ते आतां उठले होते. तेथें असलेली सर्व मंडळी हि उठली होती. रोज सूर्योदय झाला म्हणजे या मंडळींना घेऊन पिताजी पुन्हा ती प्रार्थना करीत असत. त्यामुळें या सर्वांना — हमीदखानास सुद्धां —

ती प्रार्थना पाठ झाली होती. आतां सर्वांनीं उभे राहून हात जोडून एकाग्र मनानें प्रार्थना म्हणण्यास प्रारंभ केला:—

" ॐ नमो भगवते तस्मै यत एतच्चिदात्मकम् । पुरुषायादिबीजाय परेशायाभिधीमहि ॥ १ ॥ यस्मिन्निदं यतश्चेदं येनेदं य इदं स्वयम् । योऽस्मात्परस्माच्च परस्तं प्रपद्ये स्वयंभुवम् ॥ २ ॥ न यस्य देवा ऋषयः पदं विदुर्जन्तुः पुनः कोर्हति गंतुमीरितुम् । यथा नटस्याकृतिभिर्विचेष्टतो दुरत्ययानुक्रमणः स माऽवतु ॥ ३ ॥ दिदृक्षवो यस्य पदं सुमंगलं विमुक्तसंगा मुनयः सुसाधवः । चरन्त्यलोकव्रतमव्रणं वने भूतात्मभूताः सुहृदः स मे गतिः ॥ ४ ॥ सत्त्वेन प्रतिलभ्याय नैष्कर्म्येण विपश्चिता । नमः कैवल्यनाथाय निर्वाणसुखसंविदे ॥ ५ ॥ मादृक् प्रपन्नपशुपाशविमोक्षणाय मुक्ताय भूरिकरुणाय नमोऽलयाय । स्वांशेन सर्वतनुभृन्मनसि प्रतीत प्रत्यग्दृशे भगवते बृहते नमस्ते ॥ ६ ॥ यं धर्मकामार्थविमुक्ति कामा भजंत इष्टां गतिमाप्नुवंति । किं त्वाशिषोरात्यपि देहमव्ययं करोतु मेऽदभ्रदयो विमोक्षणम् ॥ ७ ॥ जिजीविषे नाहमिहामुया किमन्तर्बहिश्चावृतयेभयोन्या । इच्छामि कालेन न यस्य विप्लवस्तस्यात्मलोकावरणस्य मोक्षम् ॥ ८ ॥ "

जय गजराज ! जय ! जय ! रघुवीर समर्थ ! !

सर्वांनीं एकचित्तानें प्रार्थना म्हटली. गजेंद्रावरील संकट आपल्या सर्वांवर कोसळलें आहे, याची भावना सर्वांच्या चित्तांत जागृत असल्यानें प्रार्थनेचा प्रत्येक शब्द हृदय-कमलाची एक एक पाकळी उकलून बाहेर पडत होता ! सर्वांची दृष्टि त्या तसबिरीकडे लागली होती. पिताजींचे तर अष्टभाव जागृत होऊन, ते त्यांच्या डोळयांतून जणूं काय झरत होते ! उभे असतांना च त्यांची भाव समाधि लागली होती ! इतक्यांत त्यांना असा भास झाला कीं, चित्रांतील गरुड झेंपा टाकीत व त्याच्या खांद्यावरील भगवान् विष्णु, सुदर्शन चक्र गरगर फिरवीत त्या गजेन्द्रा कडे येत आहेत ! थोडया क्षणांनीं महाराजांचे सैन्यांतील रणांचें शिंग वाजलें ! पिताजींची समाधि उतरली !

इकडे ताईसाहेबांच्या खोलींत हि असा च प्रकार घडत होता. त्यांना आजच्या युद्धांत भाग घेण्याची अनुज्ञा पिताजींनीं दिली असल्या मुळें त्यांनीं रणवेश घेतला होता ! त्यांची सखी रतन हि त्या वेषानें सज्ज झाली होती !

पिताजी प्रमाणें या दोघीं हि रोज गजेंद्राची प्रार्थना म्हणत असत ! आतां हि त्यांनीं अनन्य भावानें प्रार्थना चालविली होती :—

**" ॐ नमो मूलप्रकृतये अजिताय महात्मने । अनाश्रयाय देवाय निःस्पृहाय नमो नमः ॥ १ ॥ नमो जग-प्रतिष्ठाय गोविंदाय नमो नमः । नमो देवाधिदेवाय स्वभावाय नमो नमः ॥ २ ॥ भाक्तिप्रियाय वरदीप्तिसुदर्शनाय । फुल्लारविंदाविपुलायतलोचनाय ॥ देवेन्द्रविघ्नशमनोद्यतपौरुषाय । नारायणाय वरदाय नमोऽच्युताय ॥ ३ ॥ नारायणाय परलोकपरायणाय । कालाय कालकमलायतलोचनाय ॥ रामाय रावणविनाशकृतोद्यमाय । धीराय धीरतिलकाय नमो वराय ॥ ४ ॥ पद्मासनाय मणिकुंडलभूषणाय । कंसांतकाय शिशुपालविनाशनाय ॥ गोवर्धनाय सुरशत्रुनिकृंतनाय । दामोदराय विरजाय नमो वराय ॥ ५ ॥ प्रभवं तं गुणाध्यक्षमक्षरं परमं पदम् । शरण्यं शरणार्तानां प्रपद्ये भक्तवत्सलम् ॥ ६ ॥ आदिदेवमजं विष्णुं व्यक्ताव्यक्तं सनातनम् । नारायणमणीयांसं प्रपद्ये ब्राम्हणप्रियम् ॥ ७ ॥ नमस्ते पुंडरीकाक्ष भक्तानामभयंकर । सुब्रम्हण्य नमस्तेऽस्तु त्राहि मां शरणागतम् ॥ ८ ॥ "**

दोघीं हि प्रार्थनेंत तल्लीन झाल्या ! ताईसाहेब समोरच्या तसबिरीकडे सारख्या पाहात होत्या ! चित्र हललें ! ताईसाहेबांच्या डोळ्यांत तेज चमकलें ! त्यांना काय दिसलें ? फकीरशाहीचे, देवब्राह्मणसंरक्षक शिवशाहीचे पंत प्रधानरूपी महाविष्णु, त्या च साम्राज्याचे धनदाते, भाऊसाहेबरूपी विनतात्मजा बरोबर, दुष्ट—निर्दालन—सुष्ट—संरक्षण करणारी प्रचंड करवाल हातांत घेऊन, पंचकल्याणी अबलख घोडा उडवीत येत आहेत ! देवांच्या पापण्या मिटत नाहींत म्हणतात ! त्या प्रमाणें हें मनोहर दृश्य पहात असतां, त्या दैवी संपत्तियुक्त ताईसाहेबांच्या हि पापण्या हालल्या नाहींत ! अनिमिष नेत्रांची टक त्या चित्रा वर लागली !

रतनला हि चित्र हलल्याचा भास झाला ! तिला दिसलें, भाऊसाहेबांच्या उपदेश-परिसानें सुवर्णमय बनलेले मानसिंह वीस हजार शाही फौज पाठीशीं घालून, पिताजींच्या छावणी वर चालून येण्याच्या मिषानें निघाले आहेत ! अंगार मैदानांत ते ससैन्य आले ! खरें च कां ते शत्रूस—पातशाहीस—पुन्हां

मिळाले ?...पण हें काय ?...मैदानांत आलेलें सैन्य धडपडतें काय म्हणून ? ...अं ! तें कोठें गेलें ?... रागावलेल्या बुंदेली भूमातेनें त्याला आपल्या पोटांत रिचविलें काय ?... एकटे मानसिंग च शांतपणें इकडे कसे येत आहेत ? हा काय प्रकार आहे ?... कांहीं एक कल्पना तिच्या डोक्यांत चमकून गेली ! तिला अत्यानंद झाला !

पण इतक्यांत पिताजींच्या सैन्यांतील प्रचण्ड रणभेरी वर खुणेचे आवाज काढणारें टिपरं झडूं लागलें ! निःसाणीं धाव पडूं लागले. दोघी जागृतावस्थेंत आल्या !

दोघींनीं तसबिरीस वंदन केलें आणि पिताजी होते त्या ठिकाणीं येऊन त्यांना हि वंदन केलें ! पिताजींनीं त्यांच्या पाठी वरून आपला अभय हस्त फिरविला व ते म्हणाले:—

पि— बेटीयाँ ! आजच्या युद्धांत, तुमच्या इच्छे प्रमाणें भाग घेण्यास, मी तुम्हांस परवानगी देतों !

ता— पिताजी ! आजच्या युद्धांत रणचंडीचें कार्य मीं करावें अशी च त्या महाकालाची इच्छा दिसते, म्हणून दादानें हा बनाव बनवून आणला ! महाकाळाची इच्छा मीं अवश्य पूर्ण करीन !

पृथ्वी— ताईसाहेब ! आपली बहादुरी, आपलें रणचंडीचें भैरव नृत्य मागें च भैरव घाटींत सर्वांच्या परिचयास आलें आहे !

पूर्ण मध्यरात्र झाली ! महंमद व काईमनें, मानसिंहाची वाट पाहिली; पण तो किंवा त्याचें सैन्य आलें नाहीं ! मात्र त्याचा एक हेर येऊन सांगून गेला कीं, "मानसिंहजी सैन्य घेऊन येत आहेत, दोन घटिकांनीं ते येऊन पोहोंचतील; ते महाराज पिताजींच्या पिछाडी वर हल्ला करणार आहेत; तरी खानसाहेबांनीं त्यांची वाट पाहण्यांत विनाकारण वेळ न गमावितां, पिताजींच्या अघाडी वर प्रथम हल्ला चढवावा !" हा निरोप ऐकल्या वर त्या प्रमाणें करण्याचें पिता–पुत्रांनीं ठरविलें ! मानसिंह बोलल्या प्रमाणें करील, या बद्दल त्यांना आतां तिळमात्र शंका नव्हती !

पूर्वीचा बेत, मानसिंहाचें सैन्य राखीव म्हणून ठेवण्याचा ठरला होता; पण आतां त्यानें तो बदलला ! तथापि हा बदललेला बेत, पहिल्या बेतांपेक्षां उत्तम होता ! आतां राखीव सैन्य तर थोडें फार अवश्य ठेवण्यास हवें;

त्याची योजना कशी करावी, याचा विचार चालू असतां, नूरखानानें आपण होऊन तें काम स्वतःकडे घेतलें आणि पिता-पुत्रांनीं त्यास संमति हि दिली !

मध्यरात्र उलटली ! महंमदानें आपल्या सैन्याच्या दोन तुकड्या करून एक आपल्या व दुसरी काइमच्या हातां खालीं घेऊन, आपली लपण्याची जागा सोडली आणि महाराजांच्या सैन्यावर धांव मारली ! त्याला वाटले आपण महाराजांच्या सैन्याचें सौप्तिक-पर्व करूं ! पण अनुभव वेगळा आला !

वेगघाचा दौड, महाराजांच्या छावणी वर वसरण्या पूर्वीं च त्यांच्या छावणींतील युद्धाचा दुंदुभी धुडुम धुडुम वाजूं लागला ! निस्तब्ध छावणी एकदम जागृत झाली. ठराविक जागीं ठराविक सैन्याच्या तुकड्यांनीं ठराविक व्यूह रचना केल्या. पायदळांनीं आपल्या म्यानांतून तरवारी उपसून रोखून धरल्या ! घोडदळानें आपले भाले सरसावले ! गजदळांतील हत्तींनी, साखळ्या व पट्टे धारण केलेल्या आपल्या शुंडा वर उचलल्या आणि त्यांच्या वरील लढाक लोकांनीं आपल्या धनुष्यांस बाण लावले ! सुतर ( उंट ) स्वारांनीं आपल्या जेजाल्यांत दारु ठांसून, कान्यांतील रंजक शिलगविण्यास हातांतील तोंडे सरसावले ! तोफखान्यांतील तोफा पोटांत गोळे घेऊन आग ओकण्यासाठीं तोंडें वासून तोफचींच्या इशाऱ्या कडे कान लावून बसल्या ! अशी सर्व सिद्धता झाली ! !

महाराज आपल्या डेऱ्याच्या बाहेर आले. तेथें कुमार जगतराज, ताईसाहेब, रतन, मुख्य सेनापति पृथ्वीसिंह, हमीदखान व प्रमुख सेनानायक होते. सर्व पायउतारा असून त्यांचे घोडे त्यांच्या जवळ उभे होते. महाराजांनीं घनगंभीर आवाजानें म्हटलें:—

पि — **जय, जय, रघुवीर समर्थ** ! भाईयों ! ऐका ! रणभेरी वाजूं लागली ! शत्रु दिसूं लागला ! लडकों ! ठरलेली वेळा आली ! जास्त बोलण्यास वेळ नाहीं ! हा भेरीचा निनाद ऐका ! ही स्वातंत्र्याची – आजादीची – भेरी आहे —

( राग–मालकंस. तीन ताल. )

" **भेरी बजी संग्रामकी । आजादीसे गूंजी दिशायें ॥ धृ० ॥**
**आकाशमें रण रंग छाये । भयभीत हो, रिपु काँप जाये ॥ १ ॥** "

लडकों ! आज असा पराक्रम गाजवा, कीं वरून देव व तुमचे पूर्वज तुमचें

कौतुक करतील! माझ्या, तुमच्या या बुंदेलखंडास आजादीच्या स्वर्गात ठेवा-वयाचें कां पारतंत्र्याच्या रौरवांत कायमचें गाडावयाचें, हें आज तुमच्या हातीं आहे! युद्ध जिंकाल तर आजादीचा आनंद भोगाल, रणांगणांत पडाल तर स्वर्गास जाल!! बोला! **"जय, जय, रघुवीर समर्थ!"**

तेथें जमलेल्या मंडळीनें मोठ्यानें घोष केला, **"जय, जय, रघुवीर समर्थ!"** तसेंच **"महाराज छत्रसालकी जय!"** असा जयजयकार करून महाराजांना लष्करी सलामी दिली!

तो जयजयकार ऐकून, सर्व सैन्यानें हि "महाराज छत्रसालकी जय, जय, जय, रघुवीर समर्थ"! हा जयघोष करून महाराजांना सलामी दिली!

ही सलामी देण्याला आणि शत्रूचें सैन्य, महाराजांच्या सैन्यावर येऊन आदळण्यास एक गांठ पडली! महंमदाच्या ध्यानीं मनीं नसलेलें दृश्य त्याच्या पुढें उभें राहिलें! त्याचा झंझावात महाराजांच्या सेनारूपी विंध्य पर्वतावर झापटून फुटला! महाराजांच्या तोफा आपल्या लाल मुखांतून लाल उल्का फेकूं लागल्या! जेजालांनीं आपल्या पोटांत लपविलेलें तारांगण प्रकट केलें! हत्तींच्या सोंडांतील सांखळ्या व पट्टे सपासप फिरूं लागले व त्यांच्या वरील लढाकांच्या धनुष्यांच्या प्रत्यंचा भराभर बाण विऊं लागल्या! घोडदळाच्या भाल्यांनीं अमित्रांच्या छातींतील अशुद्धाचें सेवन करण्यास प्रारंभ केला आणि पायदळाच्या रोंखलेल्या तरवारी शत्रूच्या हृदयाचा ठाव घेण्या साठीं खसखस करूं लागल्या! घनचक्कर युद्ध सुरूं झालें!!

महंमद क्षणमात्र हतबुद्ध झाला! साक्षात् कालीमाता आपली लळलळ करणारी घोर जिव्हा तोंडा बाहेर काढून हंसत हंसत तांडव करीत आहे, असा त्याला भास झाला! या गडबडीत तो एकटा सांपडला! काईमची तुकडी व काईम दुसरी कडे गुंतला गेला! आणि नूरखान?

महंमदानें थोडा विचार केला. आश्चर्याचा पहिला झटका ओसरल्या वर त्यानें एकंदर प्रकार ध्यानांत आणून आपल्या तुकडीची पुन्हां स्थीरस्थावर करून शिस्तीनें त्यानें महाराजांच्या सैन्या वर चाल केली. तो शूर होता; न घाबरतां त्यानें आंगेजणी करून महाराजांच्या पायदळास रेटण्यास आरंभ केला. तेथें कचाकची सुरूं झाली. खानाचें सैन्य, महाराजांच्या सैन्याच्या तिप्पट होतें. त्या मुळें थोड्या वेळानें खानाच्या सैन्याची सरशी होऊं लागली,

महाराजांचें पायदळ हळूं हळूं मागें सरकूं लागलें !

पृथ्वीसिंह सेनापतींनी हें पाहिल्या वर, ते जातीनें त्या ठिकाणीं धांवून गेले. त्यांचें व महंमदाचें द्वंद्व सुरूं झालें. महंमद जरी वृद्ध होता तरी पृथ्वीसिंह त्याच्याहून हि वृद्ध होते. शिवाय आतां पर्यंत लढून ते थकले होते. त्या मुळें त्यांच्या हातांत त्राण उरलें नव्हतें. महंमदाच्या तरवारीच्या एका जबरदस्त वारानें त्या वृद्ध सेनापतीच्या हातांतील तरवार गळून पडली ! वास्तविक अशा वेळीं खरा धर्मयोद्धा स्वस्थ बसतो, पण खानाचें व धर्मानें सख्य कोठें होतें ? त्यानें पृथ्वीसिंहाची असहाय्य स्थिती ध्यानांत घेऊन, आपला तरवारीचा हात वर उचलला ! आतां तो हात पृथ्वीसिंहाच्या मस्तका वर कोसळणार--

इतक्यांत त्या हातांतील तरवार, एका अज्ञात व्यक्तीच्या तरवारीच्या वारानें उडून लांब जाऊन पडली ! खान मागें वळून पाहतों तो नूरखान ! नूरखानानें झटकन् आपली तरवार, महंमदाचे छाती वर टेंकली आणि आपल्या शेजारच्या शिपायां कडे पाहून हुकूम केला--

नू.--महंमदखानास गिरफदार करा !

लगे च सात आठ शिपायांनीं महंमदास पकडून त्याच्या मुसक्या बांधल्या व त्याला तरवारींच्या पहाऱ्यांत तेथून दुसरी कडे नेलें ! हा प्रकार इतक्या थोड्या वेळांत झाला-दोन चार पळांत- कीं, महंमद तेथून बराच दूर गेला तरी त्याच्या ध्यानांत तो स्पष्टपणें कांहीं येईना !

तिकडे काईमच्या टोळीनें, महाराजांच्या शुतरस्वारां वर हल्ला केला; त्यांनीं दारूचे बाण उंटांवर सारखे सोडल्याने, तीं जनावरें बुजलीं त्यांची फळी फुटली. काईम त्या फळीच्या आंत घुसला. त्याचा मुख्य हेतु लढण्याचा नव्हता च. वीररसा पेक्षां शृंगाररसा कडे त्याचें मन ओढ घेत होतें आणि त्या साठीं-ताईसाहेबांना पकडण्यासाठीं-त्याची सारी धडपड व घाई होती ! महाराजांच्या तंबू कडे त्याची धांव सुरूं होती.

महाराज, आपल्या शामियान्या जवळ उभे-घोड्या वर स्वार होऊन-होते. जवळ, जगतराज, हमीद, रतन व ताईसाहेब हि होत्या. तेथून युद्ध कसें काय चाललें आहे हें पाहून, निरनिराळे आदेश देण्याचें काम पिताजी करीत होते. इतक्यांत एक स्वार दौडत आला व त्यानें, काईमनें सुतर स्वारांची

फळी फोडून तो इकडे येत असल्याची बातमी दिली ! ती ऐकून सर्वांच्या तोंडा वर काळजीची छटा उमटली !

ह—मानसिंहानें आपली कामगिरी बजावली असें वाटतें ! पण महंमदनें येथलें सैन्य सुद्धां आपल्याला भारी आहे. वास्तविक आतां पर्यंत गुरुदेव व श्रीमंत येथें येऊन पोहोंचावयास पाहिजे होते ! काय झालें कोणास ठाऊक ?

ज— ( आश्चर्यानें ) हें असें कसें झालें ? पण आतां विचार करावयास वेळ नाहीं; ही परीक्षेची वेळ आहे ! तांतडीनें निश्चय ठरविला पाहिजे.

पि— धीर सोडूं नका ! तो महाकाल सर्व मंगल करील ! " श्रीरघुपति दीन हितकारी " आहे ! जगत ! तूं काईमच्या सैन्यास थोपवून धर; तसें च या दोन्ही पर्वतांच्या माथ्यां वरील आपल्या राजगड व भूपालगडच्या किल्ले• दारांना, हिरदेसानें ठरवून ठेवल्या प्रमाणें सूचना कर ! बहुधां हिरदेसानें ती केली असेल; कारण तो त्या च कामांत गुंतला आहे. मी येथें काईमला अडवितों; माझ्या मदतीस हमीद आहे !

ज— ( सद्गदित होऊन ) पिताजी ! प्रसंग फार बांका आहे ! हमीदभाई ! पिताजी व ताई यांच्या संरक्षणाचें काम तुमच्या वर सोंपवून जातों ! वचनास जागाल असा भरंवसा आहे !

ह— ( सद्गदीत होऊन, पिताजींच्या पायांवर हात ठेवून ) जगतराजभाई ! वचन पाळीन, हें सरकारांच्या नव्हे माझ्या या बाबाजानच्या—पिताजींच्या— पायांची शपथ घेऊन सांगतों ! प्रसंग बांका असला तरी हमीदच्या शरिरांत प्राण असे पर्यंत, पिताजींच्या व ताईसाहेबांच्या केसास धक्का हि लागणार नाहीं अशी खात्री बाळगा ! आपण निर्धास्त जा ! जय, जय, रघुवीर समर्थ !

कुमारांनीं पिताजींना वंदन करून हमीदला आलिंगन दिलें व ते तेथून शत्रू सैन्या कडे घोडा फेकीत निघून गेले. तथापि शत्रु सैन्य हळू हळू पुढें सरकत येत आहे, हें पिताजींनीं पाहिलें व सात आठ पळें विचार करून ते हमीद कडे वळून म्हणाले—

पि—बेटा, हमीद ! तूं हि जा. काईमच्या तुकडीस थोपवून धर ! माझी काळजी करूं नको.

ह— नाहीं पिताजी ! मीं आपले पाय सोडून जाणार नाहीं !

पि— वेड्या ! आतांची वेळ प्रत्येकानें आपली कमाल करण्याची आहे !

माझ्या बद्दल बिलकूल काळजी करूं नको. मी माझी काळजी घेण्यास समर्थ आहे

ह—पण जगतभाईंनीं माझ्या वर विश्वास टाकला आहे! त्या विश्वासाचा घात मी कसा करूं? नाहीं! मी जाणार नाहीं!

**ताई**—भाई हमीद! मी पिताजींचें रक्षण करण्यास समर्थ आहें! माझ्या वीरवृत्ती बद्दल तर तुमच्या मनांत शंका येणार नाहीं ना! रतन हि माझ्या मदतीस आहे! आपण चौघे हि येथें एके जागीं राहून काय फायदा?

पि— बेटा हमीद! ताईचें ऐक! मी ऐशी वर्षांचा बुढ्ढा असलों तरी आज तुझ्या इतपत हिंमतीनें लढेन! आज माझ्या अंगांत पितामह भीष्माचार्य अवतरतील! (म्यानांतून तरवार उपसून) ही, परम पावन श्रीशिवप्रभूंची परम पवित्र **तुळजा**! ही जों पर्यंत माझे हातांत आहे तों पर्यंत या पापी अत्याचारी साम्राज्याचे तीस हजार च काय पण पन्नास हजार सैन्य जरी माझ्यावर तुटून पडलें तरी मला त्याची पर्वा नाहीं! जा, बेटा! तूं माझा जगत च आहेस! पित्याची आज्ञा पुत्रानें मानावयाची कीं नाहीं?

ह— (सद्गदित) पण पिताजी?—

पि— पण बीण नाहीं! तुला माझी शपथ आहे! तूं महंमदवर चालून जा, पृथ्वीसिंहास मदत कर! तो माझ्या सारखा च वृद्ध आहे! तूं तिकडे गेलास तर आपल्या सैन्यास धीर येईल!

इतक्यांत काळ मैदानाच्या, त्या काळघाटाच्या दोन बाजूंस जे उंच पर्वत होते, त्या पर्वतां वरून शाही फौजे वर धडाधड तोफा सुटूं लागल्या! त्या पर्वतांच्या माथ्यां वर महाराजांचे दोन किल्ले–राजगढ व भूपाल गढ–होते. ही सर्व योजना महाराज कुमारांनीं पूर्वी च ठरवून ठेवली होती! या दोन्हीं किल्ल्यांच्या माऱ्यांत काळघाट होता! असल्या ठिकाणीं महंमदास मुद्दाम खेंचून आणून तेथें त्याचा धुव्वा उडवायचा बेत महाराजकुमारांनीं मुद्दाम ठरवून तो पिताजींना कळविला होता!

पि— हमीद! ऐक! या पर्वतां वरील आपल्या राजगढ व भूपालगढांतून सुटलेले तोफांचे आवाज ऐक! या माऱ्यानें शत्रूची रेवडी उडेल! तसें च या पर्वतांतील दऱ्या खोऱ्यांतून, गुहांतून, भुडळ्यांतून, फट्यांतून लपवून ठेवलेल्या तोफांचे हे बार ऐक! आतां भिण्याचें कारण नाहीं! जा!

नाइलाजानें पिताजींच्या पायांवर मस्तक ठेऊन हमीदखान, शत्रुसैन्याच्या रोंखानें निघून गेला !

इकडे, काईमला आपल्या सैन्यावर, पर्वतांच्या माथ्यां वरून व आसपासच्या गुहांतून होणाऱ्या तोफांच्या गोळ्यांची वृष्टि पाहून आश्चर्य वाटलें ! त्याला त्याचा उमज पडेना ! त्यानें जवळच्या स्वारास मानसिंह आला कीं नाहीं याचा तलास काढण्यास पिटाळलें व आपल्या सैन्यास पुढें जाण्यास हुकूम देऊन त्यास उत्तेजनपर शब्द बोलत तो तेथें च थांबला ! थोडया वेळानें एक स्वार दौडत तेथें आला. तो घाबरलेला दिसत होता. त्यानें घाबऱ्या घाबऱ्या म्हटलें–

**स्वा**— सरकार ! बाबासाहेब सरकारांना, नूरखानानें कैद केलें ! नूरखान, दुष्मनांना मिळाला !

ही बातमी ऐकून काईमला आश्चर्याचा मोठा धक्का बसला ! तो त्याच्यां-तून सावध होतो न होतो तों च मानसिंहाच्या शोधास पाठविलेला स्वार, घोडा फेकीत तेथें आला ! त्याच्या बरोबर दुसरा एक स्वार होता, त्याची मुद्रा भीतीनें कावरीबावरी झाली होती ! त्याची बोबडी वळली होती ! त्याच्या तोंडांतून धड शब्दोच्चार होत नव्हता ! त्यानें काईमला सलाम करून म्हटलें–

**स्वा**— सरकार ! मानसिंह .... फि...फितुरी....बनला...

नूरखानाची फितुरी ऐकून रागावलेल्या काईमनें अधिक रागावून स्वारास म्हटलें––

**का**— हरामजादा ! ऐ, बेवकूब ! काय झालें तें स्पष्ट सांग ! नाहीं तर तुझें डोचकें या समशेरीनें तोडून टाकीन !

**स्वा**— स...सरकार ! माझा गरीबाचा काय अपराध ? या पर्वताच्या मागें...एक अंगार मैदान आहे ! त्या मैदानांत...सगळी कडे खालीं वर... जिगनू ( काजवे )...चमचम करीत आहेत ! मानसिंहानें आपलें वीस हजार सैन्य त्या मैदानांत आणलें...तेथून इकडे येण्याचा रस्ता...पण मैदानांतून सैन्य इकडे येतांना...या, अल्ला ! काय झालें...

**का**— ( रागानें ) गढ्या ! काय झालें तें झटपट सांग.

**स्वा**— गरीबपरवर ! माझा कांहीं अपराध नाहीं ! त्या मैदानांत जिन

( पिशाच्य, भूत ) आहे !...त्या भूतानें आपलें सारें सैन्य...खाऊन टाकलें...आम्ही चार पांच जण च वांचलों...आपल्यास ही बातमी देण्यास ...इकडे दौडत आलों !

काईमनें ही बातमी ऐकली ! त्याला तिचा कांहीं बोध होईना ! एवढें मात्र त्याला समजलें कीं, कांहीं तरी घोंटाळा उडाला आहे खास ! मानसिंह–आपला प्यारा दोस्त–हि फितूर ! आपण इतके कसे आंधळे बनलों ? तो आपल्या वर पुष्कळ चरफडला ! पण ती चरफडण्याची वेळ नव्हती ! शत्रूला ही अंगार मैदानांतील बातमी समजून त्यास हुरूप येण्या पूर्वीं च आपण महाराजांच्या तंबूवर हल्ला केला पाहिजे व आपली शिकार साधली पाहिजे, असा तडकाफडकीं मनाशीं निश्चय करून, त्यानें आपल्या जवळील पन्नास निवडक स्वार घेऊन पिताजींच्या शामियानाच्या रोखानें–शामियाना कोणी कडे आहे ही बातमी त्यानें आतां पर्यंत काढली होती—सपाट्यानें दौड मारली !

खरें च मानसिंह कोठें होता ? त्याच्या हातां खालील वीस हजार शाही फौजेचें काय झालें ? आग्यांच्या अंगार मैदानांतील आग्या वेताळानें तिला खाऊन टाकलें, असें तो स्वार म्हणाला होता ! ही काय भानगड आहे ?

चंदनगडा वर ठरलेल्या मसलती प्रमाणें प्रथम अर्धें सैन्य घेऊन, काईम काळ घाटा कडे निघून गेला. पुढें ठरलेली वेळ संपल्या नंतर शिलकी अर्धें सैन्य घेऊन मानसिंह निघाला. त्यानें काईमनें पत्करलेला नेहमीचा रस्ता सोडला व दुसरा रस्ता पकडला. मध्य रात्रीच्या सुमारास तो आपल्या फौजे-निशीं त्या अंगार मैदानाच्या तोंडाशीं येऊन थडकला !

हें मैदान फार मोठें होतें. त्यांत, संध्याकाळ झाली कीं, असंख्य, क्रोडो-गणति काजवे–आग्ये–चमचम करावयास लागत ! तें दृश्य पाहिले कीं, असें वाटे, वरील नक्षत्रांकित आकाश खालीं उतरलें आहे ! या मैदानांतून पार जाण्यास दोन स्वार एकमेकांशीं खेटून जातील, एवढ्या च रुंदीचा एक रस्ता होता. जरा त्या रस्त्याच्या बाजूस थोडेसें गेलें कीं जाणारा–मनुष्य असो कीं हत्ती एवढा प्रचंड पशु असो–त्या भूमींत गडप होई. प्रथम एकदम गुडघ्या इतका जाई व मग सुटका करून घेण्या साठीं तो जसजशी धडपड करील तसतसा अधिकाधिक आंत जाई, इतका कीं त्याचा शेवटीं मागमूस हि दिसत

नसे ! त्याच्या डोक्यावरची जमीन– जणूं कांहीं आपल्या पोटांत कांहीं गेलें च नाहीं अशा आविर्भावानें–पुन्हां पहिल्या सारखी सपाट होई !

शत्रूला अशा जमिनींत ओढून आणून त्याच्याशीं युद्ध करावें अशी प्राचीन रीत च आहे ! महाराष्ट्रांत विजापूर प्रांतांत प्रख्यात डोण नदीची थडी अशी च प्रसिध्द आहे; तिच्यांत हत्ती सुध्दां गडप होतो ! तसें च सातारा भागांतील इस्लामपूर कडील प्रांतांत हि अशी एक, गोटखिंडीच्या ओढ्याची जागा आहे; तिला डेरा म्हणतात ! बैलगाडीची बैलगाडी त्या जमीनीच्या पोटांत जिरून जाते ! निजामशाहींत भालकीचें रान असें च आहे वांजरा नदीचे कांठच्या केसर–जवळगें गांवची प्रख्याति अशी आहे. केसर म्हणजे च चिखल, दलदल. जमखंडी जवळील हनगंडी ओढा असा च आहे. असल्या जागांत रात्रीं काजवे कोडोंगणतीनें चमकत असतात ! असल्या जागीं मुसुलमानीशाही व हिंदवीशाही मध्यें युध्दें झालीं होतीं असें इतिहास सांगतो ! गनिमी लढाई करणाऱ्यांनीं, शत्रूला अशा ठिकाणीं आणून जिरवावें अशी आर्य चाणक्यांची आज्ञा च आहे !

“ **त्रिक्रमस्य प्रकाशयुद्धम्, कूटयुद्धम्, तूष्णींयुद्धमिति, सन्धिविक्रमौ** ”

म्हणजे, उघड, गनिमी व हेरां कडून नाश करविणें असें युध्दाचे तीन प्रकार प्रथम सांगून, मग गनिमी–युध्दांतील अनेक युक्त्या सांगतांना, कौटिल्यांनीं

“ **धान्वनसंकटपंकशैलनिम्नविषमनावो गावश्शकटव्यूहो नीहारो रात्रिरिति सत्राणि** ”

म्हणजे, अरण्य, संकटाची जागा, दलदलीची जागा, पर्वत, दऱ्याखोरीं, वेडया-वांकडया नावा, गाई, सैन्याची गाडी सारखी रचना, धुकें व रात्र या साधनांनीं, मोह घालून शत्रूस नामशेष करण्याची ही युक्ति सांगितली आहे ! ही “ **पंक** ” युक्ति महाराजकुमारांनीं प्रथम ठरविली व मानसिंहानें ती अंगार मैदानांत अंमलांत आणली !

मानसिंह मैदानाच्या तोंडाशीं आल्या वर त्यानें आपल्या सैन्यास तेथें उभें केलें. सैन्याच्या सर्व अधिकाऱ्यांना आपल्या जवळ बोलावून त्यांना हुकूम सोडले.

**मा**—हें समोरचें अंगार मैदान ! यांतून आपल्यास पुढें जावयाचें आहे. पलीकडे पर्वत दिसत आहे ना ? त्याला वळसा घालून पुढें जावयाचें ! त्या कोंपऱ्या वर ' गेल्या नंतर, पांच शें साठ गज दक्षिणे कडे वळा; मग आठशें

आठ गज पश्चिमेस जा; तेथून काळघाटास आरंभ होतो. तेथें खानसाहेबांच्या फौजेची व तुमची गांठ पडेल. मी तुमच्या मागें पिछाडी सांभाळण्यास माझें खास पथक ( इतक्या दिवसांत, मानसिंहानें आपल्या विश्वासाचे पन्नास स्वार, आपल्या दिमतींत, स्वतःचें पथक म्हणून नोकरीस ठेवले होते ) घेऊन हजर आहें. प्रत्येक तुकडीनें आपल्या जुम्लेदारासह एका रांगेंत उभे रहावें. आपली प्रत्येक तुकडी शंभराची असल्यानें, साऱ्या सैन्याच्या एका मागें एक अशा या दोन शें तुकडया होतील. सर्वांनीं तयारीनें उभें रहावें. मी या जवळच्या टेकडी वर जातों. तेथें मला एक गुप्त संदेशाची खूण दिसणार आहे ती दिसली कीं मीं तीनदां शंख वाजवीन. तो शंखनाद ऐकल्या वर सर्वांनीं वाऱ्याच्या वेगानें या मैदानांतून निघून सांगितलेल्या रस्त्यानें खानसाहेबांस जाऊन मिळावें. मैदानांत जरी थोडेसें गवत वाढलेलें आहे, तरी तें सपाट आहे शिवाय चंद्राचा व काजव्यांचा प्रकाश आहे च ! हुषार रहो !

या प्रमाणें हुकूम सोडल्या वर मानसिंह त्या टेकडी वर निघून गेला. त्याचें खास पथक टेकडीच्या पायथ्याशीं उभें राहिलें. मध्यरात्र उलटली; तरी पण मानसिंहानें सैन्यास हुकूम दिला नाहीं. एक घटका संपली पण मानसिंहास, पाहिजे असलेली गुप्त संदेशाची खूण दिसली नाहीं ! दीड घटका झाली. भूपालगडाच्या बुरुजा वरून एक तांबडया रंगाच्या दारूचा सुरनळा उडाला ! मानसिंहास खूण मिळाली !

मानसिंहानें, शेजारच्या हुजऱ्यास जोरानें तीनदां शंख वाजविण्यास सांगितलें. शंखनाद झाला. सपाट्यानें घोडदळ व पायदळ मिळून वीस हजारांचा लोंढा अंगार मैदानांतून धांवत निघाला ! पण—

या सुमारास आकाशांत थोडेसें अभ्रें आलें होतें त्या मुळें चंद्रप्रकाश मंद झाला होता. सैनिकांच्या पहिल्या तुकड्या इतक्या जोरानें दौडल्या कीं, पुढचीं माणसें, घोडे, त्या दलदलीच्या पोटांत एकदम सप्‌दिशीं घुसले ! त्यांची काय दशा झाली तें चंद्रप्रकाश अस्पष्ट झाल्यानें मागच्यांना दिसेना; त्यांत पुढें जेव्हां आरडाओरड सुरू झाली, तेव्हा त्या गडबडीनें अधिक घोंटाळा उडाला ! इतक्यांत मानसिंह ज्या टेकडीवर होता त्या बाजूस शिंगाचा कर्कश आवाज झाला. तत्काळ भूपालगडावरून, अंगार मैदानाच्या रोखानें धडाधड तोफांचे गोळे येऊं लागले ! गडाच्या पाठी मागें च हें मैदान होतें. या माऱ्या

पूर्वी अर्ध्या पेक्षां अधिक सैन्य दलदलीनें आपल्या पोटांत रिचविलें होतें च! उरलेलें बाहेर पडण्या साठीं धडपड करीत असतां, मारा सुरूं झाला; तेव्हां या अचानक माऱ्यानें बाकीच्या सैन्याचा निकाल लावला! त्या स्वाराच्या म्हणण्या प्रमाणें खरोखर च दहा पांच सैनिक शिल्लक राहिले!

भूपालगडा वरील पहिली तोफ सुरूं झाली आणि मानसिंह आपल्या पन्नास स्वारांसह त्या टेकडी वरून जो अदृश्य झाला तो काळ घाटांत पिताजींच्या सैन्यांत येऊन दाखल झाला! या प्रमाणें महंमद व काईम यांनीं महाराज कुमारांची मसलत—पस्तीस, चाळीस हजार सैन्य दिल्लीस पाठविणें—वरून कबूल करून आंतून गुप्तपणें जो सुरुंग—ती फौज चंदनगडा वर ठेवून आयते वेळीं तिचा उपयोग करणें—त्या मसलती खालीं खोदला होता, त्याला कुमारांनीं हा—अंगार मैदानांतील दलदलींत निम्मे फौज बुडवायचा—काट सुरुंग लावला होता! आणि तो आयते वेळीं उडवून खानाचा मूळचा सुरुंग बेकार केला! जणू काय, बुंदेलखंडाच्या भूमिमातेनें, पातशाही वर सूड उगवला! आपल्याला पारतंत्र्यांत गाडण्यास सिद्ध झालेल्या शाही सैन्यास या मातेनें आपल्या पोटांत कायमचें गाडून टाकलें!!

काईमनें, महाराजांच्या शामियानाच्या रोखानें पन्नास स्वारांनिशीं दौड मारली! शामियानाच्या जवळ एका घोडेस्वारा वर पांढरें शुभ्र छत्र धरलेलें दिसत होतें! तो स्वार म्हणजे महाराज. तें छत्र पाहून काईम तिकडे धांवला!

का— शिपायांनो! तो पहा बुड्ढा राजा! सर्व जण माझ्या बरोबर चला! राजाजी जवळ सात आठ स्वार आहेत! तुम्हीं पन्नास जण त्यांचा धुव्वा सहज उडवाल! राजाजींस जिवंत पकडावयाचें आहे! तें काम मी करतों! चला!

ही मंडळी दौडत तेथें येत होती. ताईसाहेबांनीं पूर्वी एकदां काईमला पाहिलें असल्यानें त्यांनीं त्याला ओळखलें व येणाऱ्या प्रसंगाची जाणीव सर्वांना करून दिली! सर्व जण तयारीनें उभे राहिले. इतक्यांत तेथें येऊन दाखल झालेल्या काईमनें, महाराजांना म्हटलें:—

का— राजा छत्रसालजी! मुकाट्यानें तरवार म्यान करून आमच्या स्वाधीन व्हा!

ताईसाहेब, पिताजींच्या मागें घोड्या वर स्वार होऊन उभ्या होत्या; त्यांनीं झरकन आपली तरवार, म्यानांतून काढली!

**पि**—तें कालत्रयीं होणार नाहीं !

**का**—राजाजी ! आपण विनाकारण हट्ट धरूं नका ! तिकडे आपल्या सैन्याचा नाश होत आहे ! तेव्हां अशा स्थितींत आपण किती वेळ तग धराल ?

**पि**—भगवंताची जशी इच्छा असेल तसें होईल ! ( भूपालगड व राजगडा वरील तोफांचे आवाज ऐकून ) ह्या आमच्या किल्ल्यां वरील तोफांचे हे आवाज ऐका ! आमच्या या माऱ्यानें थोड्या वेळांत तुमच्या सैन्याचा खुर्दा होईल ! आपण आपल्या चंदनगडच्या फौजेची वाट पहात असाल पण ती—

इतक्यात एक स्वार–मानसिंहाच्या बेहड्यांतील–तेथें घोडा फेकीत आला व त्याने महाराजांना वंदन करून, काईम कडे तोंड करून म्हटलें—

**स्वा**— ती वीस हजार फौज अंगार मैदानाच्या दलदलींत कायमची गाडली गेली ! काईम खान ! तिची आशा आतां कायमची सोडा !

ही बातमी ऐकून पिताजी, ताईसाहेब व त्यांची मंडळी आनंदानें प्रफुल्लित झाली व काईम आणि त्याचे स्वार दुःख व भीति यांत चूर होऊन गेले !

पुन्हां आणखी एक स्वार तेथें आला. त्यानें पिताजींना वंदन केलें.

**स्वा**— महाराज ! नूरखानांनीं, महंमदखानास ( काईम कडे वळून ) तुमच्या बापास कैद केलें.

थोड्या वेळां पूर्वी आपल्या स्वारानें सांगितलेली बातमी खरी आहे, हें पाहून काईमला पहिल्यानें वाईट वाटलें; नंतर तो रागावला !

पिताजींनी व त्यांच्या मंडळींनें या दोन्ही बातम्या ऐकल्या वर मोठ्या आनंदानें " जय. जय, **रघुवीर समर्थ** ! जय, महाकाल ! " अशी गर्जना केली. नंतर पिताजी खेरीज इतरांनीं " महाराज छत्रसाल की जय ! " असा जयघोष केला ! तो ऐकून काईम अतिशय चिडला ! जणूं सापाच्या शेंपटी वर पाय दिला गेला ! हळूं हळूं त्याच्या ध्यानांत महाराजकुमार–मानसिंह—नूरखान यांनीं केलेली नेताजी गनिमाई आली ! पण आतां काय ?

**का**— ( रागानें ) राजाजी ! तुम्हीं मसलत उत्तम रचली ! आमचा डाव हुकला ! पण अजून हि आमची बाजू सरस आहे ! अजून आमची फौज तुमच्या तिप्पट आहे ! आणि तुम्हांस आतां कोणी मदतनीस नाहीं !

पि— खान! तुम्ही विसरतां. आमचा एक मदतनीस आहे! तो तुम्हांस माहीत नाहीं! त्याचें नांव तुम्हां सारख्या जुलमी पातशाहीच्या सरदारांना केव्हां च आठवणार नाहीं!

का— ( ऐटीनें ) माझी थट्टा करतां होय? तुमचा मदतनीस मला तर कोठें दिसत नाहीं!

पि— ( उल्हसित वृत्तीनें ) नाहीं च दिसणार! तो, त्याच्या भक्ताचे हृदयांत असतो. त्याचें नांव, तुम्हांस ऐकावयाचें आहे काय? ऐका! त्याचें नांव "**दीनन दुःखहरन देव। संतन सुखकारी**" असा जानकीनाथ! काईम! "**जानकीनाथ! सहाय करे जब, कौन बिघाड करे नर तेरो**" हें तुम्हांस माहीत आहे काय? तो जानकीनाथ आमचा मदतनीस आहे! समजलांत?

का—( हेळणेनें हंसून ) या बुड्ढ्या लोकांच्या गोष्टी आहेत! त्या मला सांगूं नका. मुकाट्यानें शस्त्र खालीं ठेवा. माझ्या स्वाधीन व्हा!

पि—( गंभीरपणें ) एकदां सांगितलें तें च अखेर पर्यंतचें माझें म्हणणें आहे! शस्त्र खालीं ठेवलें जाणार नाहीं! तुम्हांस काय करणें असेल तें करा!

का—( रागानें ) अस्सें काय? मग परिणाम भोगण्यास सिद्ध व्हा!

काईमनें आपल्या स्वारांना, पिताजींच्या स्वारां वर तुटून पडण्यास हुकूम दिला व आपण तरवार सरसावून पिताजीं वर धांवला!

पिताजींनीं हि "**जय, जय, रघुवीर समर्थ! जय, महाकाल!**" म्हणून काईमच्या घोड्यास स्वतःचा घोडा भिडविला! दोघांचें द्वंद्व जुंपलें! दोघे हि शूर! काईमनें पुष्कळ खटपट केली, पण पिताजी त्याच्या तावडींत सांपडेनात! पितामह भीष्म च जणूं आज अवतीर्ण झाले! एक घटका द्वंद्व चालूं होतें. या वेळेस दैवानें काईमला हात दिला! त्याचा एक हात मर्मी बसून पिताजी घोड्या वर मूर्च्छित पडले! काईमनें आपल्या स्वारांना पिताजींचा घोडा ताब्यांत घेण्यास फर्माविलें!

इतक्यांत पिताजींच्या घोड्याच्या मागें बऱ्या च अंतरावर असलेल्या ताईसाहेबांनीं आपला घोडा काईम वर घातला! त्यांना पाहून काईमला फार आनंद झाला!

काईमचे स्वारांची व पिताजींच्या स्वारांची तिकडे चांगली च जुंपली होती.

खानाच्या स्वारांची संख्या, महाराजांच्या स्वारांच्या सहा सात पट होती! तरी महाराजांचे स्वारांनीं थोड्या वेळांत ती घटवीत आणली. महाराजांचे स्वार आतां जिवावर उदार झाले होते! त्यांनीं काईमच्या निम्या पेक्षां अधिक स्वारांना अल्लाच्या घरीं धाडलें! उरलेल्या पैकीं दोघांनीं, काईमचे शब्द ऐकून पिताजींच्या घोडया कडे चाल केली व ते आतां तो घोडा पकडणार इतक्यांत—

दोन तीर सूं सूं करीत जे आले ते त्या स्वारांच्या छातींतून आरपार बाहेर पडले. त्या सरशीं ते स्वार गतप्राण होऊन जमिनी वर धाडकन् कोसळले! झटकन् तीर सोडणारी व्यक्ति, घोडयावर बसलेली, तेथें येऊन, तिनें पिताजींचें मूर्च्छित शरीर आपल्या घोडया वर उचलून घेतलें व घोडा, शामियान्या कडे फेकला!

हें कृत्य दोन चार पळांत झालें! जणूं वीज चटकन् चमकून गेली! ताई साहेबांनीं हें पाहिलें व त्या आनंदानें म्हणाल्या—

ता—शाबास! शाबास! रतन! तूं पिताजींची शुश्रुषा कर! मी या मर्कटांना, आपल्या स्वारांच्या मदतीनें यमसदनास पाठवितें!

पुन्हां महाराजांचे स्वार व काईमचे स्वार यांची घनचक्कर जुंपली! काईमचे स्वार पुन्हां पुन्हां भूमातेस बिलगूं लागले!

पण काईमचें लक्ष्य तिकडे कोठें होतें! रतननें आपल्या दोन स्वारांना ठार करून पीताजींना सोडवून नेलें हें हि त्याच्या ध्यानांत आलें नाहीं! त्याचें ध्यान कोठें लागलें होतें? समोर त्याची ध्यानमूर्ति जेव्हां पासून त्याला दिसली तेव्हां पासून तो त्या मूर्तीच्या ध्यानांत मग्न होऊन गेला होता! थोडया वेळानें जेव्हां त्या मूर्तीचा घोडा आपल्या घोडया वर येऊन धडकला तेव्हां तो शुद्धीवर आला! मग—

का—वाहवा! ऐ परी? तूं येथें आहेस? तुझ्या साठीं तर माझी ही धडपड होती! ऐ, खुबसूरत! ही तलवार तुला काय करावयाची? ती टाकून दे! माझ्या बरोबर चल!

ता—(रागानें) चूप! मूं बंद कर! तरवार सांवर! युद्धास तयार हो!

का—अरे वा:! तूं तर त्या हिंदूंच्या काली सारखी दिसतेस! या हि रणवेषांत तूं मला सुंदर दिसतेस! तुला लढाईची हौस असेल तर ती हौस

मीं पुढें फेडीन ! आतां माझ्या बरोबर चल ! माझी मुख्य बगम--

ता-- ( तरवार उगारून ) ऐ, सुव्वर ! तुला बेगम पाहिजे नाहीं का ? ही घे बेगम !

असें म्हणून त्यांनीं काईमवर वार केला ! पण त्यानें तो चटकन ढालीवर तटाविला.

का— ( रागानें ) अस्सें काय ? ठीक. तूं अशी ठिकाणावर येणार नाहींस. होऊं दे तर !

असें बोलून त्यानें त्यांच्या वर तरवार उगारली ! द्वंद्व सुरू झालें. दोघांचे घोडे थोड्या वेळानें जखमी झाल्यानें दोघे पायउतारा झाले ! पुन्हां युद्ध सुरू झालें. काईमला वाटलें, दिल्लीच्या पातशहाचे जनान्यांतील बेगमे प्रमाणें, ताईसाहेब म्हणजे नुसत्या शृंगार-पुतळी असतील ! पण त्याचा अंदाज साफ चुकला ! त्या पुरुषा प्रमाणें शूर होत्या एवढें च नव्हें तर शूर पुरुषा पेक्षां हि अधिक शूर होत्या ! त्या पाप्याची नजर त्यांचे वर ठरेना ! त्याच्या म्हणण्या प्रमाणें त्या आज खरोखर च कालीमाते प्रमाणें रणांत पिंगा घालीत होत्या. त्यांची तरवार आलातचक्रा प्रमाणें फिरत होती ! थोड्या वेळानें त्यांनीं खानाची तरवार उडवून दिली !

इतक्यांत लांब " **जय, जय रघुवीर समर्थ ! जय महाकाल ! !** " अशा प्रचंड गर्जना ऐकूं आल्या ! तसें च बंगषाच्या सैन्याचीं हृदयें कांपविणारा, पांचजन्याच्या नादा प्रमाणें अति भयंकर असा शंखनाद सर्वत्र दुमदुमला !

पुन्हां पाव घटकेनें एका प्रचंड दुंदुभीचा स्वर निनादित झाला व त्या च बरोबर " **जय जय रघुवीर समर्थ ! हर ! हर ! महादेव** " अशा कर्णकठोर गर्जना ऐकूं आल्या !

या सर्व जयघोषांनीं व वाद्यांच्या निनादानें काळघाटांतील दऱ्याखोरीं गरजून गेलीं ! त्यांत व वरील आकाशांत निनादाचा प्रतिध्वनी घुमला ! जणूं काय पृथ्वी-आकाश यांतील देवतांनीं महाराजांचा जय होईल अशी भाक च दिली !

होय ! पिताजींचा " जानकीनाथ " धांवून आला ! मदत आली ! पहिलें सैन्य गुरुदेवांचें असून दुसरें श्रीमंतांचें होतें ! श्री विष्णु गजेन्द्रास सोडविण्यास आले ! दोन्हीं सैन्यें एक होऊन बंगषाचे सैन्या वर घसरलीं ! तुमुल

रणकंदन सुरू झालें.

पर्वताच्या एका माची वर एका प्रचंड शीळे वर एक कुबडीधारी तरुण रामदासी उभा होता! तो उच्च स्वरानें, आपल्या सैन्यास उत्तेजन देण्या-साठीं पुढील गीत गाऊं लागलाः—

राम— भाईयों! आजादी के लिये प्राण अर्पण करो! आजादी के भगवान श्रीशिवाजी महाराज की याद करो! उनका जुद्ध–आक्रमण सुनो—

**" दिल्लिय दलन दबाय कर शिव सरजा निरसंक। लूटि लियो सूरत सहर बंकक्कारि अति डंक॥ बंकक्कारि अति डंकक्करि अस संकक्कुलि खल। सोचच्चकित भडोंच्चचलिय विमोचच्चख जल॥ जुद्ध को चढत दल बुद्ध को जसत तब। लंक लौं अतंकन के पतारें पतार में॥ भूषण भनत भार घूमत गयंद कारे। बाजत नगारे जात अरि उर छार से॥ छूटत कमान और गोली तीर बानन के। मुसकिल होत मुरचान हू की ओटमें॥ ताव दे दे मूछन कँगूरन पे पाँव दे दे। अरि मुख घाव दे दे कूदि परे कोट में॥ सुनि मरदाने बाजे हय हिहनाने घोर। मूँछें तररानें मुख वीर धीर जन के॥ एकें कहें मार मार सम्हार समर एकें। शत्रु गिरें मार बीच बेसम्हार तन के॥ कुंडन के ऊपर कडाके उठें ठौर ठौर। जीरन के ऊपर खडाके खडगन के॥ शुंडन समेत काटि विहद मतंगन कों। रुधिर सों रंग रन मंडल में भरिगो॥ बाजीगर कैसी दगा बाजी करि बाजी चढि। हाथी हाथा हाथी तें सहादत उतारिगो॥ "**

भाईयों! आज वो हि समय आया है. महाराजा छत्रसालजी पर महंमद बंगषनें चढाई की है. महाराजाको सहाय्य करेने के लिये राजपुताना आया है और महाराज शाहुछत्रपती के पेसवा साहेब श्रीमंत बाजीरावसाहेब और सेनापति भाऊसाहेब भी पधारें हैं! भाईयों! जोरसें लढो! आज न्यायदानका दिन है. आजका अल्लाका फैसल्लाका दिन हैं. परवरदिगार आज पापी लोगोंकी आंखें खोल देगा. उनकों जबरदस्त ठोकर लगाएंगा. उसका स्वरूप कितना भयंकर है, जानते हो? आज ये लोग मच्छरके माफक तितर भितर हो जायेंगे, और इनके पातशाही पाप और जुलूम के बडे बडे पहाड टूटफूटके कांते हुए ऊन ( लोकर ) के माफक कमजोर होएंगे. अल्ला कहताहे, " व

**माऽआ आद्राऽका मा अल्कारिअतो युमा यकूनु नूनासा कल्फराशिल् मबसुसि व तकुनो अल्जिबालो कऽल इहनिल् मनफूशि.**" सुनो ! भगवानकी हक्की नौबत गरज रही है. जिसको पापी लोग डरते हैं वो हि आजका दिन है. " **वनुफिखा फिस्सुरि जालिका युमुल वईदि.**" इस लिये भगवान के धरम के लिये, दीनेइलाही के लिये जोरसे लढो, जो इस सत्यधरम के लिये जंग करेगा उसके उपर अल्ला मेहेर करेगा और उसका भाग बढाएगा, चाहे वो इस आजादीके जंगमें मर जाय या तो उसकी फत्ते हो ! "**फल युकातिल् फि सबीलिल्लाहि अल्-ज़िना युश्रूना अल्हयातदुनिया बिल्आखिरती व मन युकातिल् फि सबीलिलाहि फयुक्तल ओ युग़लिब फस्फानौतिहि अजरन् अज़ीमुन** "! भगवती काली तुमको सहाय्य दे रही हैं ! माता रणांगन में नाचती हैं—

**चंडी ह्व घुमंडी अरि चंड मुंड चाव करि । पीवत रुधिर कछु लावत न बार हैं ॥ कुद्दद्दरि किय युद्दद्दरि अरि अद्दद्दरि करि । मुंडड् डरि तहँ रुंडड् डकरत डूडड् डग भारे ॥ खेदिद्दर बर छेदिद्दय करि मेदद्दधि दल । जंगग्गति सुनि रंगग्गलि महंमदग्गत बल ॥ मुंड कटत कहुँ रुंड नटत कहुँ सुंड पटतघन । गिद्ध लसत कहुँ सिद्ध हँसत सुखवृद्धि रसत मन ॥ भूत फिरत करि बूत भिरत सुर दूत घिरत तहँ । चंडि नचत गन मंडि रचत धुनि डंडि मचत जहँ ॥ किलकत कालिका कलेजे की कलोल कर । करि कैं अलल भूत भैरौं तमकत हैं ॥ कहूँ रुंड मुंड कहूँ कुंड भरे श्रोनित के । कहूँ बखतर करि झुंड झमकत हैं ॥ खुले खग्ग कंध धरि ताल गति बंध परी । धाय धाय धरनि कबंध धमकत हैं ॥**

याप्रमाणें कविराज—तरुण रामदासी म्हणजे कविराज भूषण होते !—आपल्या सैन्यास चेतवीत होते !

आकस्मिक आलेल्या मदतीनें पिताजींच्या सैन्याची हिंमत शतपट वाढली ! आतां दैवानें पिताजींच्या मस्तकावर हस्त ठेवला ! गुरुदेवांची आणि श्रीमंतांची मिळून सैन्य संख्या पस्तीस हजारां वर होती, शिवाय पिताजींचें सैन्य ! सारांश, आतां महंमदाच्या सैन्याच्या जवळ जवळ दुप्पट सैन्य पिताजींचें

झालें ! खेरीज भूपालगढ व राजगढा वरून तोफांचा मारा होत होता च ! अशा स्थितींत बंगषाच्या सैन्यानें कच खाल्ली ! तें पाहून पिताजींच्या सैन्यानें लगट करून त्या सैन्यावर जोराचे हल्ले चढविले ! बंगषाच्या सैन्यानें पाठ फिरवून घाटाच्या दोन तोंडां कडे धांव मारली ! पण आतां त्याचे नशिब फिरलें होतें ! एका तोंडाशीं पिलाजी जाधवराव आपल्या सैन्या निशीं वाट रोंखून उभे होते तर दुसऱ्या तोंडाशीं रींवा नरेश अवधूतसिंह, महाराजकुमार व धूरमंगद रस्ता अडवून उभे होते ! अशा कचाटींत बंगषाचें सैन्य सांपडलें. तोंडा वर या लोकांचा मारा, पाठीं मागून नूरखान, मानसिंह, जगतराज, पृथ्वीसिंह यांचा मारा व वरून किल्ल्यांचा आणि मैदानांतील गुहांमधील मारा, अशा तीन माऱ्यांत तें सैन्य सांपडलें ! खूप कचाकची झाली ! बंगषाचें बहुतेक सैन्य मारलें गेलें ! सारें चार पांचशें सैन्य शिल्लक राहिले ! अखेरीस त्या सैन्यानें हत्यारें खालीं ठेविलीं व तें शरण आलें !!

गुरुदेव, श्रीमंत व भाऊसाहेब कोठें होते ?

चैत्र शुद्ध द्वादशीची मध्यरात्र, हा युद्ध दिवस ठरविल्याचें महाराजकुमारांनीं गुरुदेवांना व श्रीमतांना कळविलें होतें. त्या प्रमाणें दोघे जण त्या वेळे वर येऊन पोहोंचण्याच्या बेतानें निघाले होते. काळघाटाच्या पलीकडे एका योजना वर दोन्हीं सैन्यांची गांठ पडली. गुरुदेवांना भूषणांनीं, श्रीमंतांनीं व भाऊ-साहेबांनीं अभिवादन केलें. गुरुदेवांनीं त्यांना आशीर्वाद देऊन आपल्या सैन्यांतील रजपूत व मुसुलमान राजे-जहागीरदार यांच्या ओळखी घालून दिल्या. थोडा वेळ पुढील मसलत ठरविण्यांत गेला व पुन्हां हा सेनासागर मार्गस्थ झाला ! मध्यंतरीं एक घाट लागला. घाट अरुंद असल्यानें सर्व सेना पार होण्यास बरा च वेळ लागला ! त्यामुळें काळघाटांत पोहोंचण्यास ठरलेल्या वेळे पेक्षां जरा उशीर झाला !

घाटांत आल्या वर ठरविलेला व्यूह अंमलांत आणून व त्या त्या जागीं आपल्या सैन्याच्या तुकड्या नेमून, पूर्वी च युद्धास प्रारंभ झाले मुळें, ताबडतोब आपल्या तुकड्यांना युद्ध करण्यास आज्ञा देऊन, गुरुदेव, श्रीमंत व भाऊसाहेब पिताजींचा पत्ता काढून त्यांच्या शामियान्याकडे घोडे दौडीत निघाले !

इकडे ताईसाहेबांनीं, काईमची तरवार उडवून दिली होती ! तेव्हां च त्यांना " **जय महाकाल** ! " व " **हर ! हर ! महादेव** ! " हा घोष

ऐकूं आला ! श्रीमंत पेशवेसरकारांच्या साहेबी नौबतीचे, गुरुदेवांच्या शंखाचे, आणि शीळेवरील कविराजांच्या कवित्तांचे घनगंभीर आवाज हि ऐकूं आले ! त्यांनीं जाणलें, गुरुदेव मदत घेऊन आले ! तसें च आपलें उपास्य दैवत विष्णुरूपी बाजीराय, दक्खनचे भालाईत घेऊन धांवत आलें आहे ! त्यांना अत्यंत आनंद झाला ! मनांतल्या मनांत त्यांनीं भगवान महाकालास शतशः प्रणाम केले ! आतां त्यांच्या अंगांत कविराजांचें कवित्त ऐकून भगवति महाकालीनें पूर्ण प्रवेश केला ! त्या मनांत म्हणाल्या- " गज अरु गीध तारि है गणिका, कुटिल अजामिल कामी । मैं तो बिरदभरोंसे तेरे स्वामी ॥ " मग हंसून व निर्भयपणें त्या काईमला म्हणाल्याः—

**ता**— ऐ ! मुव्वर ! उचल तरवार ! खरी रजपुताणी, निःशस्त्रा वर शस्त्र उचलीत नाहीं ! उचल !

खजील झालेल्या काईमनें आपली ढाल पुढें करून व ताईसाहेबां कडे पहात पहात वांकून हळूं च आपली तरवार उचलली ! पुन्हां द्वंद्वास सुरवात झाली ! आतां तर ताईसाहेबांनीं, उत्साहातिरेकानें, चंड-मुंडांचीं मुंडकीं उडविणाऱ्या महिषासुर-मर्दिनी प्रमाणें रणतांडव सुरू केलें ! पाव घटकेंत त्यांनीं काईमच्या शिरस्त्राणाचे बंद तोडून, ऐनजिनसी शिरस्त्राण च तरवारीच्या एका फटकाऱ्यानें उडविलें; त्याच्या दोन्हीं खांद्या वर जखमा केल्या ! काईम आतां चिडला. जिवा वर उदार होऊन तो लढूं लागला. पुन्हां रण झडूं लागलें. इतक्यांत—

लांबून तीन घोडेस्वार दौडत इकडे येतांना दिसले. वाटेंत अडविणाऱ्यांचा समाचार घेत घेत ते तिघे येत होते. त्यांत हि तो पंचकल्याणी अबलक घोड्या वरील स्वार आपल्या धनुष्या पासून सोडलेल्या बाणांनीं आसपासची शत्रूंची गर्दी पातळ करीत दौडत येत होता ! या वेळीं तो, रावणसंहारक—

" **भ्रमन्तीं कांचनीं कोटिं कार्मुकस्य महात्मनः । अलातचक्रप्रतिमां ददृशुस्ते न राघवम् ॥ शरीरनाभिसत्त्वार्चिः शरीरं नेमिकार्मुकम । ज्याघोषतलनिर्घोषं तेजोबुद्धिगुणप्रभम् ॥ दिव्यास्त्रगुणपर्यन्तं निघ्नंतं युधि राक्षसान् । ददृशु रामचक्रं तत्कालचक्रमिव प्रजाः ॥** "

अशा भगवान रामभद्रा प्रमाणें दिसूं लागला ! ! त्यानें आपल्या दोघां

सोबत्यांना मागें टाकून तो सपाट्यानें ताईसाहेब होत्या त्या ठिकाणीं आला! तो पटकन् पायउतारा झाला व ताईसाहेबांना पाठीशीं घालून तरवार परजीत काईम कडे रागानें पाहूं लागला!

ताईसाहेबांनीं त्या स्वाराकडे पाहिलें; चटकन् आपली मान खालीं घातली व त्या स्वाराचा घोडा धरून त्या उभ्या राहिल्या! त्या मनांत म्हणाल्या —

**" भक्तिं तस्य तु संचिंत्य नागस्यामोघसंस्तवात्। प्रीतमानभवद्राजंश्छुत्वा चक्रगदाधरः॥ आरुह्य गरुडं विष्णुराजगाम सुरोत्तमः। सांनिध्यं कल्पयामास तस्मिन् सरसि लोकधृक्॥ ग्राहग्रस्तं गजेंद्रं च तं ग्राहं च जलाशयात्। उज्जहाराप्रमेयात्मा तरसा मधुसूदनः॥ जलस्थ दारयामास ग्राहं चक्रेण माधवः। मोचयामास नागेंद्रं पाशेभ्यः शरणागतम्॥ "**

तो वीरवर विष्णु विश्वाजी वाजीराय क्रोधकंपित स्वरानें त्या ग्राहास म्हणाला:—

**वा**— ऐ, नादान! पुरुष असून स्त्री वर हत्यार उगारतोस? शरम नाहीं वाटत?

त्या विष्णूला पाहून तो ग्राह गर्भगळित झाला! तथापि उसनें धैर्य आणून त्यानें विचारलें:—

**का**— तुम कौन हो?

**वा**— (जोरानें गर्जून) देहलीकी जुलमी पातशाहीकी मौत (काळ)! सिताराके फकीरशाहीका खुदा-ई-खिदमतगार!! चल, लढनेको तैयार हो!

पुन्हां दोघांचें द्वंद्व सुरू झालें. पाव घटकेंत च त्या माधवानें त्या ग्राहाला अनेक जखमांनीं विदारून भूमी वर पाडलें! इतक्यांत गुरुदेव व भाऊसाहेब हि तेथें आले! ताईसाहेबांनीं दोघांना वंदन केलें!

मग त्यांनीं व महाराजांच्या इतर स्वारांनीं, काईमच्या स्वारांना पिटाळून लावलें! तिकडे युद्ध संपलें होतें च! महंमदाच्या जवळ जवळ चाळीस पंचेचाळीस हजार फौजे पैकीं फक्त चार पांचशें सैनिक जिवंत राहिले! बाकीची फौज अल्लामिय्याच्या दरबारीं गेली! या जिवंत सैनिकांना कैद करण्यांत आलें! नूरखानानें खाश्या महंमदास कैद केलें च होतें! इकडे हि

गुरुदेवांच्या आज्ञेनें काईमला गिरफदार करण्यांत आलें!

इतक्यांत गुरुदेवादि मंडळी जेथें होती, तेथें पृथ्वीसिंह, जगतराज, महाराज कुमार, नूरखान, हमीदखान, मानसिंह हे हि येऊन ठेपले!

गुरुदेवांनीं ताईसाहेबां जवळ पिताजींची चौकशी केली. ते जखमी होऊन त्यांना रतननें शिबिरांत नेल्याचें समजलें! सर्व मंडळी तिकडे वळली!

इकडे, रतननें, पिताजींना आणून, त्यांना एका शय्येवर निजवून, प्रथम त्यांची जखम धुतली! निरोप धाडून तबीबास आणविलें. त्यानें जखमेस टांके घातले व ती बांधली. जखम काळजी करण्या सारखी नव्हती, पण त्या शीर्णजीर्ण शरीरा वर तिचा परिणाम बरा च झाला होता! पिताजी अद्यापि मूर्च्छित च होते! रतननें जवळच्या एका छोट्याशा तलावांतून नौकरां कडून कांहीं पानां सहित कमळें आणविलीं! सारे जण महाराजांना शुद्धी वर आणण्याची खटपट करीत होते! रतन, त्यांच्या शय्ये वर च उशाशीं बसून कमल–पत्रांनीं त्यांना वारा घालीत होती. तिच्या मनांत ताईसाहेबांच्या मदतीस जाण्याचा विचार सारखा येत होता! पण पिताजींना तसें टाकून कसें जावें? पिताजींच्या समोर गजेंद्रमोक्षाची ती तसबीर होती! तिच्याकडे पाहून रतन मनांतल्या मनांत भगवंताचा धांवा करीत होती! "**तें मन निष्ठुर कां केलें, जें पूर्ण दयेनें भरलें। गजेंद्राचे हांके सरिसें धांउनिया आलें॥**" असा टाहो फोडत होती!

थोडया वेळानें पिताजींनीं डोळे उघडले! ते अर्धवट शुद्धी वर आले! त्यांना समोर ती तसबीर दिसली! त्यांनीं हात जोडले! हळूं हळूं त्यांच्या मुखांतून–

"**तं तद्वदार्तमुपलभ्यजगान्निवासः स्तोत्रं निशम्य दिविजैः सह संस्तुवद्भिः। छंदोमयेन गरुडेन समुह्यमानश्चक्रायुधोऽभ्यगमदाशु यतो गजेंद्रः॥**

हा श्लोक व नेत्रांतून अश्रु बाहेर पडले! पुन्हां त्यांनीं नेत्र झांकले!

इतक्यांत त्यांच्या मस्तकास कल्याणकारक अशा चंद्र किरणां प्रमाणें शीत व अमृततुल्य हाताचा स्पर्श झाला व त्या च वेळीं दोन्ही चरणांस उष्ण कपालांचा स्पर्श झाला! पिताजींनीं डोळे उघडले! तसबिरींतील महाविष्णु व गरुड साक्षात् आपल्या चरणां जवळ उभे आहेत असा भास त्यांना

झाला! ते हळूं च उठले. त्यांनीं आपल्या चरणां वर टेकलेलीं मस्तकें हळूं च वर केलीं! पाहिलें, एक श्रीमंत बाजीरावसाहेब! दुसरे सरदार भाऊसाहेब! त्या नंतर त्यांनी आपल्या उशा कडे नजर टाकली! श्री समर्थ-शिष्य महंत गुरुदेव महात्मा प्राणनाथ प्रभु!

पिताजींच्या अंगात त्राण नसल्यानें त्यांनीं गुरुदेवांना तेथल्या तेथें प्रणाम केला! शेजे वर पडलेलीं तीन कमळें घेऊन पिताजींनीं-

**"सोऽन्तःसरस्युरुबलेन गृहीत आर्तो दृष्ट्वा गरुत्मति हरिं ख उपात्तचक्रं। उत्क्षिप्य सांबुजकरं गिरमाह कृच्छ्रान्नारायणाखिलगुरो भगवन्नमस्ते॥"**

असें म्हणून, गुरुदेव, श्रीमंत आणि भाऊसाहेब यां तिघांच्या मस्तकांवर एक एक कमळ वाहिलें!!!

इतक्यांत बाहेर "जय, जय, रघुवीर समर्थ! जय, महाकाल! जय एकलिंग जय, गजराज! हर! हर! महादेव!" अशा प्रचंड गर्जना ऐकूं आल्या! पिताजींची व श्रीमंतांची अशा दोन साहेबी नौबतींचा आवाज त्यांना साथ देत होता! जयाचीं शहाजणें वाजत होतीं!

थोडया वेळानें रींवानरेशाच्या अधिपत्या खालीं रजपूत व मुसुलमान प्रमुख सेनानायक आणि पिलाजीराव जाधवांचे पुढारीपणा खालीं मराठे सेनानायक त्या शामियानांत आले व त्या सर्वांनीं पिताजींना लष्करी अभिवादन करून "आपला जय झाला!" असें सांगितलें!

तेथला प्रसंग पाहून सर्वांच्या डोळ्यांतून भक्तिरसाचा पूर वाहूं लागला! पाव घटका सर्व जण या भाव समाधींत मग्न होते. मग चांदीच्या घंटे प्रमाणें गंभीर व आनंददायक आवाजानें गुरुदेव म्हणाले :-

**गुरु**— राजा छत्रसाल! आणि सर्व भाईयों! **आज खरा गजेंद्र-मोक्ष झाला!** जुलमी पातशाहीरूपी मकरानें ग्रासलेल्या गजेद्र छत्रसालास, बाजीराव विष्णूनें, बाबूजी गरुडाच्या कल्पकतेनें, आज सोडविलें! आतां बुंदेलखंड **पूर्ण स्वतंत्र** झाला! त्याच्या कडे वांकडया डोळ्यानें पाहण्याची आतां या पुढें दिल्लीची छाती नाहीं! (तसबीरी कडे पाहून व हात जोडून) सर्व जण हात जोडून या प्रभूस शरण जा! ऐका-

**पर्यंकं विसृजन् गणानगणयन् भूषामणिं विस्मरन्। उत्तानोऽपि**

**गदागदेति निगदन् पद्मामनालोकयन् ॥ निर्गच्छन्नपरिच्छंद खगपतिं चारोहमाणोऽवतु । ग्राहग्रस्तमतंगपुंगवसमुद्धाराय नारायणः ॥**

ग्राहके चंगुलमें फसे हुए गजराजको बचानेके लिये, पलंगको छोडते हुए, पार्षदोंकी परवा न करते हुए, कौस्तुभमणीको भुला कर, उठते उठते ही "गदा! गदा!" इस प्रकार चिल्लाते हुए, लक्ष्मीजीको भी न देखते हुए, और गरुडजी पर विना कुछ बिछाये नंगी पीठ ही चढ कर जाते हुए, भगवान नारायण हमारी रक्षा करें! **जय गजराज !**

सर्वांनीं— शामियान्यांत जमलेल्या सर्वांनीं– "**जय ! गजराज !**" असा घोष केला व त्या तसबिरीस वंदन केलें! तो शब्द बाहेरच्या सैन्यास ऐकूं गेला! सर्व सैन्यानें हि उच्च स्वरानें गर्जना केली "**जय ! गजराज !**"

इतक्यांत सूर्योदय झाला! तो बुंदेलखंडाच्या पूर्ण स्वातंत्र्याचा सूर्योदय होता! त्यानें

**आजादीसे गूंजी दिशायें!!**

---

# हृदय-पालट

## [ पाकळी आठवी

प्रस्तावोन परावे । आपले होती ॥

गजेन्द्रमोक्ष झाला; सर्वांना आनंद झाला ! पांच सहा दिवस काळघाटां मुक्काम करून, सर्व आंवराआंवर करून मग पन्ना येथें जावें असें पिताजीं सर्वानुमतें ठरविलें. भाऊसाहेबांनीं, पिताजींच्या दिवाणजीस पन्ना येथें पुढी व्यवस्था करण्यास पाठविलें. पिताजी पन्ना येथें येतील त्या वेळीं त्यां स्वागत प्रजेनें कसें करावयाचें हें काम व सर्व बुंदेलखंडांत आपली विजयवा कळवून राज्यांतील प्रमुख लोकांनीं पन्ना येथें हजर राहून त्या स्वाग समारंभांत भाग कसा घ्यावयाचा हें काम, त्यांनीं दिवाणजीस समजावू सांगितलें.

युद्ध संपल्यानंतरचा दिवस होता; त्या दिवशीं संध्याकाळीं एक रजपू शिपाई हळूं च इकडे तिकडे पहात चालला होता. त्याच्या तोंडा वरून सारखें इकडे तिकडे पाहून सावधगिरीनें चालण्यावरून तो घाबरलेला असा असें दिसलें; निशेनें हि त्याचे वर अंमल बसविला होता; कारण तो आ त्याशीं च कांहीं पुटपुटत होता.

रज— हा कोठें गेला ? सारखा तपास करतों आहे पण त्याचा पत्त नाहीं ! एकाद्या रजपुतानें याचें डोकें तर छाटलें नसेल ? ...हा दारुड्या ज मारला गेला तर यापुढें शराबला कोण विचारणार ? ती उघडी पडेल !..

याची बायको व मुलें बेवारशी होतील व पातशाही कडून त्यांना बालपरवेशी (बाल परवेश = बाल परामर्ष, लढाईत मेलेल्याच्या कुटंबास, मुलांच्या संगोपना साठीं सरकारनें द्यावयाचें वर्षासन) मिळेल!... पातशाहीला या खर्चांतून सोडविण्याचें, तिच्या वर उपकार करण्याचें माझ्या हातीं आहे...हा तर आतां खास मेला...याची बीबि विधवा झाली च...आतां प्रत्यक्ष देवानें सांगितलें कीं ती सौभाग्यवति आहे म्हणून तरी मीं तें झूट मानीन! ...मग मला आतां तिच्याशीं निका लावण्यास काय हरकत आहे?...एकदम च एका बायकोचा पति व चारपांच छोकऱ्यांचा पिता होईन ना? ...ह्याच्या या सर्व जंगम जिंदगीचा ताबा माझ्या कडे आला म्हणजे... पातशाहीला बाल परवेशी देण्याची गरज उरणार नाहीं!... बरें, मेलेल्या मित्रा वर उपकार केल्याचें हि पुण्य पदरांत पडेल!... एका पक्षानें दोन दगड मारल्या सारखें होईल!

या प्रमाणें हा शिपायी खालीं मान घालून पुटपुटत चालला होता! इतक्यांत समोरच्या बाजूनें एक मराठा शिपाई, याच्या प्रमाणें च आसपास पहात व कानोसा घेत, खालीं मान घालून कांहीं पुटपुटत येत होता. तो हि झिंगलेला होता.

**मराठा**— हा साला कोठें आहे? कालच्या रणांत, एकाद्या मरगठ्यानें याचें धड डोचक्या पासून तर छाटलें नसेल ना?...हा अफीण्या जर खरें च मेला असेल तर माळव्यांतील किसान उपाशी मरतील!...अर्ध्या माळव्यांतील जमीन उघडी पडेल!...या लेकाचें लग्न झालें नसल्यानें याची बिबी विधवा होणार नाहीं व मला तिच्याशीं निका लावतां येणार नाहीं...याला छोकरे हि नाहींत...मग तीं पोरकीं होणार कशीं? आणि बाप, आई व मुलें कोणीं च जाग्या वर नसल्यानें पातशाहीचा नान परवेशीचा (नान परवेश = लढा-ईत कामास आलेल्यांच्या, निपुत्रिक बायकांस सरकारानें द्यावयाचें वर्षासन) पैसा वांचेल! ... बाकी त्याची नामंजूर नान परवेशी सरकार कडून मला मंजूर करून घेतां येईल म्हणा ... सरकारांत खोटी च खबर दाखल करीन कीं मयताची एक विधवा आहे ... म्हणजे नान परवेशी सुरू होईल! ... या साठीं फार तर गांवाच्या पाटलास थोडीशी चिरीमिरी दिली म्हणजे झालें! ... नाहीं तरी असले अंदाधुंदीचे प्रकार आजच्या पातशाहींत सर्रास

चालूं आहेत च कीं नाहीं ? ... कुत्रें दळतें व आंधळा पीठ खातो, अशी आमची पातशाही आहे !

या प्रमाणें हा पुटपुटत व झोंकांडया खात चालला होता. समोरचा रजपूत शिपायी हि आपल्या च नादांत येत होता ! दोघे परस्परां कडे जात होते; आणि खालीं माना घालून निशेंत चालले होते ! अखेरीस त्यांची टक्कर झाली ! तेव्हां ते माना वर आले. परस्परांनीं दचकून वर पाहिलें; पाहिल्या वर परस्परांना धडकी भरली !

रज — अं ? तुम कौन ? ... म ... मर ... मरेठा ? ( कांपतो )

मराठा — ( कांपत ) अं ? तुमी कोन ? ... र ... रज ... रजपूत ?

रज — अबे, मरेठा ! तुम्हीं डोळे वटारून पाहूं नका... मी...रज... रपूजत आहे ... तुमचा दो ... दोस्त आहे !

म — अहो रजपूत सरदार ... तुम्हीं हि आपल्या भुवया वांकडया करून आणि नाक ... फेंदारून रागावल्या सारखे माझ्या कडे पाहूं नका .... मी थेट पु ... पुणें साताऱ्याहून ... तुमच्या दोस्ती साठीं घोडा दौडत येथें आलों ! ( स्वगत ) हा तर बेटा तो आहे ! आवाजा वरून मीं ओळखलें ! काय साल्यानें सोंग आणलें आहे ! आतां याची थट्टा करूं ! ( प्रकट ) कां हो ! तुम्हीं रजपूत आहां ना ? कोणत्या कुळींतील ? कछवाह, चंदेल का शिसोदिया ?

रज — ( स्वगत ) आतां पंचाईत आली ! कोणतें कुळ सांगूं ? सांगतों कोणतें तरी ! ( प्रकट ) अहो ! कछवाह नाहीं, मी मछवाह आहें !

म — ( हंसून ) काय मछवाह ? अहो ! पण हें कूळ आज पर्यंत कधीं च ऐकण्यांत नाहीं ! मचवा चालवून मच्छी मारणारे तुम्हीं मच्छीवाह, मच्छीमार दिसतां ! खरें कीं नाहीं ?

रज — ( घोंटाळतो ) हो, हो ! तसें आमचें कूळ फार मोठें आहे ! तुम्हांला आमच्या कुळीच्या उंचीची कल्पना येणार नाहीं ! दिल्लीचा ताजमहाल तुम्हीं पाहिला आहे ?

हें ऐकून तो मराठा हंसला !

रज — कोठून पहाल ? बरें आग्र्याचा कुताब मिनार तरी ?

पुन्हां मराठा जोरानें हंसला ! त्या हंसण्या वरून रजपुतानें त्याला ओळखलें !

रज — ( स्वगत ) अरेच्या! हें हंसणें तर त्या दारुड्याचें आहे! ( निरखून पाहून, स्वगत ) अरे! हो रे! हो! हाच तो गव्हार! काय बेट्यानें मरगट्टयाचें सोंग आणलें आहे! आतां थोडी याची दिललगी करूं! (प्रकट) खरें च तुम्ही मरेठे! दिल्ली आग्रयास तुम्ही कशाला याल? कां हो, मराठ्यांत आसवले, वाघ, कोल्हे, पोळ अशा कुळ्या असतात म्हणे! मग तुमची कोणती कुळी?

म– ( स्वगत ) मोठें संकट आलें आतां? कोणती कुळी सांगूं? कांहीं तरी अरबी भाषेंतील शब्द सांगतों, या अफिण्याला काय अरबी समजतें? आणि मला तरी कोठें समजतें? ( प्रकट ) अहो! आमच्या कुळीचें नांव हिमारे! समजलें? अहो! आम्ही फार मोठे सरदार आहों! माझा आजा आमच्या दक्खनच्या त्या पातशाहाच्या सैन्यांत मोठा अधिकारी होता. आमच्या पातशहाला, आलमगीरानें पकडून बंदींत ठेवलें, तेव्हां माझा आजा हि पकडला गेला. पुढें आमचा पातशहा मिठाईच्या पेटाऱ्यांतून निसटला तर माझा आजा संडासाच्या खिडकींतून पळाला!

रज– ( मोठ्यानें पोट धरून हंसतो ) असें का? तुमची कुळी गाढवाची आहे तर? अहो! अरबी भाषेंत हिमार म्हणजे गाढव! बाकी मरगट्टयांत गाढवे म्हणून एक कुळी आहे खरी! तुमचें म्हणणें बरोबर दिसतें! तुमच्या आजा कडे लष्करांतील मोठी नौकरी होती नाहीं? लष्करी घोड्यांची लीद पाठीवर वाहून नेण्याची च ना? अरे वाः! फार मानाची नौकरी बुवा! बाकी तारतखान्यांतून पळणाऱ्या वीराला दुसरी कोणती नौकरी मिळणार?

म– ( स्वगत ) चुकी झाली! घसरलों! ... आतां विषय व त्या बरोबर पवित्रा बदलला पाहिजे ( डावा पाय पुढें करून, प्रकट ) कां हो! वाटेल तसें मला टाकून बोलतां? आज रजपूत व मराठे दोस्त झाले आहेत; असें असतां माझा अपमान? या मराठ्याचा अपमान? या वरून तुम्हीं खरे रजपूत दिसत नाहीं! (त्याचे कडे निरखून पाहून) कां हो! तुम्हीं रजपूत ना?

रज– ( जोरानें ) हो! हो! मी मछवाह रजपूत आहें! शंका घेतां?

म– ( जोरानें ) शंका नाहीं, खात्री आहे कीं, तुम्ही मुसुलमान आहां व रजपुतांना आणि आम्हां मराठ्यांना फसविण्यासाठीं हें रजपुताचें सोंग आणलें आहे! थांब! मी आमच्या सैन्यांतील शिपायांना आतां हांक मारतों व तुझा

गिरफदार करून, हेर ठरवून, या समोरच्या झाडावर फांशीं देववितों!

**रज**– ( कांपतो; स्वगत ) अरेच्या ! हें गाडें उलटलें! हा दारुड्या खरोखर च असें करावयाचा! आतां कसें करावें ?

**म**– कां रे ? आतां बोलत कां नाहीं ? ( त्याचे जवळ येऊन व त्याचे कानां कडे पाहून ) तूं रजपूत नाहीं काय ? म्हणजे हिंदू ?

**रज**– हो, हो ... अलबत हिंदु ... मग ?

**म**– मग ( त्याचे दोन्ही कान पकडून, हलवून ) तुझे हे लांब कान टोंचलेले दिसत नाहींत ते ? मुसुलमानां सारखे बिन टोंचलेले आहेत! ( कपाळा कडे पाहून ) कां रे ! हें गंध उलटें काय लाविलें आहे ? थांब, तूं मुसुलमान आहेस, रजपूत नाहींस .... अहो, दमाजीराव ! संताजीराव!....

**रज**– ( त्याचें तोंड दाबून, स्वगत ) आतां आपण हि थांबतां उपयोगी नाहीं; याला डरवला च पाहिजे. (प्रकट) कां रे ! तूं मराठा ना ? (जोरानें) सच बोलो !

**म**– हो, हो ! सच बोलतो च आहे ! सच बोलण्यास काय तुझ्या बापाची भीति आहे ?

**रज**—( रागानें ) माझा बाप काढतोस ? ( त्याच्या डोक्या वर एक ठोंसा मारतो; त्या मुळें त्याची मराठेशाही पगडी लांब जाऊन पडते ) का रे, मर-गट्टया ! तुझी शेंडी कोठें आहे ? आणि तुझे कान तरी कोठें टोंचलेले आहेत ? तूं च मुसुलमान. अबे गद्धेके बच्चे ! थांब. तुला च हेरगिरीच्या आरोपा वरून तोफेच्या तोंडीं देववितों ! ( मोठ्यानें ) संग्रामसिंह ! विजयसिंह ! मानसिंह ! धांवा ! हा मुसुलमान हेर......

या रजपूत शिपायाची आरोळी ऐकून खरोखरीं च मानसिंह तेथें आला; पण दुरून त्यानें या दोघांना ओळखलें व पुढें काय होतें हें पाहण्या साठीं तो एका झाडाचे आड उभा राहिला.

**म**—( कांपतो. स्वगत ) अरेच्या ! यानें बरोबर पकडलें ! हा खरोखर च रागावला ! आतां याचे पाय धरले पाहिजेत नाहीं तर हा मला तोफेच्या तोंडीं देववील ! डाव उलटला. ( प्रकट ) अहो, रणदुल्ला खान ! माफ करा ! ( त्याच्या पायां पडतो ) मी मुसुलमान च आहें ! मला तुम्हीं ओळखलें नाहीं ? दोस्त मी तुमचा.......

**रणदुल्ला**--दारुड्या सर्जाखान! ( हंसून ) अरे! मीं तर तुला पाहिल्या बरोबर ओळखलें! पण म्हटलें थोडी दिललगी करूं! ( मोठ्यानें हंसून, त्याचे पाठी वर थाप मारून ) काय बेट्या घाबरलास? कांहीं झालें तरी शेवटीं तूं गांवठी सिंह च!

**सर्जाखान**--( ऐटींत ) अरे यार, दुल्ल्या! तुला हि मीं पहिल्या सपाट्यास च ओळखलें! पण म्हटलें थोडी थट्टा करूं! अबे! तूं सुद्धां मला डरला च होतास! कांहीं झालें तरी तूं जंगांतील नसून जनानान्यांतील च दुल्ला! चल, मुस्लिम-राष्ट्रपति! आझादे बहादूर! मला भेट! तेरे लिये मेरा जी तरसता है!

**र**-- वैसा मेरा भी!

मग दोघे परस्परांना कडकडून भेटले.

**र**— सर्जा! आपल्या भेटीची मला आशा नव्हती! मला वाटलें, तुला कोणीं तरी लढाईत काटलें! पण खुदाची मेहेरबानी! पुन्हां तूं भेटलास!

**स**-- मला हि वाटलें कीं, या शत्रूनें तुला अस्मानांत उडवून दिलें! पण जाऊं दे! अल्लामियाची रहीम! अशा आनंदाच्या प्रसंगीं आपण थोडीशी चैन करूं!

सर्जानें आपल्या अंगरख्याच्या आंतून छपविलेली एक दारूची बाटली काढली!

**र**— छान, छान! मी हि तुझी सरबराई करतों ( अंगरख्याच्या आंतून अफिणीची एक डबी काढतो )...पण थांब! आज थोडी उलटापालट करूं.

रणदुल्ल्यानें डबींतून एक गोळी घेतली व सर्जाचा हात पकडून त्याचे तळहाता वर ठेविली.

**र**— आज तूं या काळ्या घोडी वर हल्ला कर!

**स**-- नको, नको!

**र**-- अरे, नको नको काय? सिंह कधीं घोडी वर हल्ला करण्यास भितो काय? हात उचल...उचल...हं असा...टाक तोंडांत...अरे...

सर्जा "नाहीं नाहीं" म्हणत होता, पण दुल्ल्यानें जबरीनें त्याचें तोंड उघडून गोळी आंत घातली. सर्जानें तोंड वेडेंवाकडें केलें. पण दुल्ल्यानें त्याचें तोंड शेवट पर्यंत दाबून धरलें.

स— काय रे! या घोडीचें मांस असें कडवट काय लागतें? साऱ्या जन्मांत आज पहिल्यानें मी या तुझ्या नागिणीस डसलों! ती तर सगळीच्या सगळी माझ्या पोटांत घुसली!....पण तोंड सारें कडू झालें...थू: थू: !... अच्छा! दुल्लया! तूं कालच्या लढाईंत फार शौर्य गाजविलेंस त्या मुळें (दारूची बाटली दाखवून) ही माझी माषूक तुझ्या वर आषक झाली आहे! (बाटली कानास लावतो) क्या कहती? "मलिक-उल्-मुल्क-उल्मुस्लिम, सरदार, आझादे बहादूर, रणदुल्लाखानके होंटोंका बोंसा लेना चाहती हूं?" अच्छा, मेरी प्यारी! आज मला सोडून या माझ्या दिलजान दोस्ताशीं तूं खुशाल शृंगारचेष्टा कर! माझी सदर परवानगी आहे!...आणखी काय म्हणतेस? "दूसरेकी औरतको, ये सरदार आपने गले लगायेगा या नहीं?" ...अरे प्यारी! ही शंका सोडून दे! हा तर त्या कामांत पूरा बहाद्दर आहे! सारा जन्म त्यानें या कामांत घालविला आहे! (बाटलीचें बूच काढून, ती दुल्लयाचे तोंडास लावतो) अरे, यार! कर तिची इच्छा पूर्ण!

र— (त्याचा हात ढकलतो) हट्! अरे गद्ध्या! मुसुलमान असून शराब पिऊं? आपल्या महजबांत शराब मना आहे ना? "दारूमुळें आपापसांत बेकी व शत्रुत्व तसें च अल्लाची व प्रार्थनेची विस्मृति इतके दोष सैतान निर्माण करतो म्हणून तिचे पासून अलिप्त रहा" असें ५ व्या सूरामध्यें सांगितलें आहे ना?

स— अरे पण मीं नाहीं का मुसुलमान? मीं तर राजरोस पितो. मग तुला काय हरकत आहे? आपल्या दरबारांतील मोठमोठे सरदार, अमीर, नबाब, हिला कवटाळतात! अरे वेड्या! फार काय? जहांगीर बादशहा नव्हते का पीत? कुराणेशरीफ मध्यें, पुनरुत्थाना नंतर पुण्यवान लोकांना, देव स्वर्ग देंतो व त्या स्वर्गात पऱ्या मिळतात आणि उत्तम दारू पिण्यास मिळते असें म्हटलें आहे! वाटल्यास ३७, ३८, ५२, ५५, ५६, व ७८ हे शरा वाचून पहा म्हणजे समजेल!

र— कुराणशरीफ पेक्षां बादशहाचें उदाहरण मला पटलें! बादशाही कित्ता उत्तम! हलक्या सरदारअमीरांचा कित्ता गिरविण्यास मी काय तुझ्या सारखा गांवठी सिंह आहें?

स— बरें बाबा! जनानापति आहेस!

सर्जानें, दुल्लयाच्या तोंडास बाटली लावली; त्यानें एक घोंट घेतला! पण लगें च थू: थू: करून थुकला व तोंड दाबून घेतलें. सर्जानें एका हातानें त्याचें नाक दाबलें व संबंध बाटली त्याचे घशांत रिचविली!

र— अरे, हो! अरे, हो! ती माझा घसा कांपत आंत गेली ना? ( गळ्या वर हात ठेवून चांचपतो ) थांब! माझी गर्दन ठिकाणावर आहे कीं तुटली तें पाहूं दे! अल्ला! माषाल्ला! तुझी माषुक काय तिखट आहे रे? साऱ्या बापजन्मांत तिची माझी बोंसाबोंसी आज च झाली बाबा!

दोघे हि थोडया क्षणांत चांगले च झिंगले! सर्जानें दुल्लयास उठविलें.

स— ऊठ! येथें बसूं नको. शत्रूचा गोट नजीक आहे....आपल्या दोघांना हेर समजून...पकड...

दु— अबे, सच है...पकडून तुला...फांसावर...मला तोफेच्या तोंडीं...

इतक्यांत मानसिंह पुढें आला. त्यानें यांना पहिल्यानें च ओळखलें होतें. त्याचे मनांत यांची गंमत करावी असें आलें. दोघे ही भोळसट होते. शिवाय दुल्लयानें, महंमद व काईमची गुप्त मसलत उजेडांत आणण्याचें कामीं मदत केली होती. शाही चाकरी सोडून ते आपल्या दिमतींत आल्यास बरें असें हि त्याला वाटलें! तसा खडा टाकून पाहण्याचें त्यानें ठरविलें.

मा — ठैरो! तुम दोनों, दुष्मनके जासूस हैं!

असें म्हणून मानसिंहानें झटकन् दोघांचे हात पकडून, आपल्या दुपट्ट्यानें एकत्र बांधले! अचानक संकट आलेलें पाहून दोघे लटपट कांपूं लागले! त्यांत त्यानें तरवार उपसून त्यांचे छाती वर ठेवली!

र — न ... न ... नहीं, सरदारसाहेब ...

स — हम .... जा ... जासूस नहीं ...

मा — नाहीं कसे? तुम्हांला मी ओळखलें! ( सर्जास ) तुला फांशा वर लटकावतों, आणि ( दुल्लयास ) तुला तोफेच्या तोंडीं देतों!

दोघे खरोखर घाबरले! मानसिंहानें धाटा बांधला होता व पोषाक हि नेहमींचा वापरला नव्हता; शिवाय आवाज मुद्दाम बदलला होता, त्यामुळें या दोघांनीं त्याला ओळखलें नाहीं! त्यांनीं त्याचे पायां वर डोकीं ठेविलीं व आपल्यास सोडविण्या विषयीं विनंति केली!

मा— तुम्हीं परस्त्रियांना त्रास देतां! त्या उज्जनीस तुम्हीं त्या शाहजादीस

घास दिला! (दुल्ल्यास) ऐ, बंदर! तूं त्या माणीकच्या मागें लागतोस! खरें आहे कीं नाहीं ?

दोघांनीं गयावया करून कुराणे शरीफची सौगंध खाल्ली व सांगितलें कीं, " पुन्हां आपण असें करणार नाहीं! "

**मा** — तरी पण, तुम्ही शाही शिपायी आहां, पुन्हां केव्हां तरी अत्याचार कराल! तें कांहीं नाहीं, तुमचें बीजन केलें पाहिजे!

दोघांनीं म्हटलें कीं, " आम्ही शाही नोकरी सोडतों, पण प्राण वांचवा!" पुन्हां कुराणे शरीफाची शपथ झाली! मग मानसिंहानें धाटा सोडला व नेहमींच्या आवाजानें म्हटलें—

**मा** — दुल्ल्या! सर्जा! पुन्हां बदलणार नाहीं ना ?

•• दोघांनीं मानसिंहास ओळखलें! त्यांना आश्चर्य वाटलें व धीर आला! दोघे हि हाडाचे चांगले होते. त्यांनीं सांगितलें कीं, " आपण पातशाही सोडली; मात्र सरदारसाहेबांनीं आपल्यांना स्वतःचे दिमतींत घ्यावें!" मानसिंहानें तें मान्य केलें व त्यांना घेऊन तो छावणी कडे परतला!

ठरलेल्या दिवशीं महाराजांची छावणी हलली. सर्व मंडळी पन्ना येथें दर कूच दर मजल करीत आली. बंगषाचा म्हणजे दिल्ली दरबाराचा, मोंगली अत्याचारी पातशाहीचा पूर्ण पराभव करून व बुंदेलखंडास **पूर्ण स्वातंत्र्य** मिळवून, आज पिताजी, आपल्या राजधानीत प्रवेश करीत होते!

राजधानी पूर्ण शृंगारली होती; जणूं काय, भगवान रामप्रभु, रावणास मारून सीतामाते सह जींत प्रवेश करीत आहेत अशी अयोध्या च! अशा त्या नगरींत— " **शंखशब्दप्रणादैश्च दुंदुभीनां च निःस्वनैः । प्रययौ पुरुषव्याघ्रस्तां पुरीं हर्म्यमालिनीम् ॥** " तो पुरुषव्याघ्र, शिवशिष्य, महाराज छत्रसाल, आपल्या वसिष्ठसदृश प्राणनाथ गुरुदेवां सह आणि हिरदेसा—श्रीमंत—भाऊसाहेब आदि पेटयां सह तथारीं वा नरेश—पिलाजीराव या रजपूत—मराठे सहाय्यक स्नेह्यां सह वर सांगितल्या प्रमाणें प्रवेश करता झाला! सर्वत्र आनंदाचें साम्राज्य फैलावलें! या पेक्षां त्या प्रसंगाचें वर्णन काय करावें ?

" **त्रैलोक्य चालिलें तेथें । देव गंधर्व मानवी । ऋषी मुनी महायोगी । आनंदवनभूवनीं ॥** "

या प्रमाणें पन्ना नगर, आनंदवनभुवन च झालें!!

दोन तीन दिवसांनीं उत्तम मुहूर्त पाहून दरबार भरविण्याचें ठरलें. तत्पूर्वी एके दिवशीं खालील प्रसंग घडून आला.

सकाळची वेळ होती. पिताजी आपल्या राजवाडयांत दरबार-इ-खास मध्यें बसले होते. गुरुदेव व इतर प्रमुख मंडळी हि तेथें होती. इतक्यांत मानसिंह बाहेरून आंत आला व त्यानें गुरुदेवांच्या कानांत कांहीं सांगितलें ! गुरुदेवांनीं, पिताजींना, श्रीमंतांना व भाऊसाहेबांना एकीकडे नेऊन अर्धा घटिका कांहीं खलबत केलें ! पुन्हां चौघे जण आपापल्या स्थानीं येऊन बसले. मानसिंह बाहेर गेला. गुरुदेवांनीं चोपदारास आज्ञा केली—

**गुरु**— अरे ! महंमदखान व काईमखान यांना घेऊन ये !

चोपदार गेला व थोडया वेळानें शिपायांच्या पहाऱ्यांत त्या पितापुत्रांना घेऊन आला ! दोघे जखमी झाल्याचें मागें सांगितलें च आहे. पिताजींनीं त्यांना जरी बंदींत ठेवलें होतें तरी त्यांची व्यवस्था चांगली ठेवली होती; तबीबा कडून त्यांच्या जखमा दुरुस्त केल्या होत्या. आपले सर्व हेतु निर्फळ झाल्याचें पाहून व आपली नाचक्की होऊन आपण शत्रूच्या कैदेंत पडल्याचें पाहून दोघे हि गर्वहत झाले होते !

**गुरु**— महंमदखान ! काईमखान ! खालीं बसा ! तुमचे हेतु निर्फळ झाले व तुम्ही आमचे कैदी बनलां या बद्दल दुःख मानूं नका ! युद्धांत जय मिळणें दैवाधीन असतें !

गुरुदेवांचें भाषण ऐकून पितापुत्रांना थोडेसें आश्चर्य वाटलें ! त्यांची कल्पना होती कीं, आपल्यांला कांहीं तरी शिक्षा होईल पण प्रकार निराळा दिसूं लागला ! पुन्हां गुरुदेवांनीं व पिताजींनीं हि सांगितल्या वर ते दोघे खालीं बसले. श्रीमंतांनीं पहारेकऱ्यांना जाण्यास फर्माविलें !

**पिताजी**—खान ! तुम्हां दोघांना, गुरुदेवांच्या आज्ञे वरून आम्हीं मुक्त करीत आहों ! आपल्यांस प्रयाग अगर दिल्ली कोठें जावयाचें असेल तेथें खुशाल जा ! एवढें च लक्ष्यांत ठेवा कीं, सत्याचा अखेरीस जय होतो व असत्य मग तें केवढें हि शक्तिमान असलें तरी त्याचा शेवटीं नाश होतो ! अल्लाचें वचन च आहेः— "**व लातलबिसु अलहक्का बिल्बातिलि व तक्तुमू अलहक्क व अंतुम तअलमूना**" ( सू० २ )

**मह**—महाराज ! आपलें म्हणणें खरें आहे ! मला याचा पूरा अनुभव

आला! आपण सत्यधर्मानें चालणारे आहां म्हणून आपला अखेरीस जय झाला! तसें च आपलें औदार्य हि नांवाजण्यासारखें आहे! आपण, आम्ही शत्रु असतां व आपल्या कैदेंत सांपडलों असतां आम्हांला चांगलें वागवलें.

**काईम**—सूडबुद्धि ठेवली नाहीं! आम्ही दोघे हि गर्वहत झालों!

**मह**—ज्या पातशाहीशीं आम्हीं निमकहलाली केली—

इतक्यांत दिवाण-इ-खासच्या प्रवेशदारांतून गंभीर शब्द उमटला—

"महंमद! काईम! तुम्हीं पातशाहीशीं निमकहरामी केली!"

मंडळींनीं चकित होऊन तिकडे पाहिलें! मानसिंहा बरोबर एक पातशाही अधिकारी आंत येत होता! त्याच्या मागोमाग चार पातशाही ढालाईत हि आंत येत होते! आंत आल्यावर त्या अधिकाऱ्यानें आपल्या ढालाइतांना खूण केली. ते, महंमद व काईम यांच्या मागें नागव्या तरवारी घेऊन उभे राहिले! त्या अधिकाऱ्याला पाहून महंमद गर्भगळीत झाला!

अधिकारी पुढें आला; त्यानें पिताजींना, तीन वेळ कुर्निसात केला! त्याप्रमाणें त्या ढालाइतांनीं हि केला.

**अ**—कसूर माफ! महाराजाजी! आपल्या दरबारांत येऊन आपली बेअदबी करण्याची इच्छा नाहीं! मी शहानशहाचा सेवक आहें. जहांपन्हांच्या हुकुमा वरून येथें आलों. महंमद बंगष व काईम बिन महंमद हे बादशहा सरकारचे अपराधी आहेत! त्यांना गिरफदार करण्याचा मला शाही हुकुम आहे! (खिशांतून एक फर्मान काढून) हा पहा! (पिताजी जवळ देतो) तरी मेहेबानी करून या बागी बदमाषांच्या मुसक्या बांधून घेऊन जाण्यास मला सरकारांनीं परवानगी द्यावी!

हा प्रकार पाहून सर्व सभा आश्चर्यचकित झाली! प्रसंगाचा उलगडा कोणास च होईना! पिताजींनीं तो फर्मान वाचला व गुरुदेवां जवळ दिला! त्यांनीं हि तो वाचला.

**पिता**—सरदार! हुकूम वाचला! तथापि, पातशहांनीं आम्हांस कांहीं पत्र वगैरे दिलें आहे काय?

**अ**—जी, हां! महाराज! जहांपन्हांनीं सरकारांना एक विनंति पत्र दिलें आहे! (खिशांतून एक थैली काढून पिताजींच्या हातीं देत) हें तें पत्र! (मुजरा करतो.)

पिताजींनीं थैली घेतली; मुद्रा पाहून फोडली व आंतील पत्र वाचून, गुरुदेवांच्या हातीं दिलें. मग त्या शाही अधिकाऱ्यास बसण्यास सांगितलें. त्यानें पुन्हां तीन वेळां कुर्निसात केला व दाखविलेल्या जागे वर तो बसला!

दोन्हीं पत्रें वाचीत असतां गुरुदेवांची मुद्रा गंभीर झाली होती. त्यांनीं पुन्हां दोन्हीं पत्रें वाचलीं; त्यांत शाही हुकूम—जो त्या अधिकाऱ्याच्या नांवचा होता तो—वाचतांना त्यांचे मुद्रे वर दुःखाची छाया पसरली! ती पाहून तेथें जमलेल्या मंडळींना वाटलें कीं, कांहीं तरी वाईट प्रसंग आहे खास. पितापुत्र खानांची हि नजर तिकडे होती च; त्यांनीं गुरुदेवांची ती मुद्रा पाहून धीर सोडला! त्यांच्या हृदयांनीं ठाव सोडला! सर्वत्र स्तब्धता होती; तिचा भंग गुरुदेवांनीं केला!

**गुरु**— शहानें हें पत्र राजाजींस लिहिलें आहे. यांत त्यानें राजाजींस आपले मित्र म्हटलें असून, बुंदेलखंडाचें पूर्ण स्वातंत्र्य मान्य केलें आहे व शेवटीं विनंति केली आहे कीं, महंमदखान व काईम, जे आपल्या हातीं सांपडले आहेत, त्यांना पाठविलेल्या सरदाराचे हवालीं करावें! ते राजद्रोही, बागी आहेत! त्यांना काय शिक्षा द्यावयाची तें या (दुसरें पत्र दाखवून) शाही फर्मानांत नमूद आहे! पण शिक्षा सांगण्यास माझी जीभ धजत नाहीं! सरदार! तुम्ही च सर्व प्रकार उलगडून सांगा!

**अ**— जी, हां! पण तत्पूर्वी कैदी माझ्या सुपूर्त व्हावेत अशी महाराजसरकारांना विनंति आहे.

**पि**— महंमदखान! काईम! आमचा नाइलाज आहे! दिल्लीचे शहा आमचे मित्र बनले आहेत, पूर्वी च होते. मध्यंतरीं तुमच्या कारवाईनें मैत्रींत व्यत्यय आला! आमच्या मित्राची विनंति आम्हांस अमान्य करतां येत नाहीं. शिवाय राजनीती प्रमाणें परस्पराचे राजद्रोही कैदी परस्परांना परत द्यावे लागतात. सरदार! तुमचे बागी तुमच्या सुपूर्द केले आहेत!

अधिकाऱ्यानें उठून पिताजींना पुन्हां कुर्निसात केला व पितापुत्र खानाजवळ जाऊन—

**अ**— (मोठ्यानें) महंमद बंगष! काईम बिन महंमद बंगष! तुम्हां दोघांना (शाही फर्मान दाखवून) या शाही फर्मानाच्या आधारा वरून, राजद्रोहाच्या आरोपा वरून—शहानशहांचा खून करण्याचा कट केल्याच्या आरोपा

वरून—पकडीत आहे ! ( ढालाइतांना ) या दोघांना पहाऱ्यांत बसवा !

ढालाइतांनीं त्या प्रमाणें केलें ! सर्व सभा स्तब्ध झाली !

पि— सरदार ! हा काय प्रकार आहे ? खालीं बसा व सर्व सांगा.

अ— हां जी ! खाविंद ! सर्व सांगतों. मी अलाहाबादचा माजी सुभेदार कमरुद्दीन खान. या महंमदानें वझिराच्या सहाय्यानें, शहानशहाचे कान, माझ्या बद्दल खोट्यानाटया गोष्टी सांगून भरले आणि मला सुभेदारी वरून तगीर केलें व तो सुभा आपल्यास मिळविला. हा पाजी व स्वार्थसाधु आहे ! चार पांच हजार अफगाण पदरीं ठेवून व पातशाही भांडणांत हात घालून जरूर त्या पक्षास मदत करी. फर्रुकशियर शहाच्या कारकीर्दीत हा सय्यद बंधूंच्या बाजूस होता. त्या बंधूंनीं याला मोठमोठया जहागिरी दिल्या ! पण हा पाजी माणूस पुढें त्या उपकारकर्त्यांच्या विरुद्ध उठला ! ही एक ठळक गोष्ट सांगितली ! अशा याच्या निमक—हरामीच्या गोष्टी पुष्कळ आहेत ! हें च पहा ! ज्या पातशहांनीं याला माझी सुभेदारी दिली त्या पातशहांचे जीवा वर हा उठला !

पि— ( आश्चर्यानें ) काय म्हणतां ?

अ— जी, हां ! ही गोष्ट पुराव्यानिशीं सिद्ध झाली आहे ! याची महत्त्वाकांक्षा वजीर होण्याची होती व त्या हि पुढें जाऊन स्वतंत्र नबाब बनण्याची होती ! या साठीं हा संधि हुडकीत होता. या वेळीं याला संधि सांपडली. यानें, महाराजसरकार ! आपल्या वर मोहीम करण्याचा प्रसंग मुद्दाम उकरून काढला ! या गोष्टीस खासे पातशहा विरुद्ध होते; ही मोहीम करण्यांत याचा मनांतील हेतु असा होता कीं, शाही सैन्याचा खराबा व्हावा ! ती गोष्ट आतां झाली च आहे ! तसें च उठस्या सुटस्या पैशाची अडचण दाखवून हा दरबारातून खजिना मागवी व त्या पैकीं निम्मा पैका चोरून हा प्रयागास पाठवी ! तेथें सरकारनें नुकती च जी झडती घेतली तींत जवळ जवळ एक कोटीचा खजिना सांपडला ! दरबारास मात्र कळवीत असे कीं, बुंदेले, खजिना लुटतात ! या कामीं याला सध्याच्या वझीराचें आंतून सहाय्य होतें ! कारण वझीराच्या मनांत शहानशहास पकडून बंदींत टाकून स्वतः तक्त बळकावयाचें होतें ! वझीरानें याला भाक दिली होती कीं, आपण तक्तनशीन झाल्या वर याला वझीरी द्यावयाची ! या दोघांनीं शाही सैन्यांत फितूरी करून सर्व

सिद्धता केली ! पण पातशहा न्यायी व स्वभावानें सत्याचे पक्षपाती असल्यानें हा सर्व डाव उधळला ! कट उघडकीस आला ! हें सर्व काम हजरत काका साहेबांनीं—कृष्णाजीपंत जोशीजी यांनीं—उजेडांत आणलें ! त्यांचेवर पादशहांचा विश्वास पूर्वी पासून होता. काकासाहेबांनीं मुद्यापत्त्यानिशीं पुराव्याचें भरपूर माप वझीराच्या पदरांत घातलें आणि महंमदावर हि अपराध पूर्ण लागू केला! या कटांत काईम हि सामील होता. लागली च कटांतील प्रमुख मंडळीस पकडण्यांत आलें. शहानशहांनीं मुख्य मीर आदिला कडे चौकशी सोंपविली. त्यांनीं गुप्तपणें सर्व खटला चालविला व त्यांची खात्री पटल्या वर अपराध्यांनी शिक्षा फर्मावण्यांत आल्या. या सर्व मुख्य कटवाल्यांना हत्तीच्या पायाशीं देण्याची शिक्षा त्यांनीं दिली ! तिला पातशहांची मंजुरी मिळाली ! मला हजरत काकासाहेबांनीं बोलावून, पातशहांस भेटविलें. माझ्या वर खोटी तोहमत घेतल्याचें सिद्ध करून दिलें. मग त्यांच्या सल्लया वरून शहांनीं मला पुन्हां प्रयागची सुभेदारी दिली आणि या दोघांना पकडून त्यांची शिक्षा अंमलांत आणण्याचें काम फर्माविलें ! त्या प्रमाणें मी येथें आलों ! महाराजसरकारांनीं मेहेरनजर करून कैदी माझ्या स्वाधीन केले ! आतां शाही शिक्षा, आज सायंकाळीं अंमलांत आणावी अशी माझी इच्छा आहे ! तरी सरकारस्वारींनीं अनुमोदन द्यावें !

अधिकारी बोलत असतां सर्व सभा स्तब्ध होती. महंमदाचें चित्त मात्र गडबडून गेले होतें. त्यानें त्या अधिकाऱ्यास पाहिल्या पासून त्याचा जीव उडून गेला होता. त्याला पाहतां क्षणीं यानें त्याला ओळखलें व आपल्या वर कांहीं तरी संकट कोसळणार हें ताडलें ! पुढें त्याचें उच्चारलेलें वाक्य आणि ढालाइतांचा आपल्या भोवतीं पडलेला गराडा पाहून त्याची खात्री झाली. त्या नंतर तो जसजशी हकीकत सांगूं लागला तसतशीं आपला गुप्त कट फुटल्याची त्याला जाणीव होऊन त्याचे मनांत भीतीचा प्रवेश अधिकाधिक होऊं लागला, शरीर व मन जड होऊं लागलें, बधिरता येऊं लागली आणि शेवटीं शिक्षेचे शब्द ऐकतां च त्याच्या डोळ्यां पुढें सर्वत्र अंधार दिसूं लागला ! त्याची चेतना नष्ट झाली ! पुत्राची गत पित्या प्रमाणें च झाली ! आतां जीवनाचा एकच तंतु—सूक्ष्म तंतु—त्याला दिसूं लागला ! महाराज छत्रसाल, शिक्षा अंमलांत आणण्यास असंमति देतील तर ? पण—

पि—सरदार! जो नीच आपल्या अन्नदात्या वर उलटला, त्याला मिळा-लेली शिक्षा योग्य आहे! शहा आमचे मित्र आहेत! मित्राच्या कल्याणाचे आड आम्ही कसें येऊं? शिक्षा अंमलांत आणण्यास आमचें अनुमोदन आहे! कैद्यांना घेऊन जा!!

शेवटचा तंतु तुटला! दोघां कैद्यांच्या पुढें मृत्यु "आ" वासून उभा राहिला! त्यांना दिसू लागलें कीं, मांग लोकांनीं आपले हातपाय बांधले आहेत, आपल्यास मैदानांत ठेवलें आहे, तमासगीर मंडळी, "—हे पहा सत्यद्रोही! हे पहा राजद्रोही! गरीब रयतेला पिळून काढणारे! मजदूर—किसानांना छळणारे! सतींना जुलमानें भ्रष्ट करणारे! लोकमान्य—महात्म्या विषयीं जगांत बुद्धिभेद माजविणारे, त्यांचा मत्सर करणारे! त्यांनीं चालविलेल्या लोककल्याणकारक कार्यात कांटे पसरणारे! शेवटीं देवानें यांना योग्य शिक्षा केली! हे तर नरकांत जाणार च पण यांचे एकवीस पूर्वज व एकवीस वंशज हि नरकांत जातील!!" असले शिव्याशाप देत आहेत; तिकडून एक दारू पिऊन धुंद झालेला, अंगारा प्रमाणें लाल डोळ्यांचा, मस्तका वर माहुतानें अंकुशाचा सारखा मारा केल्यानें चिडलेला व वर सोंड करून भयंकर चीत्कार करणारा हत्ती धांवत येत आहे; आला, हत्ती जवळ आला; त्यानें सोंड खालीं केली, आपल्यास सोंडेनें पकडले; माहुतानें खचकन् अंकुश त्याचे गंडस्थळांत खोंचला व तोंडानें "काटो!" शब्द उचारला; हत्तीनें आपला पुढला पाय वर उचलला, पाय हळुं हळुं खालीं आला, आपल्या पोटास त्याचा स्पर्श होत आहे——

दोघे कैदी एकदम ओरडले—"मेलों! मेलों!"

शेवटचा तंतु तुटल्यावर दोघांच्या दृष्टी पुढें वरील दृश्य उभें राहिलें होतें! तें पहात असतां त्यांची सारी शुद्धबुद्ध नष्ट झाली! इतकी कीं, आपण तो प्रसंग प्रत्यक्ष अनुभवीत आहों असें त्यांना वाटलें! म्हणून शेवटच्या दृश्यानें त्यांचा जीव उडून, त्यांच्या तोंडांतून "मेलों, मेलों!" हीं अक्षरें बाहेर पडलीं!

पापी, असत्याचरणी, जुलमी, साधुद्रोही, उन्मार्गगामी लोकांचें शेवटीं असें च होतें! जावत्काल सत्तेचा, नशीबाचा जोर असतो, तावत्काल देव व दुनिया त्यांना तुच्छ वाटते; पण तो जोर संपला कीं, ते शेणाहून हि कमकुवत

बनतात ! मृत्यु पुढें दिसूं लागला कीं ते गर्भगळीत होतात ! सच्चा, पुण्यवान साधु, सांई च मोठ्या आनंदानें मृत्यूस कवटाळण्यास धांवत जातो ! तो हंसत हंसत फांशीची दोरी आपल्या गळ्यांत घालून घेतो ! देवाचें नांव घेत हर्षानें सरसर सुळा वर चढतो ! गाणें–लोककल्याणकारक, सत्यधर्माचें गाणें–गात गात तोफेच्या तोंडा पुढें उभा राहतो ! आणि शेवटीं हा पंचभूतात्मक देह पंचमहाभूतांच्या तोंडा वर फेकून, त्या मूळ सच्चिदानंदांत मिसळून "सत्यं–शिवं–सुंदरं" बनतो ! हें अनमोल सौभाग्य पाप्यांना कसें लाभणार ? सतीचें वाण, बाजारबसवीस कसें लाभणार !

महंमद व काईम दोघे पापी ! वरील अक्षरें त्यांच्या तोंडून निघाल्यावर काइम तर मूर्च्छित पडला व महंमद अर्धवट बेशुद्ध झाला ! थोडया वेळानें महंमद शुद्धी वर आला ! पाव घटका तो स्तब्ध होता. हळुं हळुं त्याचे मुद्रेवर विकार उमटूं लागले. निरनिराळ्या विकारांची गर्दी दिसली ! थोडया वेळानें एक विकार कायमचा दिसूं लागला ! त्यानें मुलास सावध केलें. मग हात जोडून तो महाराजांना म्हणाला.

म— महाराज ! अल्लानें, देवानें मला योग्य शिक्षा केली. सरदारसाहेबांनीं सांगितलेली सर्व गोष्ट सच्ची आहे. आम्ही पितापुत्र पापी आहों ! आंजपर्यंत अनेक पापें, जुलूम, अत्याचार केले. आपल्यांस हि त्रास दिला. माझ्या अन्नदात्यावर उठलों. जगांत सत्य नाहीं असें मला वाटे. बलवानानें दुर्बलाला चिरडणें हा च मला न्याय वाटे ! शस्त्रास्त्रांनीं दुर्बल राज्यांना प्रचंड शस्त्रांच्या बळावर मोंगली साम्राज्यांत खेंचून गुलाम बनविणें ही च राजनीति मी जाणत होतों. पण माझी धुंदी उतरली ! आतां माझी पूर्ण खात्री झाली कीं शेवटीं सत्याचा, न्यायाचा जय होतो ! मला माझ्या कृत्यांचा पूरा पश्चात्ताप झाला. आतां माझे डोळे साफ उघडले. ( सद्गदित ) पण आतां त्याचा काय उपयोग ? हातचा तीर सुटून गेला. या अल्ला ! या रहीम ! खऱ्या पश्चात्तापावर तूं रहीम ( कृपा ) करणार नाहींस काय ?

बोलतां बोलतां महंमदाचे डोळ्यांतून अश्रु झरझर गळूं लागले ! पुढें त्याच्यानें बोलवेना ! ती च गत काईमची झाली ! सभेंतील हि सर्व लोकांचीं अंतःकरणें करुणेनें हेलावलीं !

इतक्यांत दरबार-इ-खासच्या दारांतून "**जय जय रघुवीर समर्थ**"

ही घनगंभीर घोषणा ऐकूं आली ! सर्वांचें लक्ष तिकडे वळलें ! धीरोदात्त व गंभीरपणें पावलें टाकीत काकासाहेबांची–कृष्णाजीपंत जोशी यांची–स्वारी आंत येत होती !

काकाजींना पाहून सर्व सभा उठून उभी राहिली ! महंमद व काईम हि उठले ! काकाजींनीं प्रथम गुरुदेवांजवळ जाऊन त्यांना क्षेमालिंगन दिलें ! मग राजाजी, श्रीमंत, भाऊसाहेब, राजकुमार यांनीं काकाजींच्या चरणां वर मस्तकें ठेविलीं ! शेवटीं सर्व मंडळींनीं हि यथोचित अभिवादन केलें. गुरुदेव व काकाजी एका आसना वर बसल्या नंतर सर्व मंडळी बसली. काकाजींनीं महंमदाकडे पाहून म्हटलें––

**का**–– महंमद ! अल्ला, रहिमन आहे ! पश्चातप्त माणसा वर तो रहीम करतो ! कुराणे शरीफच्या दुसऱ्या सुरा मध्यें अल्लामियानें म्हटलें आहे कीं, " ज्याला पश्चात्ताप झाला आहे त्याचे वर अल्ला प्रेम करतो, त्याचे वर कृपा करतो " तिसऱ्या सुरा मध्यें तर अल्लानें आश्वासन दिलें आहे कीं, " पापी अन्यायी माणसानें पूर्ण पश्चात्तापानें अल्लाची करुणा भाकली तर अल्ला त्याचे वर दया करतो व त्याला स्वर्गात पाठवितो ! "

**म**–– ( हात जोडून ) हजरत, काकासाहेब ! मी आपल्याला ओळखतों ! सारी दिल्ली आपल्याला ओळखते ! आपण अवलिया आहां; साई आहां, महात्मा आहां ! अजमीरच्या ख्वाजा साहेबांच्या योग्यतेचे आहां ! त्या अवलियांच्या प्रमाणें च आपला अधिकार दिल्लीच्या पातशाही घराण्या वर चालतो ! आपला शब्द, आपला हुकूम कोणता हि पातशहा मोडीत नाहीं ! महाराज ! माझी धुंदी पार उतरली ! मला खरा पश्चात्ताप झाला आहे ! आपण माझ्या वर रहीम करा !

महंमद उठला व हात जोडून काकाजी कडे हळूं हळूं गेला. त्यानें त्यांचें चरण घट्ट पकडून त्यां वर अश्रूंची धारा धरली ! आतां पर्यंत केलेली सर्व पापें जणूं अश्रुरूपानें बाहेर पडून त्याचें अंतःकरण हळूं हळूं शुद्ध होत होतें ! काईम हि उठला. त्याचें हि मन पालटलें होतें ! जेथें अट्टल निढावलेला बाप हदरून जातो तेथें अपक्व मनाचा कोंवळा तरुण पुत्र विरघळणार नाहीं तर काय ? तो उठला व त्यानें गुरुदेवांचे पाय धरले ! प्रसंग करुणारसपूर्ण होता ! काकाजींनीं महंमदास उठविलें.

का— महंमद ! तुला खरा पश्चात्ताप झाला ! तुझ्या वर अल्लानें मेहेर केली आहे ! जा बेटा. काईम ! तुला हि खुदानें पाक बनविलें आहे ! ऊठ ! गुरुदेवांचा व माझा तुम्हां दोघांना आशीर्वाद आहे ! दुवा आहे ! उठा.

दोघे उठले ! अजून हि त्यांचे डोळ्यांनीं काकाजींच्या व गुरुदेवांच्या चरणां वर अश्रुधारांचा अभिषेक चालविला होता ! मग महंमदानें दिल्लीहून आलेल्या सरदारा कडे पाहिलें व--

म--सरदारसाहेब ! आपण आतां शाही शिक्षा अंमलांत आणा ! काकाजींनीं सांगितल्या प्रमाणें व खुदानें आश्वासन दिल्या प्रमाणें त्या बेहेष्त मध्यें आतां आम्हांस जाऊं द्या !

असें म्हणून तो व काईम पुन्हां त्या ढालाइतांच्या जवळ गेले ! ढालाइतांनीं त्यांच्या मुसक्या बांधण्या साठीं आपले हात पुढें केले ! इतक्यांत—

का— ठैरो ! कमरुद्दीन ! हा पातशाही फर्मान वाचा !

असें म्हणून काकाजींनीं आपल्या अंगरख्याच्या खिशांतून एक थैली काढून कमरुद्दीनाच्या हातीं दिली ! सर्व सभा चित्रा सारखी स्तब्ध होऊन पुढें काय होतें तें पाहण्यास उत्सुक झाली. कमरुद्दीनानें थैलीचा शिक्का पाहून, तिला तीन वेळ कुर्निसात केला व तिचें चुंबन घेऊन तिच्या वर आपलें कपाळ टेकलें ! मग ती फोडली. आंतील फर्मान बाहेर काढला व वाचण्यास आरंभ केला. हळूं हळूं त्याच्या मुद्रे वर आनंद झळकूं लागला. वाचन संपलें. कमरुद्दीन उभा राहिला.

क— महंमद बंगष ! ! काईम बिन महंमद बंगष ! या फर्मानान्वयें शहानशहांनीं तुम्हां दोघांना गुन्ह्याची पूरी माफी देऊन मुक्त केलें आहे !

हें वाक्य ऐकून दोघां कैद्यांना तर आनंद झाला च पण सर्व सभेला हि झाला !

क— बंगष पितापुत्र ! तुम्हांला मुक्त करण्याचें सर्व श्रेय हजरत काकाजींचें आहे ! त्यांनीं रदबदली केल्या वरून जहांपन्हांनीं तुम्हांला क्षमा केली आहे ! तुमच्या प्रमाणें च सर्व कटवाल्यांना हि हजरतांच्या सांगण्या वरून सरकारांनीं माफी दिली आहे !

हें ऐकतां च सर्व सभेंतील विषण्ण वातावरण नाहींसें होऊन तेथें आनंद झळकूं लागला ! महंमद व काईम यांनीं तर धांवून जाऊन काकाजींचा एक

एक चरण घट्ट धरला व त्या वर आपलें मस्तक ठेविलें ! ! अत्यानंदाच्या भावनेचे एक दोन क्षण ओसरल्या वर—

**म**— हजरत ! ( सद्गदित ) आपण रहिमन आहां ! आपण ... अल्लाचे अवतार ... महात्माजी ! आप हि खुद खुदा हों......

**का**— (त्याला व काईमला उठवून) बेटा, काईम ! भाई, महंमद ! मैं खुदा नहीं, लेकिन खुदा–इ–खिदमतगार है ! मेरा उपकार मत मानों; खुदाका मानों ! उसकी खिदमत करों ! हक याने सत्य यही खुदाका स्वरूप है ! दसवे सूरमें अल्लानें आपना स्वरूप सत्य ही का है ऐसा कहा है ! इस लिये सत्य धरमसे चलों ! हक – महजब का, दीने – इलाही का पालन करों ! ! तुमकों पूरा पस्तावा हुआ है. अल्ला कहता है की जिसको पश्चात्ताप होता है, जो भगवान पर निष्ठा रखता है और सत्कृत्य करता है, उसके पहेले पापी कृत्योंका रूपांतर, अल्ला पुण्यकारक कृत्योंमें बनाता है. अल्ला हमेशा इन लोगोंको माफी देनेको तैयार रहाता है. अल्ला रहिमन् है "**इल्लामन् ताबा व आमना व अमिला अमलन् सालिहन् फउलिआका युबदिलो अल्लाहू सइनातिहिम हसनातिन् व काना अल्लाह ग़फ़ूरन् रहिमन्**"

**म**— ( हात जोडून ) हजरत ! आपण च माझे मुर्शिद ( गुरु ) ! मी आपला मुरीद ( शिष्य ) आहें ! आपण च मला पावन करा ! मला खुदा–इ–खिदमतगार बनवा !

**का**— तें काम माझ्या कडे नाहीं ! माझे गुरुबंधु हे सांईमहाराज ( गुरुदेवां कडे पाहून ), यांचे कडे आहे ! ते तुझी विनंति मान्य करतील !

महंमदानें महाराज छत्रसालां पुढें येऊन हात जोडले—

**म**— महाराज सरकार ! मी आपला अपराधी आहें ! मला क्षमा करा !

**पि**— महंमदखान ! परमपूज्य काकाजींच्या क्षमेंत, माझी क्षमा आली.

काईमनें तर पिताजींच्या चरणां वर मस्तक ठेवून गद्गद स्वरानें म्हटलें—

**काईम**— सरकार ! माझा अपराध फार मोठा आहे ! खाविंदांना त्याची कल्पना नाहीं ! कोणत्या तोंडानें मी माफी मागूं ?

पिताजीनें त्याला उठवून त्याचे पाठी वरून हात फिरवला;

**पि**— बेटा ! मला सर्व माहीत आहे ! तुझा अपराध क्षमा करण्या जोगा नव्हता; पण आतां तूं पश्चात्तापानें शुद्ध झाला आहेस ! बेटा ! मीं तुला

पूर्ण क्षमा केली. मानसिंह ! या पितापुत्रांना व कमरुद्दीनखानांना सरकारी पाव्ह-ण्याच्या इतमानानें वागीव. यांना मेहमान – वाड्यांत नेऊन त्यांची बरदास्त ठेव !

त्या तिघांनीं पिताजींना कुर्निसात केले. मानसिंह त्या तिघांना व त्या चार ढालाइतांना बरोबर घेऊन निघून गेला !

**गुरु**— काका ! हा काय प्रकार घडला ?

का— प्रभु ! थोडक्यांत सांगतों. चिरंजीव भाऊनें तुम्हांला सर्वांना सुचवून मला एक योजना अंमलांत आणण्यास कळविलें होतें ! तें एक नाटक रंगवावयाचें होतें ! परंतु नाटकाची वेळ च आली नाहीं ! कारण तसा बनाव खरोखर च बनत चालला होता ! तो पूर्ण बनल्या वर तो उघडकीस आणण्याची खटपट केली व आयत्या वेळीं तो शहाच्या डोळ्यां पुढें उभा केला. शहानें सर्व अपराध्यांना देहदंडाची शिक्षा दिली ! त्या प्रमाणें या पितापुत्रांना दिलेल्या शिक्षेची अंमलबजावणी करण्यास या कमरुद्दीनास इकडे धाडण्यांत आलें. पुढें अपराधी सत्यधर्माकडे वळतात कीं नाहीं हें पाहण्याची मीं खटपट केली. श्रीसमर्थकृपेनें खटपटीस यश आलें ! तेव्हां त्या सर्वांना शहा कडून क्षमा करविली ! मग या पितापुत्रांच्या बाबतीं-तील शहाचा क्षमेचा फर्मान घेऊन इकडे आलों ! मला खात्री होती कीं, आपल्या सहवासानें हे हि सत्यधर्मी बनतील च. या प्रमाणें या प्रकाराची हकीगत आहे !

गुरु— धन्य ! काका ! तुम्हीं श्रीं चें वचन सत्य केलें ! “ **धक्के चपेटे सोसावे ।। नीच शब्द साहात जावे । प्रस्तावोन परावे । आपले होती** ”

का— प्रभु ! तुम्हीं सुद्धां श्री वचन खरें करून दाखविलें ! या **गजेन्द्र-मोक्षाचे** प्रसंगीं तुम्हीं “ **लोकीं केलें तें चुकावी । लोकीं भाविलें ते उलथवी । लोकीं तर्किलें तें दावी । निर्फळ करूनी** ॥ ” असें केलें ! हे लोक म्हणजे दुष्ट लोक ! अशा “ दुष्ट जनाचें हृदय मृद शब्दें उकलावें ” ही श्रीं ची आज्ञा आपण पूर्ण केली ! आपण च धन्य आहां !

पि— आज आपण सर्व च श्री कृपेनें धन्य झालों आहों ! आज दुर्जनांचा “ **हृदयपालट** ” झाला ! आजचा दिवस धन्य आहे ! **जय, जय, रघुवीर समर्थ !**

सर्वांनीं रघुवीराचा जयजयकार केला ! सभा संपली !

दुसरे दिवशीं दरबार–इ–आम मध्यें प्रचंड राजसभा भरली ! सर्व बुंदेलखंडांतील जहागीरदार, ठाकूर, नबाब, प्रमुख शेठ, सावकार तेथें जमले होते ! सुवर्ण सिंहासनावर महाराज छत्रसाल बसले होते. त्यांच्या उजव्या हाताकडे मृगाजिन असलेल्या उच्चासनावर गुरुदेव व काकाजी होते. त्यांच्या उजवीकडे भरजरी आसनांवर श्रीमंत बाजीरावसाहेब, भाऊसाहेब, अवधूतसिंह, दोन्ही राजकुमार, बसले होते. त्यांच्या खालीं इतर रजपूत राजे, मांडलिक, हमीदखान, नूरखान धूरमंगद, इतर ठाकूर, पिलाजी जाधव, मानसिंह आणि मराठे–रजपूत सैन्यांतील प्रमुख अधिकारी बसले होते. गुरुदेवांच्या आसनामागें कविराज भूषण होते. सिंहासनाचे डावे बाजूस दिल्लीदरबारांतून आलेला सरदार कमरुद्दीन, महंमद खान बंगष, काईमखान, महंमदाच्या सैन्या पैकीं जिवंत उरलेले अधिकारी ( महंमदाच्या सैन्यांतील कैद्यांना, पिताजींनीं मुक्त केलें होतें. ) व बुंदेलखंडाच्या राज्यांतील शेट सावकार आणि प्रमुख व्यक्ती बसल्या होत्या !

भालदार ललकारला — " खामोष ! निगाह् रक्खो !

सर्व सभा स्तब्ध झाली ! इतक्यांत गुरुदेवांच्या आसना मागून कविराज पुढें आले. सिंहासना समोर येऊन त्यांनीं महाराजांना वंदन केलें.

भू — जय, जय, रघुवीर समर्थ ! जय महा काल ! सभासद हो ! आजचा दिवस शुभ आहे ! महाराजांचा जय झाला. महाकालाच्या कृपेनें महाराजसाहेब व दिल्ली–पति पातशहा यांच्यांत सल्ला झाला. पातशहानें बुंदेलखंडाचें **पूर्ण स्वातंत्र्य** कबूल केलें ! महाराजसरकारांनां स्वतंत्र राजे, बरोबरीचे पातशहा म्हणून दिल्लीशानें मान्य केलें ! हिंदूमुसुलमानांची इत्तेफाक – एकी – झाली ! आज मोठा भाग्याचा दिवस आहे. महाराजसाहेबांची ही च इच्छा होती ! आजच्या पातशाहींत जो अत्याचार व असत्याचार होतो तो बंद व्हावा आणि पातशाहीनें शहानशहा अकबरशहाच्या वेळच्या दीने इलाहीचें पालन करावें, या साठीं च आतां पर्यंत महाराज सरकारांनीं खटपट केली; ती आज सफळ झाली ! महाराजांचें आतां पर्यंतचें आयुष्य म्हणजे—

**" सत्य धरम दिल दियो, हाथ लियो करवाल ।**
**साहूके जस कलस पै, धुज बांधी छत्रसाल ॥ "**

एवढें च नव्हे तर—

**" राजत अखंड तेज, छाजत सुजस बडो । गाजत गयन्द दिग्गजन हियसालको ॥ जाही के प्रताप सों मलीन आफताब होत । ताप ताजि दुर्जन करत बहु ख्यालको ॥ साजि साजि गज तुरी पैदर कतार दीन्हें । भूषन भनत ऐसो दीन प्रतिपाल को ॥ और राजा राव एक मनमें ल्याऊं अब । साहूको सराहौं कै सराहौं छत्रसालको ॥ "**

**महंमद** -- ( उठून तीन वेळां महाराजांना कुर्निसात करतो. ) महाराज सरकार! आतां कविराजांनीं सांगितलें तें सत्य आहे! आपला सारा प्रयत्न सुख व शांति म्हणजे **सत्य व अहिंसा** या साठीं च होता! पण तो दुर्दैवानें माझ्या डोळ्यांस दिसला नाहीं म्हणून मीं सरकारांना फार त्रास दिला! पण आतां माझे डोळे उघडले! मला क्षमा करावी! या पुढें मी आपला चाकर होऊन दीनेइलाहीचा प्रचार करीन!

या धर्मांत सत्य, अहिंसा निरनिराळ्या धर्मांचे व जातींचें ऐक्य, त्यांच्यांत समझौता निर्माण करणें ही मुख्य तत्त्वें आहेत. " **फतवक्कल् अला अल्लाहि इन्नका अला अलहक्किल् मुबीनि** " ( ईश्वरा वर पूर्ण विश्वास ठेव, कारण ईश्वर व तूं हि सत्यस्वरूप च आहां ); तसें च " **फअरतक़िबहुम वस्तबिर्** " ( दुष्टांनीं केलेले अपमान सहन करा, मनानें हि त्यांची हिंसा करूं नका ); शिवाय " **या अय्युहा अन्नासो इन्ना खलक़नाकुम म्मिन् जकिरिन् व उन्सा व जअलनाकुम शउबुन् व क़बाइल लित आरफू** " ( हे मनुष्य हो! मी तुम्हांला पुरुष आणि स्त्री या दोन प्रकारानें उत्पन्न केलें आहे; तसें च निरनिराळ्या देशांत व निरनिराळ्या जातींत तुम्हांला विभागलें आहे. पण तुम्हीं परस्परांची ओळख करून घ्या व परस्परांशीं बंधुत्वानें, आत्मीयतेनें वागा. ) असल्या प्रकारच्या आज्ञा खुद्द अल्लानें च, कुराणेशरीफ मध्यें केल्या आहेत. या च सत्यधर्माचा मी यापुढें प्रचार करीन.

**श्रीमंत** — शाबास, खान! तुम्हीं तर असा प्रचार करा च, पण पातशाहा कडून व दरबारा कडून हि असा प्रचार करण्याची व त्या प्रमाणें वागण्याची खटपट करा!

**म** — जी हां! वझीर - इ - आजम! अवश्य करीन. श्रीमंत पेशवासाहेब! जहांपन्हांच्या बाबतींत खटपटीची जरूर नाहीं! ते मनानें वाईट नाहींत. त्यांची दीनेइलाही वर भक्ति आहे! कोणास नाहक सतावणें त्यांना

आवडत नाहीं. ते मनाचे पाक आहेत! पण दरबारी मंडळी तशी नाहींत. या दरबाऱ्यांना आपल्या अमीऱ्या, सरदारक्या, जहागीऱ्या कायम ठेवावयाच्या आहेत! ही मुत्सद्यांची गोष्ट झाली. प्रत्यक्ष नोकरांची – मग ते मुलकी दिवाणी अगर फौजी कोणते हि असोत – गोष्ट विचारावयास च नको! त्यांना आपली नोकरीची जागा पिढ्यान पिढ्या कायम ठेवावयाची असते. हे आपापल्या प्रांताचे, परगण्याचे जणूं काय राजे च असतात! हा अधिकार सतत राहण्यासाठीं ही नोकरशाही व मुत्सद्दीशाही कारवाया करतात! त्यांत सत्या पेक्षां असत्याचा भाग फार असतो त्यामुळें त्यांच्या पोटीं जुलूम, जबरी, अत्याचार, लुटालूट, स्त्रियांवर अत्याचार, रयतेचा नाना प्रकारचा छळ, धार्मिक आततायीपणा इत्यादि प्रकार जन्मास येतात! आला हजरत भोळे असल्यानें, हे लोक त्यांच्या भोळेपणाचा फायदा घेतात! आपल्यास पाहिजे असतील तशीं शाहीफर्मानें, ते लिहून काढतात व लुच्चेगिरी करून हुजुरकडून त्यावर "स्वाद" व "रुजू" करवितात!! यांनीं पातशहांना एक प्रकारें बाहुलें बनविलें आहे! आजची पातशाही, खरी पातशाही–सत्याचे साम्राज्य–नसून या जुलमी मुत्सद्दी–नोकरांची जुलमी नोकरशाही म्हणजे अत्याचारी साम्राज्यशाही आहे! मग हे लोक वरून किती हि म्हणोत कीं, "आम्हीं साम्राज्यशाहीचा हेतू व कार्य मागें च सोडून दिलें आहे!" पण हें म्हणणें खोटें आहे. भोळसटांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचा हा प्रकार आहे! अशा वेळीं साम्राज्यांतील रजपूत किंवा मुसुलमान मांडलिकांपैकीं एकाद्यानें जर आमच्या दरबारास विचारलें कीं, "तुम्ही पातशाहीची, साम्राज्याची कल्पना मागें च सोडून दिली ना? मग मला पूर्ण स्वातंत्र्य द्या!" तर त्यावर हा दरबार काय उत्तर देतो, माहीत आहे? तो म्हणतो. "तुमच्या प्रजेंत एकी नाहीं! आपसांत ते लोक डोकेफोडी करतात! हिंदु–मुसुलमान हा भेद तर मोठा च आहे! पण हिंदूंत हि भेद आहे! ब्राह्मण आपल्यांला श्रेष्ठ समजून अब्राह्मणांना तुच्छ मानतात तर दोघे हि अछुतांना तिरस्करणीय लेखतात! मुसुलमानांत हि शिया–सुनी तंटा आहे! अशा स्थितींत तुम्हांस पूर्ण स्वातंत्र्य दिलें, तुमचें मांडलिकत्व काढून तुम्हांस दरबारचे दोस्त मानलें तर मोठा अनर्थ कोसळेल! आम्हांला सर्व धर्मांच्या–हिंदु, मुसुल्मान, इसाही, पारशी, इस्राएल, रानटी इत्यादि–लोकांचे हित पाहिलें पाहिजे!

या सर्वांच्या हितासाठीं तर आम्ही दीड हजार कोसांवरून, मोंगोलिया, तुर्कस्थान, इराण मधून येथें आलों! या तुमच्या प्रजेची एकी करा. मग तुम्हांला बरोबरीचे राजे करावयाचे कां नाहीं तें पाहतां येईल!!" बरें, हें खरें मानून एकादा महाराणा प्रतापसिंह अगर एकादा शिवाजी छत्रपति प्रजेच्या एकी साठीं खटपट करूं लागला तर आमचा दरबार गुप्तपणें त्यांच्या विरुद्ध एकादा मानसिंह, एकादा जाधवराव उभा करतो! सारांश, दरबारचें म्हणणें—आपण साम्राज्यशाही सोडल्याचें—पूर्ण असत्य आहे! महाराज सरकार! मन मोकळें करून सांगतों कीं, काल पर्यंत मी सुद्धां या दरबाऱ्यां पैकीं एक होतों! पण काल (गुरुदेवां कडे पाहून व हात जोडून) महात्मा गुरुदेवांनीं मला पावन करून खुदा-इ-खिदमतगार बनविल्यानें मी धन्य झालों! माझा हृदयपालट झाला!

महंमद पुढें झाला; महाराजांच्या सिंहासना पुढें गेला व तीन वेळां कुर्निसात करून म्हणाला—

म— आजच्या या दरबारांत, महाराज सरकार! मी आपली क्षमा मागतों! माझे व माझ्या काईमचे सर्व अपराध क्षमा करावेत!

काईम हि सिंहासना पुढें हात जोडून उभा राहिला!

पि— महंमदखान! बेटा काईम! ज्यांना गुरुदेवांनीं क्षमा करून रामसेवक बनविलें त्यांना मीं पुन्हां क्षमा कसली करणार? पण तुमच्या समाधाना सार्ठी "क्षमा केली!" असें म्हणतों.

बापलेकांनीं महाराजांना पुन्हां अभिवादन केलें आणि ते आपल्या जागीं येऊन बसले.

इतक्यांत गुरुदेवांच्या शेजारीं बसलेले काकाजी, आसनावर बसल्या बसल्या म्हणाले—

का— राजाजी! श्रीमंत पंत प्रधान! आपण दिल्लीच्या जुलमी नौकरशाहीस काळघाटाच्या आखाड्यांत, दमांत उखडल्या मुळें, आतां तिला पुन्हां डोकें वर काढतां येणार नाहीं! या तुमच्या कृत्यानें शहांना मोठा आनंद झाला! खास शहा, या जुल्मशाहाच्या विरुद्ध पहिल्या पासून आहेत. त्यांनीं बुंदेलखंडाचें **पूर्ण स्वातंत्र्य मान्य करून,** महाराज छत्रसाल! तुम्हांस बरोबरीचे महाराज, मित्र म्हणून मान्य केलें आहे! आणि मैत्रीचा तह केला!

आहे. ( महंमदाकडे पाहून ) महंमद ! शहानें माझ्या पाशीं दिलेला तहनामा व खिलत ( मानाचा पोषाक ) महाराजांपुढें ठेव !

महंमदानें तहनाम्याची थैली असलेलें एक सोन्याचें तबक व पोषाक आणि जवाहिरांचीं, सरपोस घातलेलीं दहा सुवर्ण तबकें सिंहासना पुढें आणलीं; महाराजांनीं त्यांना हस्तस्पर्श केला व त्यांच्या दिवाणानें तीं घेऊन शेजारच्या चौरंगावर ठेवलीं !

**श्रीमंत**— उत्तम ! उत्तम ! आजच्या या सर्व आनंददायक प्रसंगाचें श्रेय महाराजांच्या तपश्चर्येचें आहे ! पिताजींनीं आज अर्धे अधिक शतक, सत्यधर्म प्रस्थापने साठीं, तप केलें ! भगवंतांनीं त्याचें फल त्यांना दिलें ! कारण—

**“ सत्य मूल सब सुकृत सुहाये । वेद पुराण विहित मुनि गाये ॥ ”**

**गुरु**— सत्य संकल्पाचा दाता भगवान, एकवचनी, सत्यमूर्ति, प्रभु रामचंद्र, आपल्या भक्तास अखेरीस विजयी च करतो; कारण. **“ जो असत्यको तजे वही है ज्ञानी । राम छुडावे उसे, रिद्धि मिले मनमानी ॥”**

**काकाजी**— श्रीमंत पंत प्रधान ! पातशहांनीं, आपल्या सरकारांना माळवा व आग्रा या दोन्ही सुभ्यांची चौथ-सरदेशमुखी देण्याचें मागें कबूल केलें होतें. सवाई जयसिंग राजे यांचे कडून आग्र्याचे हे हक्क आपल्यांस मिळत आहेत च; माळव्याचे हि मिळाले असते, पण त्याच्या आड आज पर्यंत गिरिधर बहाद्दर व दया बहाद्दर येत होते ! आपण त्यांना योग्य शिक्षा केली. त्यामुळें, या पुढें माळव्याचे हे हक्क आपल्यास निर्वेध मिळतील. त्याच्या शाही सनदा, पातशहानें तुम्हांस देण्यासाठीं माझ्या जवळ दिल्या आहेत. पातशहांनीं परवांच्या युद्धा पासून जुलमी नौकरशाहीच्या हातून राज्यकारभार काढून आपल्या स्वतःच्या हातीं घेतला आहे ! आणि पूर्वीचीं वचनें पाळण्यास प्रारंभ केला आहे ! महंमद ! त्या सनदा श्रीमंतांना दे !

महंमदानें सनदांच्या मखमली थैलीचें एक चांदीचें तबक श्रीमंतापुढें आणलें; त्यांनीं त्यास हस्तस्पर्श केल्या वर भाऊसाहेबांनीं ते आपल्याजवळ ठेवलें.

**का**— श्रीमंत ! आपल्या श्रीछत्रपति सरकारांना, पातशहांनीं खिलत पाठविली आहे; ती तुमच्याकडे थोड्या वेळानें पाठविण्यांत येईल ! आपल्याबद्दल पातशहांना फार धन्यता वाटली ! आपल्या वर त्यांचा फार लोभ

जडला आहे ! आपल्यास हि शहांनीं खिलत पाठविली आहे. तिचा आपण स्वीकार करावा !

काकाजींनीं खूण केल्या वरून महंमदानें सरपोसानें आच्छादित पांच चांदीचीं तबकें श्रीमंता पुढें आणलीं ! श्रीमंतांनीं त्यांना हस्तस्पर्श केला व पिलाजी जाधवरावानें तीं आपल्या जवळ घेतलीं.

**का—** रींवा नरेश ! अवधूतसिंह ! आपल्यास व आपल्या बरोबर या युद्धांत पिताजींच्या बाजूनें ज्या हिंदू व मुसुलमान रजवाडे, नबाब, टाकूर, जहागीरदार यांनीं भाग घेतला त्या सर्वांना पातशहांनीं शपथपूर्वक कौल (अभय) पत्र दिलें आहे. त्यांत आपणा सर्वांना स्वतंत्रता दिली असून, पातशाहीशीं मैत्री ठेवण्यास विनविलें आहे ! आपणां सर्वांना हि दरबारी खिलती दिल्या आहेत; त्या ज्याच्या त्याच्या कडे पोहोंचत्या होतील.

**अवधूत**—पातशहांना सुबुद्धि सुचली; फार उत्तम झालें! हें सर्व कार्य पूज्य काकाजींचें आहे ! परम पूज्य काकाजी ! आपण त्या सत्यधर्माचार्य भगवान् श्रीसमर्थांचे प्रमुख महंत आहां ! तेव्हां पातशहांस या सत्यधर्मा कडे आपण वळविलें यांत काय नवल ? मी व मला साह्य करणारे हे सर्व हिंदु मुसुलमान भाई सत्याचे नोकर आहों ! आम्हांला हा सत्य धर्माचा उपदेश, काकाजी ! आपले गुरुबंधू महात्मा श्री प्राणनाथ प्रभूजी यांनीं केला व तो आमच्या हातून प्रत्यक्ष आचारांत आणण्याची कामगिरी आपले पुतणे भाऊसाहेब यांनीं केली !! जिकडे सत्य तिकडे आम्हीं सर्व ! " सत्य तोची धर्म " असें तुमच्या तुकारामबोवांचें म्हणणें आहे. जोंपर्यंत पातशाही सत्यधर्मानें चालली होती, तोंपर्यंत आम्हीं तिची खिदमत केली; पण तिनें जेव्हां दीनेइलाहीकडे पाट फिरविली व सत्यावर अत्याचार सुरू केलें, तेव्हां आम्ही सत्यधर्मावतार महाराज पिताजी छत्रसाल यांच्या निशाणा खालीं जमलों ! शहांचे डोळे उघडले ! त्यांनीं दीनेइलाहीनें चालण्याचें मान्य केलें ! आतां आमचा कांहीं तंटा राहिला नाहीं ! आमचा झगडा, केवळ अत्याचारी साम्राज्य बदलून त्याच्या ऐवजीं तेथें फकीरशाही, रामराज्य स्थापन व्हावें, एवढ्यासाठीं च होता ! तसें च त्यांत धर्माचा किंवा जातीचा हि संबंध बिलकूल नव्हता !

**काकाजी**—— नूरखान ! हमीदखान ! पातशहांनीं तुमचा हि गौरव केला आहे ! नूरखान ! तुमची जहागीर तुम्हांस पूर्णपणें बहाल केली आहे. बेटा

हमीद ! तुझी जहागीर, पिताजींनीं दिलेली आहे; म्हणून शहांनीं पातशाही राज्यांतील कडा परगण्यांतली पांच गांवें तुला वंशपरंपरा इनाम दिलीं आहेत !

**महंमद**— नूरखान ! मी आपला फार अपराधी आहें; मला क्षमा करा !

**नूर**— आपलें मन पाक झालें ! आपण खुदा–इ–खिदमतगार झालां ! माझे गुरुबंधु झाला ! आतां क्षमा कसली करावयाची ? आपल्या या सत्य-धर्मांत व्यक्तीद्वेष नसतो तर व्यक्ती मधील दुर्गुणांचा तिटकारा असतो.

**म**—खरें आहे ! मी तर आतां वृद्ध झालों ! माझ्या आयुष्याला पूज्य काकाजींनीं निराळें वळण लावलें. खरोखर च त्यांनीं मला पुनर्जन्म दिला ! मला आतां या देशांत थारा नाहीं, मी माझ्या साऱ्या कुटुंबासह मक्केशरीफला हाज करण्यास निघणार आहें !

**का**— बेटा, महंमद ! तुला हाजला जाण्यास अजून अवकाश आहे ! तुझी पूर्ण परीक्षा पहावयाची होती म्हणून मी आतां पर्यंत बोललों नाहीं ! तूं परीक्षेंत पूर्ण उतरलास ! आतां तुला सांगतों ! तुझी प्रयागची सुभेदारी ( कमरुद्दीनाकडे बोट दाखवून ) या पूर्वीच्या कमरुद्दीन सुभेदाराकडे दिली हें खरें, पण तुला माझ्या सांगण्या वरून पातशहानें मुर्शिदाबादची नवीन सुभेदारी दिली असून, फर्रुकाबादची नबाबी हि दिली आहे ! तेव्हां हाजला सध्यां जाण्याची जरूरी नाहीं !

हें ऐकून महंमदाचें अंतःकरण भरून आलें ! त्यानें उठून पुढें होऊन काकाजींचे चरण घट्ट धरले व आपल्या अंतःकरणांतील गंगा यमुनेच्या पवित्र जलानें त्यांना स्नान घालून प्रयाग बनविलें !

**गुरु**—भाईयों ! एक महजबसें चलों ! परवरदिगार तुम्हारा पालनहार हैं ! दुनियेके ख्वाब ( स्वप्न )में मत फसों ! सबकों एक दफे मरना है, अमर कोई नहीं ! सुनो—

**"वह शख्स थे जो सात विलायतके बादशाह । हश्मतमें जिनकी अर्शसे ऊंची थी बारगाह ॥ मरते हि उनके तन हुवे गलीयोंकी खाके राह । अब उनके हालकी भी यही बात है गवाह ॥"**

यह ध्यान में रक्खों. आखीर तक फकीर रहों ! जुलूम के साथी न बनों. जहां जुलूम होता होगा वहां उसको बरबाद करनेके लिये दौडते जाओं और उस वख्त धर्म और जात का भेद मनमें मत लाओं !

**भाऊ**— गुरुदेवांचा उपदेश खरा आहे ! श्रीछत्रपतींनीं, श्रीमंतांना जे तातडीनें, पिताजींना सहाय्य करण्यास पाठविलें त्याचें हि कारण हें च आहे ! अस्तु. अखेर सर्व उत्तम, क्षेमकारक झालें ! ही सर्व गुरुदेवांची, वडिलांची कृपा आणि पिताजींच्या तपाचा प्रभाव !

**पि** — श्रीमंत रावसाहेब ! भाऊसाहेब ! आपण माझ्या तपाचा पुन्ह पुन्हां उच्चार करूं नका ! तुम्ही सर्वजण—विशेषत: बेटा, भाऊ ! तूं—होतां म्हणून हा **गजेन्द्रमोक्ष** झाला ! श्रीमंत ! तुम्हीं जर आला नसतां, तसें च अवधूतसिंह ! तुम्ही हि आला नसतां, तर गजेन्द्रमोक्ष च झाला असता; पण तो निराळ्या अर्थानें ! रींवा नरेश ! आपल्या अधिपत्या खालीं आलेल्या सर्व हिंदुमुसुलमान भाईचा मी कधीं च उतराई होणार नाहीं ! नूरखान ! तुम्ही मला भावा सारखे आहां ! बेटा, हमीद ! तूं तर माझा हिरदेसा आहेस ! तुमच्या दोघां मुळें येथे जमलेले बरेंचसे मुसुलमान बंधु माझ्या मदतीस आले. तुम्हीं जातीच्या खोटया अभिमानास बळी न पडतां जुलमानें गांजलेल्या मला सोडविण्यास धांवून आलां ! हा तुम्हां सर्वांचा माझे वर व माझ्या घराण्या वर उपकार आहे ! माझ्या शक्ती प्रमाणें आपणां सर्वांना खिलती देण्यांत येतील. आपणां सर्वांनीं घेतलेल्या श्रमांच्या मानानें त्या अगदीं कमी प्रतीच्या ठरतील पण श्रीगुरुदेवांच्या कृपेनें आज येथें जी फकीरशाही स्थापन झाली तिचा हा प्रसाद आहे, तिची ही शेरणी आहे, असें समजून कृपेनें त्यांचा स्वीकार करा ! हिरदेसा ! आतां पर्यंत झालेल्या या आजादीच्या निरनिराळ्या जंगांत आमच्या फौजेंतील जीं जीं माणसें कामास आलीं व जखमी झालीं त्यांच्या याद्या तयार आहेत काय ?

**हि** — ( उठून ) आज्ञा, पिताजी !

**पि** — ठीक ! उदईक पुन्हां दरबार भरेल ! त्यांत हा खिलतींचा समारंभ उरकून घेऊं ! ( श्रीमंतां कडे वळून ) श्रीमंत रावसाहेब ! माझी इच्छा आहे कीं, हा समारंभ आपल्या हातून व्हावा ! आपण माझ्या विनंतीचा अव्हेर करूं नये !

**श्री** — महाराजांच्या आज्ञे बाहेर मी नाहीं !

**गुरु** — हें ऐकून मला आनंद झाला.

**भूषण** — श्रीमंत पेशवे साहेब ! महाराजांच्या म्हणण्या प्रमाणें आपण

**गजेन्द्रमोक्ष** केल्या मुळें हा समारंभ करण्याचा अधिकार आपला च आहे ! श्रीमंत पेशवासाहेब ! आपकी प्रशंसा मैं क्या करूं ?

**" बाजे बाजे राजे से निवाजे हैं नजरि करि । बाजे बाजे राजे काढि काटे असिलत्तासों । बांके बांके सूबा नालबंदी दै सलाह करैं । बांके बांके सूबा करे एक एक लत्तासों । गाढे गाढे गढपति काढे राम द्वार दै दै । गाढे गाढे गढपति आने तरे कत्तासों । बाजीराव गाजीने उबऱ्यो आइ छत्रसाल । आमिल बिठायो बल करि कैं चकत्तासों ॥ "**

पिताजींनीं भालदारास खूण केली. भालदार ललकारला, " जय, जय-रघुवीर समर्थ ! दरबार बरखास्त! निगाह् रक्खो महाराज ! "

---

# हृदय - परीक्षा !  [ पाकळी नववी ]

" स्वातंत्र्य, न्यांय आणि शांतता हें आमचें ध्येय ! साम्राज्यवादी आम्ही नव्हों ! "  — पातशहा महंमदशहा

दुसऱ्या दिवशीं मोठी राजसभा पुन्हां भरली; ठरल्या प्रमाणें श्रीमंतांनीं पिताजी कडील व पातशहा कडील खिलती, बक्षिसें ज्या ज्या लोकांना द्यावयाचीं होतीं त्यांना दिलीं. राजे–ठाकूर–नबाब–श्रेष्ठी इत्यादि जमलेल्या व्यक्तींनीं हि पिताजींना नजराणे केले. सर्वत्र आनंदाच्या उत्साहांत राजसभा बरखास्त झाली.

सायंकाळची वेळ होती. राजवाड्याच्या मागें अशोकवाटिका होती; वाटिकेंत एक मोठें मंदीर होतें. मंदिरांत महाकालाची मूर्ति होती; तसें च श्रीसमर्थांनीं प्राणनाथ प्रभूंना आशीर्वादयुक्त दिलेल्या पट्टाधिष्ठित श्रीराम-पंचायतनाच्या प्रसाद मूर्ती हि होत्या. या सर्वांची पूजा, पिताजी नित्य नियमानें करीत असत ! देवळा समोर एक प्रचंड पुष्करणी होती. तिच्या शेजारीं दोलागृह होतें. संगमरमरी चौथऱ्या वर चारीं बाजूस त्या च पाषाणाच्या चार चार कमानींच्या चार भिंती असून त्यां वर आरसपानी सौध व मेघ-

डंबरी होती चौथऱ्या वर आरसपानी चार खांब होते व त्यां वरील आडव्या पितळी लाटांना एक चांदीचा झोंपाळा टांगला होता.

झोंपाळ्या वर ताईसाहेब बसल्या होत्या व त्यांना, त्यांच्या दोन्हीं बाजूंस उभे राहून, रतन व आयेषा झोंका देत होत्या ! त्यांनीं आपल्या हौसे प्रमाणें ताई-साहेबांना, त्या "नको नको" म्हणत असतां हि अलंकारांनीं व पुष्पांनीं सजविल्या होत्या ! झोंका देतां देतां आयेषा गाऊं लागली—

( राग मल्हार )

**"झुलो मेरी राधा प्यारी रंगीलो हिंडोरना ॥ धृ० ॥ डांडी चार सुदेस बनायी, हीरा खम्मन झुम्मक लाई । जगमग जगमग होय, रवि शशि डोरना ॥ १ ॥ उमडी घटा घुमर घिर आई, रिमझिम रिमझिम बूंद सुहाई । दमक दमक दामिनिया बोल मोरना ॥ २ ॥ गावत राग मल्हार अघाई, शीतल मंद सुगंध सुहाई । तान तरंगन ललित भान तृण तोरना ॥ ३ ॥"**

गाणें चालू असतां श्रीमंत व भाऊसाहेब बागेंत देवदर्शनास आले ! दर्शन घेऊन फिरावयास निघाले.

भा— ( स्वगत ) पिताजींनीं सोंपविलेली कामगिरी केली पाहिजे ! माझें मन मला सांगतें कीं काम फत्ते होणार. यांची व कामाची मैत्रि पूर्वी च झाली आहे ! हे ती उघड करून दाखवीत नाहींत एवढें च ! तथापि आज त्याचा पुरता छडा लावला पाहिजे !

श्री— भाऊसाहेब कसला विचार चालला आहे ?

भाऊसाहेब चालत चालत दोलागृहा कडे येत होते; त्यांच्या मागून श्रीमंत होते. हळू हळू गाण्याचे स्वर त्यांच्या कानां वर येऊं लागले !

भा— कशाचा नाहीं ! कोठून तरी गाण्याचे स्वर ऐकूं आले; तिकडे लक्ष लागलें होतें.

श्री— होय ! ऐकू येतें खरें गाणें. ( ऐकून ) चांगलें आहे. पण आवाज स्त्रीचा दिसतो. आपण येथून च ऐकूं. समोर जाणें गैररहा दिसतें.

भा— तें खरें आहे !

इतक्यांत गाणें थांबलें.

भा— गाणें थांबलें. आपण आतां दुसऱ्या दिशेस फिरावयास जाऊं.

भाऊसाहेबांनीं मुद्दाम उलट दिशा धरली; फिरत फिरत अर्ध्या घटकेनें ते एका कुंजांत आले. तेथील एका शिळेच्या मोठ्या चौरंगा वर दोघे बसले. समोर दोलागृह दिसत होतें; मात्र त्या गृहांतील व्यक्तींना ही मंडळी स्पष्टपणें दिसत नव्हती. यांना मात्र तेथल्या व्यक्ती चांगल्या दिसत, एवढें च नव्हे तर त्यांचें संभाषण हि ऐकूं येई ! प्रथम संभाषणांतील जे शब्द कानीं आले, ते रतनचे होते.

र— ताईसाहेब ! आज मोठा आनंदाचा दिवस आहे ! आज सकाळीं दरबारांत श्रीमंतांनीं, महाराजांच्या इच्छेप्रमाणें बक्षिसांचा व खिलतींचा समारंभ पार पाडला ! पिताजी सिंहासना वर बसले होते ! त्यांनीं श्रीमंतांना आपल्या जवळ अर्ध्या आसना वर बसण्यास सांगितलें, परंतु त्यांनीं विनयानें नाकारलें ! तथापि पिताजींचा फार च आग्रह पाहून सिंहासनाच्या सर्वांत वरच्या पायरी वर बसून त्यांनीं समारंभ उरकला !

आयेषा— अग पण रतन ! हें तूं ताईसाहेबांना काय सांगतेस ? त्या तर राणीवशाच्या वरच्या जागेंत बसून चिका आडून सर्व पहात होत्या !

र— तसें नव्हे आयेषा ! तें मला का माहीत नाहीं ? आपण दोघी हि त्यांच्या जवळ होतों, पण, त्या समारंभाची मला राहून राहून आठवण येते त्याचें कारण निराळें च आहे !

कुंजांत श्रीमंत, भाऊसाहेबांना म्हणाले—

श्री— भाऊ ! या मैत्रणींचें हें आपसांतील बोलणें असें चोरून ऐकणें चांगलें नाहीं !

भा— रावसाहेब ! आपण कांहीं येथें त्यांचें भाषण चोरून ऐकण्या साठीं मुद्दाम आलों नाहीं ! सहजासहजीं आलों ! सहजासहजीं त्यांचें बोलणें कानां वर आलें – येतें ! त्यांत आपला दोष नाहीं ! दोष वाटल्यास तिकडे कान न करतां सहजासहजीं दुसरी कडे लक्ष देऊन तो टाळतां येईल !

श्री— बरें तर !

भाऊसाहेबांनीं सहजासहजीं ( ? ) कुंजांतील मालतीच्या वेलीची फांदी हळूं हळूं हालविली ! दोलागृहांतील रतनचें लक्ष तिकडे गेलें ! भाऊसाहेबांनीं कांहीं खूण केली व तिनें हि उलट खूण केली !

ताई— ( उत्कंठतेनें ) काय ग तें रतन ?

र— आयेषा ! बघ ! एका माणसाला तें ऐकण्याची किती उत्कंठा लागली आहे !.... होय ... पण ... मी इतक्यांत विसरलें ... काय बरें सांगणार होतें ? ... असें होतें बाई ! ... मी फार विसराळु आहे बघ ... ( आयेषे कडे पाहून खूण करते; ती हंसते )

ता— आठव आठव ! ... काय आठवत नाहीं ? ... थांब ! तूं वात्रट-पणा करतेस नाहीं का ? तुझ्या पाठींत एक चपराक देतें म्हणजे आठवेल... खालीं काय बघतेस ? ... माझ्या तोंडा कडे पहा ... कां देऊं चापटी ?

र— ( ताईसाहेबां कडे पाहते ) नको, नको ! आठवलें ! ताईसाहेब ! तुमच्या तोंडा कडे पाहतां च आठवलें ! अग, आयेषा ! श्रीमंत, बक्षिसें वांटीत होते तें तूं पाहिलेंस ना ?

आ— हो ! पण पुन्हां ती च ती च गोष्ट काय सांगतेस ? वेडीबेडी झालीस कीं काय ?

र— अग खुळे ! मी कशाला वेडी होऊं ? ताईसाहेबांच्या तोंडा कडे पाहून ( त्यांच्या तोंडा कडे पहाते ) वेड लागण्यास मी काय पुरुष आहें ? ते वेडे दुसरे च आहेत ! हातानें काम करावयाचें एक व दृष्टी लावावयाची दुसरी कडे, असे हे वेडे असतात हो !

हें ऐकून इकडे श्रीमंत दचकले ! त्यांनीं हळूं च भाऊसाहेबां कडे पाहिलें ! परंतु त्यांचें लक्ष दुसरी कडे होतें !

आ— हें बघ रतन ! हें वेड घेऊन पेडगांवाला जावयाचें बोलणें मला समजत नाहीं. स्पष्ट बोल ना ?

र— अग बाई ! आजचा काळ स्पष्ट बोलण्याचा नाहीं ! स्पष्ट बोलणा-ऱ्याला शिक्षा होण्याचा हा काळ आहे !... बरें तर सांगतें हो ! पण मग, कोणीं रागावलें बिगावलें तर माझ्या कानीं सात बाळ्या बरें कां ?

आ— बरें, बरें ! सात कां ? दर महिन्याची एक एक मिळून बारा बाळ्या, लग्नाच्या पहिल्या वर्षांत तुझ्या कानांत मानसिंहजी चढवितील ना ?

ता— आतां कशी एका माणसाची फजिती झाली ?

र— माझी कसली फजिती ? बारा बाळ्यां वर कां मी संतुष्ट होणार ? चांगली पुणें–सातारा घाटाचीं मोत्यांचीं कुडीं मागून घेईन ! सोडीन कीं काय त्यांना ?

आ-- त्यांना सोड कीं सोडूं नकोस, पण मघाची गोष्ट मध्यें च सोडलीस ना?

र-- अग हो! वेड्यांच्या गोष्टी सांगतांना सांगणारा हि वेडा बनतो कीं काय? अग! श्रीमंतांचे हात बक्षिसें वांटत असतांना त्यांचे डोळे कोठें लागले होते, तें तूं पाहिलेस काय?

इकडे श्रीमंत पुनः दचकले; पुनः त्यांनीं भाऊसाहेबां कडे पाहिलें! पण ते आपले दूरच्या झाडावर बसलेल्या एका कोकिळे कडे पहात होते!

आ -- नाहीं बाई! पण हा तुझा खुळचट प्रश्न आहे. बक्षिसें घेणाऱ्या कडे च त्यांची दृष्टी असणार!

र-- ( जोरानें ) नामंजूर! नामंजूर!

आ-- मग कोठें होती त्यांची दृष्टी?

र-- ( ताईसाहेबांच्या तोंडा कडे बोट करून ) या मुखचंद्रा कडे, समजलीस?

हें ऐकून ताईसाहेब मनांतल्या मनांत फार आनंदल्या! श्रीमंत मात्र मोठ्यानें दचकले. त्या मुळें भाऊसाहेबांचें लक्ष त्यांच्या कडे वळलें!

भा-- काय, रावसाहेब! काय झालें? एकाद्या मधुमक्षिकेनें दंश केला कीं काय?

श्री - नाहीं, नाहीं तसें कांहीं नाहीं!

आ-- कशा वरून ग?

र-- आयेषे! तूं भोळी आहेस! या राजकारणांतली सूक्ष्म दृष्टी तुला नाहीं बघ! अग! माझें सारें लक्ष्य श्रीमंतांच्या डोळ्यां कडे च होतें म्हणून मला हें उमगलें! आतां तुला एक जम्मत सांगतें! त्या वेळीं एक शिपाई आपलें बक्षीस घेण्यास आला. श्रीमंतांनीं त्याचें बक्षीस त्याला दिलें! पण गंमत काय झाली ठाऊक आहे? तो बिचारा यांना कुर्निसात करीत होता! यांना वाटलें, त्यानें आपल्या दुपट्ट्याचा पदर पुढें केला...

आ-- मग?

र-- मग? मग काय वेडे! यांनीं त्याचें बक्षीस त्याला दिलें; अर्थात् तें पडलें जमिनीवरच्या गालिच्या वर! मग श्रीमंत आले भाना वर व खजील होऊन इकडे तिकडे पाहूं लागले! पण त्या वेळीं आपल्या बिहारी

लालांचें गाणें चाललें होतें, त्या मुळें कोणाचें लक्ष या प्रसंगा कडे गेलें नाहीं आणि श्रीमंतांची अब्रु बचावली ! !

ता— ( रागानें ) कोणाची ग, अब्रु काढतेस ? लुब्रे ! शिक्षा करीन बरें कां ?

रतनचें बोलणें ऐकून श्रीमंत खजील झाले, पण ताईसाहेबांचें वाक्य ऐकून त्यांचे तोंडा वर आनंद झळकूं लागला ! भाऊसाहेब दुसरी कडे पहात होते, ते एकदम श्रीमंतां कडे पाहून म्हणाले—

भा— राऊ ! चला, आपण दुसरी कडे जाऊं ! बागेंतील दुसरीं ठिकाणें अजून पहावयाचीं आहेत ! येथें आतां थांबण्यांत अर्थ नाहीं ! शिवाय त्या मैत्रिणींच्या आपसांतील गोष्टी ऐकणें चांगलें नाहीं ! माझें लक्ष तिकडे नाहीं हें खरें पण आपलें——

श्री—- भाऊ ! माझें हि नाहीं हो ! त्या पुष्करणींतील त्या एका अर्धोन्मिलित कमलिनी कडे मी पहातों आहें ! थांबा ना जरा !

भा—- तुमची मर्जी ! पण सारखी टक लावूं नका हं ! एखादा भृंग चालून येईल !

र—- बाई ! बाई ! वझीर-इ-आजमच्या हातांत, पिताजींनीं ( ताईसाहेबांचा हात धरून ) हा हात देण्याच्या आधीं च शिक्षा देण्याचा अधिकार आला वाटतें ! आयेषे ! पाहिलेंस बाई ! मीं म्हटलें नव्हतें कीं, स्पष्ट बोलण्याचा हा काळ नाहीं म्हणून ! तरी बरें कीं, अजून मी मुद्याची गोष्ट सांगितली च नाहीं ! ती सांगितली तर, ताईसाहेब माझी मान फासांत अडकावतील कीं काय, कोणास ठाऊक ? पण, मी त्यांना सांगत च नाहीं ! तुला च सांगतें हो आयेषा ! ऐक. श्रीमंतांची नजर जशी ताईसाहेबांच्या मुखचंद्रा कडे लागली होती ना, तसा एका माणसाचा – नव्हे एका स्त्रीचा-म्हणजे ( ताईसाहेबां कडे बोट करून ) हं...हं... नयनभृंग श्रीमंतांच्या मुखकमला वर एक सारखा झेंपा टाकीत होता ! तो सबंध दरबार आटपे पर्यंत एका माणसाची शुद्धबुद्ध पार नाहींशी झाली होती ।

ता— ( रागानें ) चल चहाटळ मेली ! गप बसतेस कीं नाहीं ? कां फोडूं तुझें तोंड ?

भा— राऊ ! उठा आतां !

श्री— भाऊ! खरें च माझें लक्ष त्या मैत्रीणींच्या भाषणा कडे नाहीं! मीं सहजासहजीं दुसरी कडे लक्ष लावलें आहे ना? ती अर्धोन्मिलित कमलिनी आहे ना? ती सायंकाळीं उमलणाऱ्या जातीची आहे! ती हळूं हळूं उमलते आहे! तिच्या जवळ एक भृंग गुंजारव करतो आहे! तिकडे मी पहात आहें!

भा— मग कांहीं हरकत नाहीं! पण तिकडे पहातां पहातां तुम्ही हि भृंगस्वरूपी व्हाल बरें! अतिशय ध्यास लागला कीं काया पालटते! ग्रंथ-राजांत सांगितलें आहे कीं, भृंगाचा सतत ध्यास घेतल्यानें मूळचा कीटक पुढें साक्षात् भृंग बनतो! संभाळा! (हंसतात)

श्री— (गडबडीनें) नाहीं, नाहीं, तसें कांहीं नाहीं!

श्रीमंतांना शंका आली कीं, भाऊसाहेबांचें लक्ष आपल्या हालचालीं कडे आहे!

र— म्हणजे माझें तोंड फोडणार कां फांशी देणार?

ता— तीं दोन्हीं कामें मानसिंहाला च करावयास सांगतें; थांब! तुझी जीभ फार चुरचूर करते नाहीं का? खरें ना ग, आयेषा?

र— ती काय उत्तर देणार? आतां च नाहीं का मीं सांगितलें कीं, तिला हें राजकारण चांगलेसें समजत नाहीं! आयेषे! तूं बाई असें कर! ताईसाहेबांना काय उत्तर द्यावयाचें तें सरदार हमीदखानास विचारून ये!

आ— का? तुझ्या तोफेचा मारा आतां माझ्या कडे वळला वाटतें?

र— मला चौफेर मारा करतां येतो बरें कां?...बरें आतां राहूं दे तें! ताईसाहेब! खरोखर आजचा दिवस किती आनंदाचा आहे? गेल्या आठ नऊ वर्षांत या महंमद बंगषाच्या रूपानें दिल्लीच्या अत्याचारी साम्राज्य-शाहीनें आम्हांस छळलें! गेल्या वर्षीं तर हा छळ कडेलोटास गेला! पण या प्राणसंकटांतून आयत्या वेळीं श्रीमंत सरकारांनीं आम्हांस सोडविलें! ही त्या महाकाळाची कृपा नव्हे का?

ता— (आनंदून) खरोखर च त्याची कृपा! जर येणें झालें नसतें (लाजून)...तर आमची सर्वांची काय दशा झाली असती? हा गजेन्द्रमोक्ष झाला!

श्रीमंतांच्या तोंडा वर अधिक आनंद झळकूं लागला!

**आ**-- ताईसाहेब ! खुदा, हक्काचा-सत्यांचा-वाली आहे ! भक्तांच्या संकटकालीं धांवून येऊन तो रक्षण करतो ! त्या मेल्या काईमनें माझ्या वर गहजब केला तेव्हां भाऊसाहेबांच्या रूपानें अल्लानें माझा बचाव केला ! तसा च हा प्रकार झाला ! श्रीमंत सरकारांच्या रूपानें अल्लानें आमचा सर्वांचा बचाव केला ! नाहीं ग रतन ?

**श्री**-- भाऊ ! आयेषेच्या बचावाचा हा काय प्रकार आहे ?

**भा**-- म्हणजे ? तुमचें लक्ष त्या मैत्रीणींच्या भाषणा कडे आहे वाटतें ?

**श्री**-- ( गोंधळून ) तसें कांहीं नाहीं ! पण...पण, आतां तुमच्या जवळ कशाला लपवूं ? होय ! माझें सारें लक्ष तिकडे च आहे !

**भा**-- मग येथें किती वेळ बसावयाची शिक्षा आम्हांला फर्मावणार ?

**श्री**-- तुमचा, माझी थट्टा करण्याचा हक्क च आहे ! पण आयेषेची ती गोष्ट कोणती ?

**भा**-- कांहीं विशेष नाहीं ! ती कमलिनी पूर्ण उमलली तिकडे पहा !

**र**-- होय आयेषा ! श्रीमहाकाल च, श्रीमंत सरकार व भाऊसाहेबसरकार या दोघांच्या रूपानें या कालांत अवतरला आहे ! दोघांची जोडी म्हणजे श्रीराम-लक्ष्मणांची जोडी आहे बघ ! दोघांत फरक नाहीं. तुला जसें भाऊ-साहेब सरकारांनीं संकटांतून सोडविलें, तसें च मागें ताईसाहेबांना हि त्यांनीं एका ऐन संकटांतून सोडविलें !

**श्री**-- भाऊ ! आणखी काय हा प्रसंग आहे ?

**भा**-- कांहीं विशेष नाहीं ! तुमच्या त्या कमलिनीस तो भुंगा त्रास देत आहे पहा ! तिला सोडवा जा !

**श्री**-- नाहीं कसा ? सांगा....सांगा...नाहीं !... खरें च मी विसरलों ! तुमच्या तोंडांतून स्वपराक्रमवर्णनाचा एक हि शब्द उच्चारला जावयाचा नाहीं, हें माझ्या लक्ष्यांत राहिलें नाहीं !

**आ**- रतन ! असें कोणतें संकट ताईसाहेबां वर आलें होतें ?

**र**- थोडक्यांत सांगतें.

श्रीमंत एकाग्रपणें ऐकूं लागले.

**र**- आम्हीं उज्जनीस अनुष्ठानास गेलों होतों. तुझ्या वर जशी काईमची वाईट दृष्टी होती तशी त्याची ताईसाहेबां वर हि होती--

श्रीमंतांनीं रागानें हुंकार काढला.

र– त्यानें आमच्या पाठी वर धरणें पाठविलें ! एके दिवशीं संध्याकाळीं क्षिप्रेंतून आम्हीं देवदर्शनास जात असतां, त्या धरणेवाल्यांनीं आमच्या वर छापा घातला––

श्री– ( मोठ्यानें ) दुष्ट !––

असें म्हणून त्यांनीं कमरबंदांतील कट्यार उपसण्या साठीं तिच्या मुठी वर हात ठेवला ! पण भाऊसाहेबांनीं आपला एक हात त्यांच्या तोंडा वर ठेवून दुसऱ्यानें त्यांचा कट्यारीच्या मुठी वरील हात दाबला !

र— पलीकडील तीरावर योगायोगानें भाऊसाहेब सरकार संध्या करीत होते, त्यांना हा प्रकार दिसतां च उघड्या अंगानें तोंडांत तरवार धरून पोहोत येऊन त्यांनीं त्या धरण्यांतील सर्वांशीं लढून त्यांना पकडलें व आमचा बचाव केला !

हे ऐकून श्रीमंतांनीं भाऊसाहेबांना आलिंगन दिलें !

श्री— शाबास ! भाऊ ! धन्य ! धन्य ! मी श्रीराम नाहीं पण तुम्हीं मात्र निग्रहानुग्रह करणारे व माझा पाठपुरावा करणारे लक्ष्मण आहां खरे ! आम्हीं तुमचे उतराई काय होणार ?

भा— भावांभावांमध्यें उतराईची कसली भाषा !

श्री— तें हि खरें च !

आ–– अगबाई ! मग मला गीतगोविंद शिकविणाऱ्या पंडितजींनीं **गजेन्द्रमोक्षाची** एक कथा सांगितली होती, तसा च तो प्रसंग झाला म्हणावयाचा ?

ता–– ( आनंदानें ) होय, तसा च ! मागें माझे बंधु भाऊसाहेब यांनीं तो तसला **गजेन्द्रमोक्ष** केला ... आणि परवांचा **गजेन्द्रमोक्ष**, तिकडे ... ( लाजतात )

पुढील शब्द ऐकण्यास श्रीमंतांना उत्कंठा लागली––

र–– ताईसाहेब ! अर्धवट बोलणें ठेवूं नये ! (भाऊसाहेबांच्या कुंजा कडे हळूं च पाहून ) ... एकादें माणूस ऐकत असल्यास असल्या अर्धवट बोलण्यानें त्याचा विरस नाहीं का होणार ?

श्रीमंत दचकले ! त्यांनीं भाऊसाहेबां कडे पाहिलें ! त्यांनीं स्मित केलें !

र-- हं ! पुढें बोला ! उखाणा पुरा करा ना ?

ता— उखाणा कशाचा ? रतन ! आयेषे ! आज पर्यंत तुमच्या पासून मीं कांहीं च चोरून ठेविलें नाहीं ! तुम्हां दोघींना माझा हृदयस्थ देव माहीत आहे ! ( हर्षानें ) त्या देवानें, त्या हृदयस्थ श्रीमंत महाविष्णूनें आतांचा हा असला **गजेन्द्रमोक्ष** केला ! !

श्री-- अहाहा ! बहारीची उपमा !

भा-- राव ! कोणत्या गजेन्द्रमोक्षाची ? गत का विद्यमान ?

श्रीमंत खजील झाले !

इतक्यांत बाजूच्या दुसऱ्या एका कुंजांत छत्रसाल महाराज, मानसिंह व हमीदखान उभे राहिलेले भाऊसाहेबांनीं पाहिले ! भाऊसाहेबांनीं खुणावल्या वरून ती मंडळी थांबली !

ता— आयेषा ! ऐकलेंस ? रतन !–

( राग बिहाग )

**दीन भयो गजराज, हीन भयो बलहूंते । टूट गयो मान, टेऱ्यो " हरी ! हरी ! " करके ॥ ध्रु० ॥ आधी रात धाये नाथ, चक्र सुदर्शन लिये हाथ । तोड दिये तंदुवा जरी जरी करके ॥ १ ॥ तुलसीदास त्रिलोकीनाथ, भक्तनके सदा साथ । गरुड छोड धाये नाथ, " करी ! करी ! " करके ॥ २ ॥**

ताईसाहेबांचें तें गंधर्वगायन ऐकून श्रीमंत आनंदानें डुलूं लागले ! भाऊसाहेबांनीं, पिताजींना खूण केली. श्रीमंतांची ती आनंदसमाधि पाहून पिताजींना परम समाधान वाटून त्यांचे डोळ्यांत आनंदाश्रु चमकले ! ते मानसिंह व हमीद सह हळूं हळूं श्रीमंतांच्या कुंजा कडे येऊं लागले. भाऊसाहेबांनीं, श्रीमंतांना हलवून पिताजी येत असल्याचें कळविलें; श्रीमंत व भाऊसाहेब उठून त्यांना सामोरे गेले !

पि--भाऊ ! रावसाहेबांना अशोकवाटिका दाखविली ?

भा— होय. पिताजी ! फक्त दोलागृह दाखवावयाचें राहिलें ! तेथें ताई आपल्या मैत्रिणीं सह असल्यानें--

पि-- ( भाऊसाहेबांना खुणावून ) मग ? त्याला काय हरकत आहे ? घरच्या माणसांना कसला संकोच ? चला !

सर्वांना घेऊन पिताजी दोलागृहाकडे आले. त्यांना पाहून ताईसाहेब झोंपाळ्या वरून खालीं उतरल्या! मंडळी चौथऱ्या वर आली. श्रीमंतांना पाहून ताईसाहेब लाजल्या व पिताजींच्या मागें उभ्या राहिल्या. आयेषा व रतन यांनीं पिताजींना वंदन केलें व त्या ही एका बाजूस उभ्या राहिल्या!

**पि**-- बेटियां! तुमच्या ऐन रंगांत येऊन आम्हीं विरस तर केला नाहीं?

**आ**— ( खालीं पहात ) नाहीं पिताजी! उलट आनंदाचा उत्कट रस निर्माण झाला!

**र**— ( ताईसाहेब व श्रीमंतां कडे पहात ) आयेषेला समजत नाहीं, सरकार! निदान दोघांच्या तरी तोंडावर विरस झळकतो आहे!

**ता**— ( खोट्या रागानें ) पिताजी! या चोंबडीचें तोंड बंद करा! नाहीं तर मीं तिला अशी शिक्षा करीन कीं--

श्रीमंतांनीं स्मित केलें!

**पि** — बेटा! तिच्या बोलण्याचा राग मानूं नकोस! तूं तिला शिक्षा कोण करणार? तिला शिक्षा करणारा कोण आहे, तो ( मानसिंहा कडे पाहून ) मला भाऊनें सांगितला आहे! खरें ना रे, मानसिंह?

मानसिंहानें मान खालीं घातली!

**ता** — बरें, झालें! ( रतन कडे पाहून ) फार तोंड सुटलें होतें.

रतन खालीं पाहूं लागली!

**पि**— आयेषा! बेटी! हमीद आल्यानें आनंदाचा उत्कट रस निर्माण झाला होय?

पिताजींनीं आयेषा–हमीदकडे पाहिलें! दोघे अधोमुख झाले!

**पि**— भाऊ! तुझा विद्यार्थी काय म्हणतो?

श्रीमंत गोंधळून भाऊसाहेबां कडे पाहूं लागले!

**भा**— पिताजी! माझा विद्यार्थी परिक्षेंत पूर्ण उतरला! तो उतरणार अशी माझी फारां दिवसां पासून खात्री च होती!

श्रीमंत जास्त गोंधळले!

**भा**-- बागेंत येतांना माझ्या बरोबर तेवढा च एक विद्यार्थी होता! येथें आल्या नंतर ( आयेषा, रतन, हमीद, मानसिंह यांच्या कडे पहात पहात ) आणखी चार विद्यार्थी माझ्या पुढें परिक्षा देण्यास आले! श्री कृपेनें ते

चारी हि ( श्रीमंतां कडे पाहून ) या पहिल्या प्रमाणें परीक्षेत उत्तीर्ण झाले ! !

**पि**— बाळांनों ! या परिक्षेची काय भानगड आहे, तें मीं सांगण्या पूर्वी च तुम्हीं सर्वांनीं ती मनांतल्या मनांत ताडली आहे ! आयेषा ! रतन ! ताई व रावसाहेब यांना अजून शिरपाव ( मोठें बक्षीस, नजराणा. मूळ अर्थ मस्तकाभरण ) द्यावयाचा आहे, त्या वेळीं तुम्हां दोघांचा हि बक्षिससमारंभ उरकून टाकूं ! ! भाऊ ! आजचा दिवस फार आनंदाचा गेला ! हा दिवस उगवेल अशी मला आशा नव्हती ! बेटा ! भाऊ ! या सर्व आनंदाचें आदिकारण तूं आहेस ! सदाशिवरावांच्या पोटीं जन्मून तूं त्यांना धन्य केलेंस ! तुला पाहून, आज मला असा भास होत आहे कीं, तो माझा परम मित्र, माझा पाठचा बंधू च माझ्या पुढें उभा आहे !

पिताजींनीं गहिंवरून भाऊसाहेबांना पोटाशीं धरलें ! त्या दोघांच्या च नव्हे तर सर्वांच्या डोळयांत आनंदाश्रु चमकले !

**भा**— पिताजी ! मी आपला बालक ! आपण साक्षात् तीर्थरूपांच्या ठिकाणीं आहां ! या सर्वांस कारण आपली कर्तव्यकठोर तपस्या ! श्रीशिव-प्रभूंच्या पुत्राला—पिताजी ! आपल्यांला—श्रीसमर्थांचा श्रीरघुपती कसा विसरेल ?

इतक्यांत काकाजी गुरुदेवां सह तेथें आले !

का— सच है ! बेटा, भाऊ ! तेरा कहना बिलकूल सच्च है !

( राग जैजैवंति )

**" प्रीतिकी रीति रघुनाथ जाने । जात-कुल-बरणको नाहिं माने ॥ ध्रृ० ॥ प्रीति प्रहलादकी जान करुणानिधि । खंभसों प्रगट नख उदर भाने ॥ १ ॥ दौड गजराजके फंदको काटने । गरुडको छोड आप उलाने ॥ २ ॥ दास कान्हर यही रीति रघुनाथकी । आपसे भक्तको सरस माने ॥ ३ ॥ "**

**गुरु**— **जय गजराज** ! या परवलीच्या सांकेतिक शब्दाचें काम आज संपलें ! **जय गजराज** !

सर्वांनीं " **जय गजराज** " असा गजर केला ! गुरुदेवांनीं " **जय, जय रघुवीर समर्था** "चा घोष केला व सर्व मंडळी राजवाडयाकडे परतली !

दुसरा दिवस उजाडला. सायंकाळच्या वेळीं राजवाडयांतील शस्त्रागारांत

रतन बसली होती. तेथलें एक धनुष्य घेऊन, ती तें साफसूफ करीत होती, जवळ पांच बाण हि पडले होते! थोडया वेळानें तेथें मानसिंह आला.

मा— कां? कोठल्या शिकारीची तयारी चालली आहे? अहेरिया अजून लांब आहे!

र— या दिवसांत रोजचा च अहेरिया (राजपुतानी, दसऱ्याच्या वेळचा शिकारीचा शब्द) आहे! सध्यां सतत शिकारीच्या तयारींत राहिलें पाहिजे!

मा— पण त्या कामासाठीं पुरुष आहेत ना?

र— त्या पुरुषांच्या जोडीला स्त्रिया हि तयार पाहिजेत! आझादी मिळविण्याच्या काळीं स्त्री व पुरुष दोघांनीं हि मुख्यतः या च कामा कडे आपलें लक्ष्य ठेविलें पाहिजे!

मा— पण माझ्या पहाण्यांत अशीं कांहीं माणसें— सरदार घराण्यांतील स्त्री पुरुष— आहेत कीं, दिवसाच्या साठ घटकां पैकीं कामधंद्याच्या दहा बारा घटका सोडल्यास, बाकीचा सर्व काळ, हे लोक पूर्वीच्या कवींचीं शृंगारिक नाटकें किंवा कथांच्या पोथ्या वाचण्यांत, ललितें वगैरे पाहण्यांत आणि शृंगारिक चेष्टा करण्यांत घालवितात! आणि त्यांत हि गंमत अशी कीं, घरांत वडीलधारें कोणीं नसल्यास, या पन्नास हि घटका, या वर्गांतील पति व पत्नी एकत्र रमतगमत असतात! जणूं काय जगांत पतिपत्नींची जोडी यांची च निर्माण झाली आहे! असल्या मूर्खांवर तुझ्या उपदेशाचा काय परिणाम होणार! जों पर्यंत यांची चैन चाललेली असते, तों पर्यंत, बुंदेलखंड परतंत्र असला काय अगर स्वतंत्र झाला काय, त्याचें यांना काय होय? असो. ही तयारी कशा साठीं चालली आहे तें सांग ना?

र— (विषादानें) तें सांगण्यास मला व ऐकण्यास आपल्याला हि वाईट वाटेल!

मा— तसें असलें तरी सांग. त्या वर कांहीं उपाय निघाला तर पाहूं!

र— कालचा अशोकवाटिकेंतील प्रसंग आपल्यास माहीत च आहे. आज सकाळीं महाराज, गुरुदेव, काकाजी, दोघे राजकुमार, श्रीमंत सरकार व भाऊसाहेब सरकार हे एकत्र बसून पांच सहा घटका विचार करीत होते! त्या नंतर महाराजांनीं ताईसाहेबांना बोलावून आणलें. मी त्यावेळीं ताईसाहेबांना दिवाणखान्यांत पोंहचवून दाराबाहेर उभी राहिलें. महाराजांनीं ताईसाहेबांना सांगितलें

कीं, " सात आठ दिवसांनीं सातान्यास जावयाचें आहे, तयारी करा ! "
नंतर दिवाणजींना बोलावून आणलें व त्यांना येथल्या व्यवस्थे बद्दल आज्ञा केली. तिच्यांतील सारांश एवढा च कीं, महाराज, ताईसाहेबांना बरोबर घेऊन, श्रीमंत सरकारांच्या संगतीं, श्रीछत्रपती महाराजाच्या भेटी साठीं सातान्यास जाणार आहेत ! येथला बंदोबस्त महाराज कुमारांवर सोंपविला आहे ! मला सरकारांनीं आज्ञा केली कीं, "ताईसाहेबां बरोबर तुला जावें लागेल" म्हणून !

**मा**— मग ? त्यांत वाईट वांटण्या सारखें काय आहे ? थोड्या दिवसांनीं तुम्हीं सारी मंडळी परत याल !

**र**— नाहीं ! ताईसाहेबांना, श्रीमंत सरकारांना द्यावयाचें ठरत आहे— बहुतेक ठरलें आहे— आणि तसें झालें तर....

**मा**— ( खेदानें ) तर...तुला तिकडे च कायमचें रहावें लागेल, होय ना?

**र**— ( खेदानें ) हो !

**मा**— याला काय उपाय करावा ?... मला कांहीं सुचत नाहीं !

**र**— ( विचार करीत ) मला हि सुचत नाहीं...पण... भाऊसाहेब सरकार अत्यंत दयाळु आहेत...ताईसाहेबां कडून आपण त्यांना ही गोष्ट कळविली तर ?... त्यांना आपल्या दोघांची चांगली माहिती आहे...त्यांनीं उज्जनीस तसा शब्द हि काढला होता ... गरिबांचे ते वाली आहेत ...जर भाऊसाहेब सरकार—

इतक्यांत फिरत फिरत भाऊसाहेब तेथ आले ! त्यांनीं रतनचे शेवटचे शब्द ऐकले.

**भा**— रतन बेहेन ! माझी आठवण कां केलीस ?

दोघे दचकले ! त्यांनीं भाऊसाहेबांना वंदन केलें व खालीं माना घालून उभे राहिले

**र**— कांहीं नाहीं सरकार ! उगीं च.

**भा**— रतन ! भावाजवळ सांगण्यास भितेस...लाजतेस ?

**र**— सरकार ! आम्हां गरीब माणसें... भावांबहिणींचें नातें श्रीमंत-गरिबां मध्यें कसें साजणार सरकार ? पायरीस पाय लावण्याचें पातक आम्हीं कसें करावें सरकार ?

**भा**— बेटा ! मग तर तुला माझी वृत्ति कळली च नाहीं अजून ?

श्रीमंतां पेक्षां मला गरीब च अधिक आवडतात...अधिक जवळचे वाटतात... आप्त वाटतात...बाळ ! भगवान सिद्धेश्वराचें वास्तव्य गरिबांच्या झोपडींत च अधिक असतें...त्यांच्या, अनाथांच्या मनोमंदिरांत बसलेला श्रीराम जितका खरा, तितका राजराजेश्वरानें बांधलेल्या संगमर्मरी देवळांतील सोन्याच्या देव्हाऱ्यांत ठेवलेला व रत्नांचा निर्माण केलेला श्रीराम खरा नसतो ! श्रीसमर्थांनीं नाहीं का सांगितलें—

" देव, भक्तांचा कैवारी । देव, पतितांस तारी । देव होय सहाकारी। अनाथांचा ॥ देव अनाथांचा कैपक्षी । नाना संकटां पासून रक्षी । धांविन्नला अंतरसाक्षी । गजेन्द्रा कारणें ॥"

बेटा ! तूं गजेंद्रमोक्ष इतक्यांत विसरलीस ? राजकुंवर ताईसाहेब ही जशी माझी बहीण, तशी राजकुंवरची दासी रतन, ही सुद्धां माझी बहीण ! समजलीस ?

र—( गहिंवरून ) अहाहा ! भाऊसाहेबसरकार ! आपण खरोखर गरिबांचे कैवारी आहां ! आमच्या सारख्या अनाथांचा कैपक्ष घेणारे भाऊसाहेब सरकार ! आपण आमचे देव आहां !

असें म्हणून रतननें त्यांच्या चरणांवर मस्तक ठेविलें ! तिला उठवून—

भा— बाळ ! मी देव नाहीं, देवाचा सेवक आहे ! मग आतां सांग ना माझी आठवण कां केलीस ती ?

र— ताईसाहेब साताऱ्यास जाणार आहेत ना ?

भा— होय ! मग ?

र— मला हि त्यांचे बरोबर जावें लागेल !... तशी पिताजींची आज्ञा हि आहे !

भा— तुझें करणें योग्य आहे...बरें मग ?...माझ्या आठवणीचें कारण यांत तर मला कांहीं दिसत नाहीं !

र— ( खालीं मान घालून ) हो ! योग्य च आहे...पण—

भा— पण काय ? तुझी तिकडे जाण्याची इच्छा नाहीं ?

र— तसें नाहीं...इच्छा आहे...पण ( मानसिंहा कडे पाहून )...पण मला एकटीला च तिकडे जावें लागणार ?

भा— ( हंसून ) अरेच्या ! आतां आलें लक्ष्यांत ! जोडयानें जावयाचें

मनात आहे होय ? ( स्वगत ) थोडी गंमत करूं ! ( प्रकट ) पण काय रे मानसिंह ! पिताजींनीं तर तुला सरदारकी द्यावयाचें ठरविलें आहे ! ती मिळाली म्हणजे तुला येथें रहावें लागेल आणि रतन जाणार सातार्‍यास ! मग हें कसें जुळणार ?

मा— सरकार ! आतांचें आपलें बोलणें ऐकून मला धीर होत आहे ! आपण महाराजांना सांगून मला या सरदारकीच्या भानगडींतून मुक्त करावें ! साधा शिपाई म्हणून मीं आपल्या सेवेस हजर राहीन ! आपल्या खिदमतींत मला घ्यावें !

भा— काय रे ? पण मग तुझी सरदारीची इच्छा तृप्त कशी होणार ? आठवतें कां तुला ? सरदारी मिळावी म्हणून तर तूं काईमला मिळून तें पापी कृत्य करण्यास तयार झाला होतास ?

मा— ( पायां पडून ) हांय सरकार ! पण योग्य वेळीं मला पापा पासून परावृत्त करून देशसेवेच्या पुण्यमार्गास लावणारे पाय हे च आहेत ! पश्चात्तापानें शुद्ध झालेल्या या शरिराचें भरणपोषण हे च पाय आतां पर्यंत करीत आहेत ! असें असतां आतां मला सरदारीची इच्छा कशी राहाणार ? मी साधा पदाति म्हणून राहीन !

भा— शाबास, मानसिंह ! ( रतनला ) काय, रतन ? तुला तुझा मानसिंह पदाति म्हणून चालेल का सरदार म्हणून चालेल ?

र— ( लाजून ) अभिन्न असलेल्या दोन शरिरांची वाणी एक च असते सरकार !

भा— शाबास बाळ ! तूं माझ्या उज्जनीच्या शब्दाची आठवण मला देणार होतीस ना ? पण आटवणीचें प्रयोजन नाहीं ! बहिणीस दिलेला शब्द भाऊ कधीं विसरेल काय ? ( अंगरख्याच्या खिशांतून एक सनद काढतात ) सरदार मानसिंह ! श्रीमंत पेशवे सरकारांनीं तुम्हांस हुजरातींत पंचहजारी नेमलें आहे ! त्या बद्दलची श्रीमंतांच्या शिक्कामोर्तबाची ही घ्या सनद !

भाऊसाहेबांचें तें भाषण ऐकून रतन व मानसिंह दोघे आश्चर्यानें मुग्ध झाले ! पुष्कळ वेळ त्यांना आपण स्वप्नांत आहों असें वाटलें ! पण भाऊसाहेबांनीं जेव्हां प्रत्यक्ष सनद मानसिंहाचे हातीं दिली व त्यानें ती वाचून पाहिली तेव्हां ही वस्तुस्थिति असल्याचें त्यांच्या लक्ष्यांत आलें. दोघांच्या मनांत

उपकाराचें भरतें दाटून आलें, तें त्यांनीं भाऊसाहेबांच्या चरणां वर रितें केलें. दोघांनीं एकदम म्हटलें—

**मा० व र०**— सरकार! ही सर्व आपली कृपा! आपले उपकार आम्हीं गरिबांनीं कसे फेडावेत? अनेक जन्म घेऊन आमच्या शरीरांच्या कातड्याचे पायपोस करून जरी आपल्या पायांत घातले तरी हे उपकार फिटणार नाहींत!

**भा**— वेडे रे वेडे! अरे! यांत माझे कसले उपकार? जें घडून याव-याचें होतें तें घडून आलें! सरदार मानसिंह! देशद्रोहाचें पातक न करतां देशसेवा केलीस त्याचें हें फळ! आतां तुम्हां दोघांस माझे उपकार फेडावयाचे असले तर असे करा—

( राग मुलतानी )

**" जोबन अब चमके, कुछ दिनमे होगी सांझ ॥ धृ० ॥**

**जिसकी गोदी, अंत बसेरा; मत उस मा को भूले रे ॥ १ ॥ "**

असें म्हणून भाऊसाहेब निघून गेले!

**मा**— ( आनंदानें ) आतां झालें मना सारखें?

**र**— माझ्या एकट्याच्या च जसें कांहीं!

**मा**— बरें बोवा! दोघांच्या! मग तर झालें? बरें, आतां तरी रत्न-पारखी, रत्नाच्या परिक्षेस उतरला काय?

**र**— पण त्याच्या आधीं, मला हें समजलें पाहिजे ना कीं, रत्नपारख्यानें रत्नाची पारख केली कीं नाहीं?

**मा**— केली.

**र**— निकाल?

**मा**— रत्न खरें आहे!

**र**— मग त्या खऱ्या रत्नास, रत्नपारखी आपल्या कोंदणांत बसविण्यास तयार आहे?

**मा**— तयार आहे! पण रत्नाचा निकाल सांग ना?

**र**— तो तर आतां च सांगितला.

**मा**— केव्हां आणि कसा?

**र**— खरें रत्न कधीं खोट्या कोंदणांत बसण्याची इच्छा करील? त्याला

खरें च कोंदण लागेल. आणि रत्नानें त्या खऱ्या कोंदणांत बसण्याची इच्छा तर केव्हां च प्रगट केली.

**मा**— अस्सें अस्सें ! एवढी काव्यरचना ओळखण्याची कुवत माझ्या मेंदूंत नाहीं !

रतननें पुन्हां धनुर्बाण साफ करून, धनुष्य खांद्यास अडकवून हातांत पंच बाण घेतले !

**मा**— चला बोवा ! आपण मोठ्या परिक्षेंतून उतरलों एकदांचे ! बरें ! पुन्हां धनुष्यबाणांचें प्रकरण काय आहे ? आतां तूं झालीस सरदारीण ! मग तुला हें शिपायाच्या बायकोचें काम कशाला करावयास पाहिजे ? आणि खरें म्हटलें तर या भौतिक धनुष्याची व पंच बाणांची तुला गरज तरी काय ? दैविक धनुष्य तर तुझ्या जवळ आहे व दैविक पांच च का पण अनेक बाणांचा भाता हि तुझ्या जवळ आहे !

( राग जंगला )

**काहे को बांधे तीर कमनियां ॥ ध्रु० ॥ भवां कमान बनी जो तिहारी । नयन पलक दोऊ शरकी अनियां ॥ १ ॥ मेरा हृदय बन, मन मृग ढूंढत । चुन चुन मारत शब्द रसनियां ॥ २ ॥**

**र**— कां ? वीररस सुटून आतां शृंगाररस आठवला वाटतें ?

**मा**— मागें उज्जनीस हि आठवला होता, पण तो अकालीं होता हें तूं मला शिकविलेंस व मला हि त्याचा उमज पडला ! तेव्हां तुझ्या उपदेशा प्रमाणें त्या वेळे पासून वीररसाची कांस धरली आणि तो संपल्या वर आतां हा रस पुन्हां आठवला ! आतां तर हा अकालीं नाहीं ना ?

**र**— नाहीं ! वीररसाच्या नंतर च या रसाचें स्थान आहे ! खऱ्या शूर वीराचा च हक्क या रसा वर आहे ! देशास आजादी मिळवून देण्या साठीं रणचंडीच्या गळ्यांत शत्रूच्या रुंडांची माळा घालणाऱ्यास च, प्रेयसीच्या गळ्यांत करमाला घालण्याचा हक्क आहे ! पारतंत्र्याच्या रौरवांत पचणाऱ्या किड्यांना तो हक्क नाहीं !

मा-- शाबास ! मग तो हक्क, राणीसरकार ! या सेवकास आतां बजावूं देतील काय ?...

दुसरा दिवस उजाडला. महाराजांच्या राजवाड्यांतील गजराजमहालांत निवडक मंडळी जमली होती. या महालांत महाराजांनीं गजेन्द्रमोक्षाची तसबीर-त्यांच्या शामियान्यांत नेहमीं असे ती-एका उच्चासना वर कायमची ठेवून या महालाचें पूर्वीचें नांव बदलून " गजराज-महाल " असें नवें नांव त्याला दिलें होतें. काकाजींनीं बोलण्यास प्रारंभ केला.

का-- आतां पर्यंत आपणां सर्वांना-फक्त प्रभू खेरीज-न सांगितलेली गोष्ट आतां सांगणार आहे. आपण सर्वांनीं जें मनीं धरिलें होतें, तें श्रींनीं पूर्ण केलें ! शहा पूर्णपणें आमच्या हातीं आला ! तो फकीर बनून त्यानें जुलमी पातशाहीस फकीरशाही बनविण्याची शपथ माझे पाशीं घेतली ! तो मूळचा चांगला होता; पण या नौकरशाहीनें त्याला नादान बनविला व त्याचे नांवा वर अत्याचार चालू केले. त्याला हें सर्व स्पष्ट समजावून सांगितल्या वर त्याचे डोळे उघडले ! त्याचे अंगीं अकबर शहा अवतीर्ण झाला. त्यानें न्यायानें व सत्य-अहिंसेनें राज्यकारभार चालविण्याचें कबूल केलें ! तथापि जवळचे मुत्सद्दी त्याला अडथळे आणतील ! त्यानें जातीनें राज्य चालविलें तरी ही नौकरशाही त्याला सतावण्यास सोडणार नाहीं ! हें सर्व लक्ष्यांत आणून त्यानें आमची मदत घेण्याचें ठरविलें आहे ! हा पहा त्याचा पुरावा !

असें म्हणून त्यानीं आपल्या अंगरख्याच्या खिशांतून एक पत्र काढून तें सर्वांना उलगडून दाखविलें ! तें शाही पंजाचें फर्मान होतें. अत्यंत महत्त्वाचें व अत्यंत गुप्त असें शाही पत्र असल्यास त्या वर पातशहानें केशराच्या रंगांत आपल्या हाताचा पंजा बुडवून तो उमटावयाचा व त्यांत आपलें नांव लिहावयाचें अशी तत्कालीन पातशाही दरबाराची रीत होती ! पंजाच्या उजव्या बाजूस पातशाही मोठा शिक्का असे. या प्रमाणें तें फर्मान होतें. काकाजींनीं पत्र भाऊसाहेबांना दिलें व वाचण्यास सांगितलें ! मूळचें पत्र फारशी होतें; भाऊसाहेबांनीं प्रथम तें फारशींत वाचून मग त्याचा मराठी तर्जुमा ( भाषांतर ) करून सर्वांना ऐकविला. तें भाषांतर पुढील प्रमाणें—




" स्वराज्याचें तेज वाढविणारे, वैभवरूपी सूर्याला शोभा देणारे, तरवार बहाद्दर, सत्यधर्माचा ध्वज उभारणारे, हिंदवी राज्यमंदिराचे आधारस्तंभास बळकटी आणणारे, दिल्लीच्या या हिंदवी राज्याच्या सर्व उमरावांत व अधिकाऱ्यांत अग्रणी, आमच्या विशेष कृपेस पात्र झालेले, समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजेश्री श्रीमंत बाजीराव बल्लाळ पेशवे यांणीं, आपल्या वर झालेल्या पातशाही कृपे मुळें आनंदी व उत्साही होऊन जाणावे जे—

" आमच्या न्याय व फकीरी दरबारास मान्य असलेले, आमचे मुर्शीद, अत्यंत विश्वासु व घरोब्यांतील, हजरत कृष्णाजी केसो जोसीजी उर्फ काकाजी यांना आपल्या कडे, आमचे गुप्त हुकूम पोहोंचविण्यास व अत्युच्च अशा आमच्या दरबारच्या गुप्त गोष्टींनीं ओतप्रोत भरलेल्या खजिन्यांतील रत्नां प्रमाणें असलेलीं गुप्त व महत्त्वाचीं कामें करण्या करितां पाठविलें आहे ! हजरतां कडे सोंपविलेल्या कामांचा खुलासा, बितपसील—

" आमच्या शाश्वत राज्यारोहणाची प्रभात झाल्या पासून आज पावेतों आमचे वजीरा सह सर्व अधिकारी यांनीं आमच्या प्रिय रयते वर सर्व प्रकारची जुलूम जबरदस्ती केली, धार्मिक अत्याचार केले. मित्रांचीं राज्यें तरवारीच्या जोरावर जिंकून व दास्यांत ढकलून साम्राज्याचा विस्तार केला ! या मुळे आमचें राज्य कमकुवत झालें. देश वैराण झाला. प्रजा गांजली. आमच्या नोकरांनीं हिंदूमुसुलमानांत बिघाड केला ! वास्तविक दोघे हि एका च अल्लाची लेंकरें आहेत ! सत्य दृष्टीनें पाहिल्यास दोन्हीं धर्मांत फरक नाहीं. कुराणे शरीफांत बाविसाव्या सुरत मध्यें अल्लानें स्पष्ट आज्ञा केली आहे जे, " सत्य हा च देव आहे ! अर्थात सत्या खेरीज इतर गोष्टींचा प्रचार करणें व्यर्थ होय ! तो प्रचार अशाश्वत होय ! " तसें च हदीस मध्यें आँ हजरतांनी हुकूम केला आहे कीं, " सर्व विश्व हें अल्लाचें कुटुंब आहे. त्या कुटुंबांतील प्रत्येक प्राण्याशीं, दयाळुपणें, आत्मौपम्य दृष्टीनें जो सतत वागतो, तो च ईश्वरास आवडतो ! " खऱ्या धर्माची व्याख्या कुराणेशरीफाच्या चौथ्या सुरत मध्यें पुढील प्रमाणें केली आहे ! " ईश्वराची सेवा करा, सर्व प्राण्यांहून तो श्रेष्ठ आहे. मातापिता, आप्त, अनाथ, गरीब, स्वतःच्या रक्ताचा संबंधी शेजारी, परका शेजारी, स्नेहीसोबती, प्रवासी, गुलाम या सर्वांशीं दयाळुपणें वागा ! " सर्व धर्म एक च असल्याचें बेचाळीसाव्या सुरत मध्यें सांगितलें आहे. अल्लानें सत्यधर्मानें चालण्यास राजे लोकांना आज्ञा केली आहे. अल्ला म्हणतो:— "**फतवक्कल् अला अल्लाहि इन्नका अला अलहक्किल् मुबीनि !**" अल्लानें आँ हजरतांस पृथ्वी वर कां पाठविलें ? तर त्यांनीं सर्व प्राण्या वर दया करावी, त्यांना प्रेमानें वागवावें, या प्राण्यांनीं हि आपापसांत भलेपणानें वागावें या साठीं. प्राण्यांच्या या सत्कृत्याना हजरतांनीं साक्षीदार रहावें, त्यांनीं अत्याचार–जुलूम यांचा निषेध करावा, सत्य प्रकाशरूप ईश्वराचा धांवा करून त्याच्या मदतीनें अत्याचाराचा, अत्याचारी साम्राज्याचा नाश करावा या साठीं ! "**व मा अरसल्नाका इल्ला रहमतन् लिल आलमीना,**" या आणि "**या ऽ अय्युहा अन्न बिओ, इन्ना ऽ अरसलनाका शाहिदन् व मुबश्शिरन् व नज़ीरन् व्व दाइयन् इला अल्लाहि ब इजनिहि व सिराजन मुनीरन् !**" या आयतांचा हा च अर्थ नाहीं काय ? आम्हीं आमच्या सर्व साम्राज्याचा नैवेद्य भगवंताच्या पायां पुढें ठेविला आहे. सत्याचरणी पुरुषाचा च नैवेद्य अल्ला

स्वीकारतो, "**यतक़ब्बलु अल्लाहु मिनल् मुत्तक़ीना !**" म्हणून आम्हीं सत्य-धर्मानें वागण्याचें ठरविलें आहे. अशा प्रकारच्या अल्लाच्या आज्ञा असतां, आमच्या नोक़रांनीं त्या मोडून हिंदू वर कहर केला ! आमच्या पूर्वजांनीं व आम्हीं, आमच्या मित्र राजांना दिलेलीं मैत्रीचीं वचनें यांनीं कागदाचीं चिटोरीं म्हणून फेटाळून लाविलीं आणि त्यांना आमचे शत्रु बनविलें ! यांनीं आमच्या अपरोक्ष व समक्ष हि अनेक निंद्य कामें केलीं. तें सर्वांना माहीत असल्या मुळें त्याचा तपशील देण्याचें कारण नाहीं ! ज्यांतील संपत्ति खाणीच्या व समुद्राच्या बरोबरीनें होती अशा या हिंदुस्थानाची यांनीं लूट केली ! विशेषतः या नोकरशाहीनें अति पवित्र व अति श्रेष्ठ अशा आम्हांस व आमच्या कुटुंबास इतकें छळलें कीं, आम्ही आमच्या जीवितास कंटाळलों ! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ही दीने इलाहीची शाही नष्ट होऊन तेथें नोकरशाही स्थापित झाली ! तिच्या जाचणीचा सुरा आमच्या उरांत भोंसकला जाऊन आम्हांस सर्वथैव असहाय्य बनविलें.

" अशा आफतींत आमच्या घराण्यास, त्यांतील आमच्या पूर्वजांस व खास आम्हांस नेहमीं सत्य मार्गास लावणारे व आमचें रक्षण करणारे, हजरत काकाजी पंत आम्हांस लाभले, ही अल्लाची कृपा होय ! त्यांना आम्ही शरण गेलों ! आम्ही त्यांचे मुरीद बनलों ! त्यांच्या उपदेशा प्रमाणें आतां आम्हीं सर्व राज्यकारभार स्वतःचे हातीं घेऊन या अत्याचारी नोकरशाहीचें उच्चाटन केलें आहे ! आमचें ध्येय स्वातंत्र्य, न्याय व शांतता हें आहे ! या तत्वां वर आमच्या फकीरशाहीची स्थापना केली आहे ! या ध्येयवादाला धुळीस मिळवून जगा वर साम्राज्य स्थापण्याची आमची महत्त्वाकांक्षा नाहीं ! या ध्येयाचा नाश म्हणजे जगाचा नाश, सत्याचा नाश आणि सर्वत्र अंधःकाराचें साम्राज्य. आतां पर्यंत आम्हांस साम्राज्यवादी म्हणून संबोधण्यांत येई. आमचे ठाईं अधिकाराची, सत्तेची, भावना आहे, मालकीची लालसा आहे असें सांगण्यांत येतें. पण या पुढें आम्ही अशी राक्षसी महत्त्वाकांक्षा सोडून दिली ! शांततेंत राहून आमची उन्नति व्हावी, प्रजेची स्थिति सुधारावी असें आम्हीं इच्छितों. तेवढ्या साठीं, या पुढें **साम्राज्यवाद आम्हीं सोडून दिला** असून आमचें राज्य म्हणजे फकीरशाही बनविली आहे ! साताऱ्याचें राज्य जशी फकीरशाही तशी च ही आमची होय ! **साम्राज्यवादी आम्ही नव्हों !**

" अशा स्थितींत आमच्या पवित्र राज्यास टेकूं देणारे उदारधी श्रीमंत बाजीराव बल्लाळ पेशवे, यांचे आश्रयछत्रा शिवाय आम्हांस व आमचे परिवारास दुसरें साधन नाहीं ! साताऱ्च्या फकीरशाही प्रमाणें या दिल्लीच्या फकीरशाहीचें हि त्यांनीं मुखत्यार पेशवे व्हावें ! एवढें च नव्हे तर आम्हांस व आमच्या परिवारास, त्यांना योग्य दिसेल त्या रीतीनें तनखा कायम करावा. येथें आपल्या आप्ता पैकीं एकादा विश्वासु मुतालिक नेमावा ! त्यानें नेहमीं, आपल्या खड्या फौजेनिशीं आमच्या जवळ असावें. आपणांस योग्य वाटेल त्यास वजीरी व मीर बक्षीगिरी द्यावी ! राज्याचा महत्त्वाचा कारभार अंमलांत आणतांना या पूर्वी व पुढें हि शपथपूर्वक जे आमचे करारनामे झाले आहेत व होतील ते पाळण्यांत येतील !

" छत्रपति सरकार श्रीशाहु महाराज हे आमच्या आते–घराण्यांतील व आम्ही त्यांच्या मातुल–घराण्यांतील असोन, ते आमचे आजे लागतात ! तरीं नातवा वर कृपादृष्टी ठेवण्यास व त्याचे राज्याचा प्रतिपाळ करण्यास त्यांना विनंति करावी !

तेरीख १७ रमजान जुलूसी सन १० हिजरी सन ११४२ "

( इब्ने = चा पुत्र; इब्न = पुत्र + इ = चा )

भाऊसाहेबांनीं या प्रमाणें पत्र वाचल्या वर सर्वांना फार आश्चर्य व आनंद झाला !

श्री— काकासाहेब ! ही सर्व आपली च कृपा ! दौलती वर आपले महत् उपकार आहेत !

का— श्री रघुपतीची कृपा ! या संधीचा फायदा राजेश्रीं ( शाहूमहाराजां ) च्या विचारें कसा घ्यावयाचा तें पुढें ठरवूं !

गुरु— तें रास्त च आहे ! राव ! काल रात्रीं मीं सुचविल्या प्रमाणें सख्य–पत्र लिहून तयार झालें आहे काय ? राजाजींनीं सांगितल्या वरून त्यांच्या ऐवजीं तेथें हिरदेसाचें नांव घातलें ना ?

पि— आज्ञा ! गुरुदेव मी आतां पिकलें पान ! फार तर दोन तीन वर्षें जगेन ! तेव्हां हिरदेसाचें च तेथें नांव असल्यास उत्तम. चिरंजीव रावसाहेब व बेटा हिरदेसा दोघे हि भाऊ ! म्हणून हा भावांचा च करार व्हावा !

श्री— पत्र लिहून झालें ! ( अंगरख्याच्या खिशांतून पत्र काढून, भाऊसाहेबांच्या हातीं देऊन ) भाऊसाहेब ! पत्र वाचून दाखवावें.

भाऊसाहेब वाचूं लागलेः—

॥ श्री ॥

" स्नेहपत्र श्रीमहाराजाधिराज श्री महाराजा श्री राजा छत्रसालजी यांचे ज्येष्ठ पुत्र महाराजकुमार हिरदेसाजी यांसी श्री राव श्रीमंत बाजीराव बल्लाळ मुख्य प्रधान यांणीं दिल्हें स्नेहपत्र ऐसें जे—

" तुमचा वेव्हार, बढाई, राज्य, मरातीब आहे, तो कधीं कम होणार नाहीं; दिवसेंदिवस अधिक होईल; त्या साठीं आम्हीं मदत करूं. तुमचा भाई, भतिजा, कुंवर, ठाकूर, चाकर, गैर-रहा जमीदार, कोणीं हि तुम्हां पाशीं गैर राजी होऊन आम्हां पाशीं येईल, त्यास आम्हीं ठेवणार नाहीं. त्याची समजाई करून तुमचे हवालीं करूं. आमची फौज तुमचे जागेयांत उपद्रव करणार नाहीं; पदरींचा रोजमरा खर्च करीत जाईल. पातशाही फौज तुमचे वर चढाई करून आल्यास आम्हीं तुमची मदत करूं. ज्या प्रमाणें सातारापुणा या राज्याचें रक्षण करतों त्या प्रमाणें तुमचें राज्याचें संरक्षण करूं. आम्हां वर मोंगलाची फौज आल्यास तुम्हीं आमची मदत करीत जावी. पातशाही मधें राह ( अंमल ) आम्हीं आपली करून घेऊं, ते समयीं तुमचा हि बंदोबस्त करून देऊं चमेल व जमुना पैल भदावरचें राज्य, शिवाय तुमची आमची फौज गेल्यास जो मुलुक, रुपाया, कमाई मधें पैदा होईल, तो आपले फौजे प्रमाणें वांटून घेत जाऊं. आम्हांस हिंदुस्थानास काम पडल्यास तुम्हीं आम्हांस सामील व्हावें. आमचे इतल्या (विचार) शिवाय मोंगलांशीं सल्ला करूं नये. कदाचित मोंगलाची भारी फौज आल्यास दोन महिने लढाई करावी. दोन महिनेयांत आमची फौज तुमचे मदतीस न आली, तर मतलबी सल्ला करावा. त्यास आम्हीं वाईट मानणार नाहीं. आमची फौज येऊन पोचली, तर तुम्हीं आम्हीं एक विचारें सामील होऊन, मोंगलाची फौज हटवून देऊं. एकानें सत्र एकानें मित्र म्हणजे भाऊ–भाऊ या प्रमाणें करार, पिढी दर पिढी तुमचे आमचे चालत जातील. यासी सोगंध श्री रामचंद्रजी व श्री महाकालजी तथा तुलसी बेलपत्राची आहे. या गोष्टीस उभयतां कडील दरम्यान श्री चिमाजीआप्पा, श्री धाकटे नाना, श्री भाऊसाहेब नाईक, पिलाजी जाधव,

मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे, यशवंतराव पवार, जानोजी समशेर बहाद्दर व श्री जगतराज, पृथ्वीसिंह, नूरखान, हमीदखान आहेत. जाणिजे. मिति वैशाख ( आपल्या कडील चैत्र ) वद्य ५ संवत १७८५. ”

पि— उत्तम ! गुरुदेव ! ही आपली कृपा ! पूर्वीपासून असलेला आमच्या दोन्ही घराण्यांचा स्नेह अधिक दृढतर झाला ! आतां मी पूर्ण निष्काळजी झालों !

गुरु – ही श्रीं ची कृपा. यद्यपि महंमदशहा आपल्या फकीरशाहींत सामील झाला असला तरी दूरदृष्टी म्हणून, तुम्हां दोन घराण्यांत असें स्नेहपत्र असणें आवश्यक आहे.

हिरदेसा — मीं हि शपथ प्रमाण करतों कीं पत्रांत लिहिल्या प्रमाणें मी आजन्म वागेन.

पि — जगत ! पिलाजी जाधवरावास घेऊन ये !

जगतराज गेला व थोडया क्षणांनीं जाधवरावांस घेऊन आला. पिलाजीनें सर्वांना वंदन केलें.

पिताजी-- पिलाजीराव ! सातान्यास शाहु छत्रपतींना इकडील वर्तमानाचें पत्र लिहिण्यास सांगितलें, त्या प्रमाणें तें लिहून तयार झालें काय ?

पिलाजी-- आज्ञा ! मसुदा झाला (अंगरख्याचे खिशांतून पत्र काढतो), तो वाचून दाखवितों ! “ महंमदखान बंगष प्रयागचा सुभा, आमचे वरी मसलत करोन चालोन आला होता. हें महाराजांसी विदित च होय. आम्हीं त्यासीं गनिमाईनें होतों. खान कुल चाळीस पन्नास हजार फौजेनिसीं छ ९ रोजीं आम्हां वर चालोन आला. प्रसंग कठीण. ऐसियांत महाराजांनीं आज्ञा केलीया प्रमाणें ऐन समयीं चिरंजीव श्रीमंत बाजीराऊ व चिरंजीव भाऊसाहेब दौडत येऊन दाखल झाले ! श्रीगुरुदेवांनीं, सवाई राजाजींशीं राजकारण करून त्यांचे कडील हिंदुमुसुलमान रजवाड्यांची कुमक आणली. ती ही मोक्या वरी आली. त्यास आम्हीं व चिरंजीव उभयतां तथा राजाजी कडील रजवाडे एकत्र होऊन गाहा करोन अमित्रा वरी घसरलों. खानासी कसाला ( युद्ध ) दिल्हा. श्रीरघुपती कृपें करोन त्यास फौजेनिशीं बुडविला ! तीन हजार घोडे घेतले व तेरा हत्ती पाडाव केले ! तीन शें उंट आले ! आमच्या लष्करांतील सुखरूप आहेत. झुंजांत कामास आले त्यांचे वंशास तथा जखमी झाले त्यांसी बक्षिसी दिल्ही !

चिरंजीव आबासाहेब ! आपण आमची लज्जा रक्षण केली ! **गजेन्द्रमोक्षाची गत** झाली !—

**" जब लग गज बल अपनो बरत्यो नेक सरो नहिं काम ।**
**" निर्बल व्है बल राम पुकाऱ्यो आये आधे नाम ॥ "**

प्रत्यक्ष भेटीस येण्याचा मानस आहे ! गुरुवर्य काकाजी येथें आले आहेत. गुरुदेव हि आहेत. सर्वांस समागमें घेऊन अविलंबें सातारियास येऊन दाखल होऊं ! "

**पिताजी**— उत्तम ! पत्र लिहून झाल्या वर आमचे कडे आणा; म्हणजे " आशीर्वाद " करूं ! मुजरद जोडी जाऊं द्या ! जा.

पिलाजी वंदन करून निघून गेले. इतक्यांत मानसिंह, कविराज, ताईसाहेब व रतन तेथें आल्या. त्यांच्या मागोमाग नूरखान व हमीदखान हि आले. या मंडळीस घेऊन येण्यास पिताजींनीं गुरुदेवांच्या आज्ञे वरून हुजऱ्यास पाठविलें होतें. ताईसाहेब व रतन, पिताजींच्या मागें, चिकाचा पडदा असलेल्या चापे-खणांत बसल्या व बाकीची मंडळी, बाहेर यथाक्रम बसली.

**गुरु**— नूरखान ! काल ठरल्याप्रमाणें, राजाजीं सह आम्हीं सर्व लवकर च साताऱ्यास छत्रपतींच्या भेटीस जाणार. येथली व्यवस्था चिरंजीव कुमार व चिरंजीव जगत यांचे वर सोंपविली आहे. त्यांना दिवाणजी, सेनापति, तुम्हीं व हमीदखान यांनीं सहाय्य करावयाचें आहे.तुम्हां सर्वांच्या भरंवशा वर आम्ही तिकडे जात आहों. उभयतां चिरंजीव तरुण. तरुणपणीं विवेक कमी. दिवाण, सेनापति व तुम्ही वृद्ध ! त्यांत तुम्ही पातशाही दरबारचे माहीतगार. म्हणून तुम्हीं सर्वांना योग्य मार्ग दाखवीत जावा. आम्हीं परत येई पर्यंत तुम्हीं पन्ना सोडूं नये. हमीदखान तुम्ही हि येथें च असावें.

**ह**— जी, हां ! गुरुदेवांची आज्ञा शिरसावंद्य आहे ! मी पन्ना—रियास-तीचा नोकर च आहें !

**नू**— आज्ञा ! मी जरी प्रथम दिल्ली दरबारचा नोकर होतों, तरी गुरु-देवांच्या कृपेनें माझे डोळे उघडले ! आतां मी फकीरशाहीचा कायमचा नौकर बनलों. त्या दरबारनें हि मला नौकरीची फारकत दिली आहे. महाराजांनीं तर परवांच्या दरबारांत मला सप्त हजारी मनसब देऊन, दिल्ली दरबारा कडील माझी पहिली जहागीर करार केली ! इतकें च नाहीं, तर पन्ना रियासतींत नवीन

जहागीर देऊन अवलाद अह्फाद नबाबीचें पद दिलें ! ( गहिंवरून ) महा-राजसरकारांनीं हे माझे वर फार उपकार केले आहेत ! त्यांतून मी कसा उत्तीर्ण होईन ? महाराजांच्या चरणांची कसम घेऊन एवढें च सांगतों कीं, जों पर्यंत पन्नाची रियासत कायम राहील, तों पर्यंत नूरपूरचे नबाब त्या रियासतीची चाकरी नेकीनें बजावतील ! " आपला भक्त कृतघ्न असलेला, अल्लास मान्य नाहीं; ईश्वर अशाला मदत करीत नाहीं ! " असें कुराणेशरी-फच्या एकूणचाळीसाव्या सूरत मध्यें म्हटलें च आहे ! माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या; फक्त एक उरली आहे; ती म्हणजे आयेषेची शादी !

पि— नूरखान ! त्याची काळजी करूं नका. गुरुदेवांच्या आज्ञे वरून मी तें काम पुरें करतों.

नू— सरकारांच्या इच्छे बाहेर मी नाहीं !

पि— भाऊ ! तुमच्या पुढें परिक्षेस आलेल्या विद्यार्थ्यां पैकीं, एका खेरीज बाकींच्या विद्यार्थ्यांचीं कार्यें नेमस्त केलीं गेलीं. फक्त एकाचें नेमस्त होणें आहे ! होय ना !

भा— होय पिताजी !

गुरु— बरें तर, मग आयेषेला घेऊन या ! रतन जा.

रतन गेली व थोडया वेळानें आयेषेला घेऊन आली. तिनें सर्वांना वंदन केलें व ती चापेखणा कडे जाऊं लागली—

गुरु— बेटी ! थांब. तुला त्या जलालपूरच्या प्रसंगाची आठवण आहे ?

आ— जी, हां !

गुरु— त्या प्रसंगांतील एकूण एक गोष्टींची ?

आ— हां जी !

गुरु— त्या वेळीं मीं असें म्हटलें होतें कीं, " बेटी ! पाक माणसांच्या पाक इच्छा तो पाकी खुदा पूर्ण करतो, " हें वाक्य तुला आठवतें, बेटी ?

आ— ( हमीद कडे हळूं च पाहून व खालीं मान घालून ) आज्ञा !

गुरु— बेटा हमीद ! तुला आठवतें ?

ह— ( आयेषे कडे पाहून व खालीं बघून ) आज्ञा !

गुरु— नूरखान ! तुम्हांस हि आठवतें काय ?

नू— ( आयेषा-हमीद कडे पाहून आनंदानें ) जी, हां !

**गुरु**— मग ही खुदाची इच्छा तुम्हांस मान्य आहे तर ?

**नू**— होय. ती मी शिरसावंद्य केली आहे !

**गुरु**— राजाजी ! प्रथम हमीद व आयेषा यांची शादी होऊं दे, मग साताऱ्या कडे कूच करूं.

**पि**— जशी गुरुदेवांची आज्ञा !

आयेषा चाफेखणांत ताईसाहेबां जवळ जाऊन बसली.

**भा**— नबाब नूरखान ! मला, आयेषेच्या भावाला, वधुपक्षा कडील कारभाराचा कुल अखत्यार द्या बरें कां ?

**श्री**— नबाब ! भाऊसाहेब व मी आम्ही दोघे बंधू च आहों ! तेव्हां छत्रपती सरकारांचा हा पेशवा, आयेषा बेहेनच्या शादीच्या समारंभाचा हि पेशवा होणार आहे ! हमीदखान ! भाऊसाहेबांचा व माझा कानपिळ्याच्या पागोट्याचा मान तुम्हांस सुटणार नाहीं बरें कां ?

**का**— भाऊ ! राऊ पेशवा तर तूं पोतदार ! हीं आपलीं पूर्वापार नातीं च आहेत ! नूरखान ! माझ्या पुतण्यास लग्नांतील पोतदारी द्या ! आम्ही त्या वर खूष आहों ! पेशवाई घेऊं द्या भटांना ! तिच्या वर जोशांनीं कधीं च डोळा ठेवला नाहीं व ठेवणार नाहींत ! आमची पोतदारी च आम्हांला पुरे !

**पि**— काकासाहेब ! या उभयतां भावांचे मान मीं पुरवीन ! बेटा, हमीद ! तूं दौलतीचें कामीं जिवापाड मेहनत केली आहेस ! वास्तविक त्याची बक्षिसी कालच्या दरबारांत च द्यावयाला पाहिजे होती; परंतु ती मुद्दाम मीं त्या वेळीं आजच्या प्रसंगा साठीं राखून ठेविली ! त्या वेळीं तुला असें म्हटलें हि होतें कीं, तुझी बक्षिसी योग्य प्रसंगा साठीं राखून ठेवण्यांत आली आहे ! तो योग्य प्रसंग हा ! बेटा ! तुला माझ्या रियासतींत पंच हजारी करण्यांत आलें आहे व हमीदपूरची नबाबी औलादअहफाद बहाल करण्यांत आली आहे !

हमीदला हे ऐकून गहिंवर दाटून आला त्यानें उठून पिताजींच्या चरणां वर मस्तक ठेवलें !

**ह**— सरकार ! नव्हे पिताजी ! बाबाजान ! आपल्या सारखा पुण्य–पुरुष म्हणजे अल्लाचा अवतार होय ! माझे बाबा लहानपणीं निवर्तल्या वर, पिताजी ! ( डोळ्यांतून अश्रु गळतात ) आपण च माझे बाबा बनलां व माझें पालन

महाराजकुमारां प्रमाणें आज पर्यंत केलें! माझी योग्यता नसतां हि हा आपण माझ्या वर केवढा उपकार केला आहे! त्यांत आणखी या बक्षिसीची भर पडली...पिताजी! आपल्या उदारपणा बद्दल बोलण्यास शब्द च आठवत नाहींत!

पि — (त्यास उठवून व पाठी वरून हात फिरवून) बेटा! तूं मला "पिताजी" म्हटलेस ना? मग आभार, उपकार, उदारपणा इत्यादि ही औपचारिक भाषा कशाला बोलतोस? तुझे वडील खुदाबंद खान हे माझे एक जिवलग दोस्त होते! मागच्या जुलमी काळांत माझ्या खांद्याशीं खांदा लावून, दिल्लीदरबारा विरुद्ध त्यांनीं समशेर गाजविली! तो खरोखर खुदाचा बंदा होता! खुदाइखिदमतगार होता! (कंठ दाटतो) काळानें त्याला ओढून नेलें. शेवटच्या घटकेस त्यानें तुला माझ्या ओटींत घातलें व मला सांगितलें कीं, "हमीदला, माझ्या सारखा खुदाचा बंदा करा!" मीं त्या प्रमाणें वागण्याचें कबूल केलें. बेटा! त्या प्रमाणें तुला बनविण्याची मीं खटपट केली! तूं हि तसा बनलास! हें पाहून स्वर्गांत माझ्या मित्रास समाधान वाटेल! असो. नबाब नूरखान! तुम्ही वधुपिते आहां, तर आम्ही वरपिते आहों! नबाब हमीदखानाच्या शादीचा सर्व खर्च दौलतींतून केला जाईल! त्यांची शादी राजकुमारांच्या दर्जाची होईल! (थट्टेनें) नूरखान! व्याह्याचे सर्व मानपान राखले पाहिजेत बरें कां?

हिर — (थट्टेनें) श्रीमंत! स्वतःच्या कानपिळयाच्या माना पुढें माझ्या हि मानाची आठवण असूं द्या!

जगत — नवरदेवास एक भाऊ नसून दोन आहेत बरें का भाऊसाहेब!

ताई — (श्रीमंतांकडे हळूं च पाहून) पिताजी! हमीदभाईच्या लग्नांतला माझा करवलीचा मान, कांहीं हि झालें तरी मीं सोडणार नाहीं, हें वधुपक्षा कडील मंडळीस निक्षून सांगा बरें का? नाहीं तर नबाब नूरखान माझे मानपान पाळावयास तयार होतील आणि...पोतदारांचें...नाहीं तर... भटांभिक्षुकांचें...पोट दुखेल! आयेपे! लक्ष्यांत ठेव हं!

आ — (हळूं च) ताईसाहेब! मला सांगण्या पेक्षां या समारंभाचे जे कोणी पेशवे, जे कोणी भट असतील त्यांना च सांगा ना? मध्यें मी कशाला?

ता — (खोट्या रागानें) बघ हं आयेपा! मला नाहीं हो हें खपावयाचें!

हें ताईसाहेबांचें बोलणें ऐकून श्रीमंतांनीं चोरून चिकाच्या कडे पाहिलें व स्मित केलें !

**रतन**— ( हळूं च ) केवढा पण हा रागाचा झटका आला ताईसाहेब ! अशानें पुणेंकर मंडळी पुण्यास पळून जातील हो ! मराठे म्हणे पळण्यांत फार प्रसिद्ध असतात ! झाडास बांधले, तर झाड उपटून त्या सह पळून जातात !

**ता**— तुला कोणी ग चोंबडेपणा करण्यास सांगितला ? थांब, तुझी खोड्की मोडतें. सरदार मानसिंह ! चुरुंचुरुं बोलणाऱ्या हिच्या तोंडास सदोदित मुसकी घालून ठेवा !

**मान** — ताईसाहेब ! कसूर माफ ! श्रीमंत पेशवे सरकारांच्या हुजूरपागें-तील मी नोकर ! राणीवशांतील दासी वर माझा काय अधिकार ? तो अधिकार अंतःपुराच्या स्वामिनी कडे च आहे, सरकार !

**काका**— ताई, बेटा ! सर्वांचें म्हणणें रास्त आहे ! तूं भाऊ वर विना-कारण ठपका देतेस ! त्यानें हि तुला सुनविलें असतें म्हणा ! पण चुलत्या मुळें तो गप्प बसला ! हें बघ, आम्ही पोतदार ! कोठावळे ! मालकानें आम्हांस खर्चाची मंजुरी दिली म्हणजे झालें ! आमचें काय जातें ! हं ! हें बरीक खरें कीं भटांचें पोट दुखेल ! म्हणून तूं आधीं त्या भटांशीं करार करून घे ! आम्हांला काय ? आमच्या जोसपणाची लग्नघटकापात्राची एकादी शिवराई मिळाली म्हणजे पुरे !

**गुरु**— अहाहा ! धन्य धन्य ! संकटांत एकमेकांच्या प्राणरक्षणा करितां, पाठच्या भावां प्रमाणें छातीठोकपणें उड्या घेणारे व आनंदाच्या प्रसंगीं घरांतील एकत्र कुटुंबा प्रमाणें वागणारे, असले हिंदुमुसुलमान जों पर्यंत माझ्या या आर्या-वर्तांत, हिंदुस्थानांत निपजत आहेत, तों पर्यंत त्याच्या कडे वांकड्या डोळ्यानें पाहण्याची कोणा हि त्रयस्थाची छाती नाहीं ! भगवान रघुपते ! असली एकीची परिस्थिति सतत टिको ! या इत्तेफाकीच्या तक्ता वर माझा भारतवर्ष कायमचा विराजमान होवो !

**कवि**— श्रीसमर्थमहाराज ! गुरुमहाराजांची आज्ञा पूर्ण करा ! त्यांचें म्हणणें च असें आहेः—

( गजल : दादरा )

**“ मैं ” “ तूं ” का जब भेद मिटाया । कुफर ( हिंदू ) इस्लाम ( मुसुलमान ) का नाम भुलाया । ऐन गैन का फर्क गंवाया । खुला**

**सब असरार ॥ १ ॥ वहदत कसरत विच समाई । कसरत वहदत हो के भाई । जुज विच कुलकी सूझी पाई । विसर गया संसार ॥२॥ साकीने भर जाम पिलाया । बे खुद हो के जशन मनाया । गैरीयत का नाम गंवाया । हूई जयजयकार ॥ ३ ॥**

जय, जय, रघुवीर समर्थ !

सर्व मंडळींनीं गजेंद्रमोक्षाच्या तसबिरीस वंदन करून, "**जय, जय, रघुवीर समर्थ**" असा गजर केला !

---

# फकीरशाहीची आचार्य-आज्ञा तथा राजाज्ञा ! [ पाकळी दहावी ]

प्राणाघातान्निवृतिः परधनहरणे संयमः सत्यवाक्यं, काले शक्त्या प्रदानं युवतिजनकथामूकभावः परेषाम् । तृष्णास्रोतोविभंगो गुरुषु च विनयः सर्वभूतानुकंपा, सामान्यः सर्वशास्त्रेष्वनुपहतविधिः श्रेयसामेष पंथाः ॥

दोन तीन दिवस लोटल्या वर, ठरल्या प्रमाणें राज्यकारभाराची व इतर सर्व व्यवस्था लावून, महाराज छत्रसाल आपल्या व सातारच्या मंडळीसह सातान्यास जाण्यास निघाले. स्वारी सडी होती. मराठ्यांचें सैन्य मागून सावकाश येत होतें. थोड्या दिवसांत मंडळी सातान्यास आली.

महाराज येणार हें छत्रपतींना पत्रद्वारें अगाऊ च समजलें होतें. त्यांच्या सन्मानार्थ नगर शृंगारण्याची धामधूम चालूं होती. महाराज संगममाहुली पर्यंत आले. तेथें सायंकाळीं त्यांचा मुक्काम झाला. दुसरे दिवशीं छत्रपती आपल्या लवाजम्या सह तेथें गेले. सामोरे आलेल्या छत्रपतींनीं, महाराजांना वंदन केलें; पिताजींनीं त्यांना पोटाशीं धरलें. त्यांच्या नेत्रांतून अश्रु स्रवत होते. तोंडांतून शब्द फुटत नव्हता. छत्रपतींना उद्देशून त्यांनीं कसेबसे

" बेटा ! शिवाजी ! आपने गजराजका उद्धार किया ! **बुडते गज़राज राख्यो । कियो बाहर नीर ॥** " एवढे शब्द काढले. सर्व मंडळी नगरांत मोठ्या समारंभानें आली. नगर फार शृंगारलें होतें. महाराजांना व विजयी प्रधानांना पाहण्या साठीं, रस्त्यांत, घरांच्या गच्ची वर, खिडक्यांत, दारांत, झरोक्यांत सर्वत्र माणसांची दाटी झाली होती. महाराज व छत्रपति हगमंत गजाच्या वर सोन्याच्या अंबारींत शेजारीं शेजारीं बसले होते व खवाशींत श्रीमंत पेशवे व भाऊसाहेब पोतदार होते. अंबारी वर प्रजेनें उधळलेल्या फुलांचा खच रस्त्यांत पडला होता. राजवाड्या पर्यंत येऊन मिरवणूक संपली. महाराजांचा मुक्काम राजवाड्यांत च मुकरर केला होता.

दोन चार दिवस समारंभ चालू होता. छत्रपतींनीं, महाराजांना मेजवानी दिली; श्रीमंत पंतप्रधानांनीं हि दिली. महाराज आपल्या मंडळी सह, त्या सह्याद्रीगिरीच्या मंदारशृंगा प्रमाणें विलसणाऱ्या व श्रीऊर्वशीचे तीरीं शिवनृपानें वसविलेल्या व ज्याच्या वर साकेताधिपति – कपी – भगवती हे देव वसले आहेत अशा सज्जनगड विभासा वर मोठ्या नम्रतेनें गेले आणि या आनंदवनभुवनास उद्धरणाऱ्या त्या जागृत दैवताचें, योगेश्वर श्रीसमर्थांचें – त्यांच्या समाधीचें – मोठ्या भक्तिभावानें त्यांनीं दर्शन घेतलें ! बरोबर गुरुदेव, काकाजी, कविराज ही हि मंडळी होती च. सर्वांनीं तेथील स्वानंद साम्राज्य एक दोन दिवस उपभोगिलें व मग मंडळी परत साताऱ्यास आली.

दुसरे दिवशीं रात्रीं राजवाड्यांतील मंत्रगृहांत निवडक मंडळी जमली होती. गुरुदेवांनीं प्रथम बोलण्यास सुरुवात केली.

गुरु— शिवबा ! कार्यास प्रारंभ करा.

पिताजी— होय, राजेश्री ! मंडळी जमली च आहेत. आतां प्रारंभ करण्यास हरकत नाहीं.

छत्रपति— आज्ञा ! गुरुदेवांच्या व वडिलांच्या आज्ञे बाहेर मी नाहीं.

पि— भाऊ ! बेटीस आणा बरें.

भाऊसाहेब उठून राणीवशांत गेले. थोड्या वेळानें भाऊसाहेब, सौ० मातुःश्री महाराणी, ताईसाहेब व दोन दासी – रतन व महाराणीची विश्वासु दासी गजरा – ही मंडळी, उजव्या बाजूच्या एका दालनांत आली. दालनात राणीसाहेब व त्यांची दासी बसल्या. दालनाच्या दारावर चिकाचा पडदा

होता. भाऊसाहेब ताईसाहेबांना घेऊन दालनांतून बाहेर आले; ताईसाहेबांच्या मागें रतन हि आली. ताईसाहेबांनीं मस्तका वर भरजरी अवगुंठन घेतलें होतें. त्यांनीं बाहेर आल्या वर गुरुदेव, काकाजी, छत्रपति व पिताजी यांना वंदन केलें.

**काकाजी**— ये बेटी! पिताजी जवळ, येथें बैस!

ताईसाहेब, पिताजींच्या मागें बसल्या; काकाजींनीं खूण केल्या वरून भाऊसाहेब, ताईसाहेबां जवळ बसले. रतन त्यांच्या मागें उभी राहिली. या नंतर पिताजी गंभीरपणें बोलूं लागले.

**पि**—गुरुदेव, काकाजी, राजेश्री आणि सर्व मंडळी! मी आतां पुढें जें सांगणार आहे तें आपण सर्वांनीं एकाग्रचित्तें ऐकावें अशी विनंति आहे! ही माझी बेटी ( ताईसाहेबां कडे पाहून ) ताई! भोंसले घराण्याचा व माझा आज तीन पिढ्या भाईचारा आहे हें सर्वांना विदित आहे! तसें च भट घराणें व केळशीकर घराणें यांचा हि दोन पिढ्यांचा भाऊपणा आहे! थोरले नाना व काकाजी हे मला भावा प्रमाणें लेखीत व लेखतात. नाईक मंडळी काशीस वास करीत असतां, दक्षिणेस येतांना, पन्ना येथें माझ्या कडे मुक्काम करीत. नानांचें दिल्लीस येणें जाणें सुरूं झाल्या पासून ते हि माझे अतिथी असत. माळव्याच्या मोहिमां वर दाखल असतांनाहि वेळ काढून, नाना माझ्या कडे येत. बेटीचें मूळचें नांव निराळें—मदयंती— असतां, नाना तिला "ताई" या नांवानें हांक मारीत; त्या मुळें ताई हें च मराठी नांव पुढें कायम झालें! एके प्रसंगीं नाना, पन्ना येथें आले असतां बरोबर ( श्रीमंत बाजीरावसाहेबां कडे बोट दाखवून ) रावसाहेबांना घेऊन आले. यांना पाहून त्या वेळीं माझ्या मनांत आलें कीं, यांचा व ताईचा जोडा ठीक जमेल! तथापि ती गोष्ट नानांच्या जवळ काढण्याचें राहून गेलें. त्या नंतर त्यांनीं कैलासवास केला! पुढें कारणांकारणांनीं रावसाहेबांचा मुक्काम आमच्या कडे दोनचार वेळां झाला. त्या प्रसंगीं यांच्या व ताईच्या गांठीभेटी मीं माझ्या रूबरूं मुद्दाम घालून देई! त्या प्रसंगांचें अवलोकन करून मीं असा निष्कर्ष काढला कीं दोघे हि परस्परांवर अनुरक्त झाले आहेत! त्या मुळें हा संबंध घडवून आणण्याची माझी पूर्वीची इच्छा अधिक दृढ झाली! परवां दोघांच्या हि मनाचा ठाव काढला. ( भाऊसाहेबां कडे पाहून ) भाऊंच्या कडे च हें काम सोंपविलें होतें! ठाव

अनुकूल निघाला. मग दोघांना प्रत्यक्ष विचारून पाहिलें. ताईची रुजवात तर तत्काळ मिळाली ! रावांची हि आडकाठी दिसली नाहीं ! पण त्यांचे मनांत एक खटका आहे, तो—

छ— पिताजी ! बालकास क्षमा असावी !... इकडे लोकप्रवाद आहे... जे... ताई... अहिंदू...

पि— होय, शिवबा ! इकडे हा लोकप्रवाद असल्याचें मला माहीत आहे ! एका दृष्टीनें तो सत्य तर सत्यदृष्टीनें तो मिथ्या आहे ! हा च खटका राऊंच्या मनांत रुतून बसला आहे ! पन्ना येथें परवां मी त्यांना सांगितलें कीं याचें निरसन साताऱ्यास राजेश्रींच्या समक्ष करीन, तो पर्यंत मन शांत ठेवणें ! आतां तें निरसन करतों ! औरंगझेबानें तख्ता वर बसतांना, माझ्या पिताजींचें—महाराज चंपतरायांचें— सहाय्य घेतलें होतें पण पुढें कांहीं काळानें हा उपकार विसरून त्यानें पिताजींचा अपमान केला; तेव्हां पिताजींनीं खवळून त्याचेशीं झगडा सुरूं केला, तो बरे च दिवस चालला ! शेवटीं मोंगलानें कपटानें पिताजींना मारलें. त्या च वेळीं त्यांच्या बरोबर असणाऱ्या व खांद्यास खांदा देऊन लढणाऱ्या माझ्या एका नजीकच्या आप्तास तो जखमी झाला असतां पकडून **जुलुमानें बाटविलें** ! तथापि हा डाग त्यांना नुसतां नांवाचा च लागला ! कारण त्या नंतर, **त्यांचे व त्यांच्या सर्व कुटुंबाचे सर्व आचार-विचार व धार्मिक कृत्यें हिंदूधर्मा प्रमाणें च चाललीं होतीं** ! फक्त ते बाटले— जुलुमानें नाममात्र बाटले— होते, बाकी सर्व कुटुंब व ते हि हिंदू च होते ! मी त्या वेळीं जाणता असल्यानें, या सर्व गोष्टी मीं माझे डोळयांनीं प्रत्यक्ष पाहिल्या आहेत. कांहीं कालानें ते वारले. त्यांना एक पुत्र होता. तो तर हिंदू च होता ! मात्र त्याचा जन्म, वडिलांच्या धर्मांतरा नंतर झाला होता, म्हणून त्याला हि हा धर्मांतराचा डाग लागला ! त्याचे वडिलांची व त्याची हि मृत्यू पर्यंत इच्छा होती कीं, आपणांस हिंदूधर्मांत पुन्हां प्रवेश मिळावा ! त्या साठीं त्या दोघांनीं पुष्कळ खटपटी केल्या पण ती गोष्ट बनली नाहीं ! हे दोघे पितापुत्र, आमची पूर्वीची राजधानी महोबा येथें आमच्या राजवाड्यांत च एकीकडे रहात असत. दोघांनीं हि बुंदेलखंडाच्या स्वातंत्र्यार्थ आपले देह अर्पण केले ! या पुत्राची पत्नी सुद्धां, अशा च एका जुलुमानें बाटविलेल्या परंतु अखेर पर्यंत हिंदूधर्म पाळणाऱ्या दुसऱ्या एका रजपूत ठाकुराची मुलगी

होती ! या दोघांची मुलगी ही ' ताई ! ' दिल्लीदरबारच्या सदरुद्दीन नांवाच्या सरदारानें माझे वर स्वारी केली तेव्हां मीं त्यास पिटाळून लाविलें; पण त्या मोहिमेंत ताईचा पिता कामीं आला ! त्याची पत्नी सती गेली ! **शेवट पर्यंत या सर्वांनीं हिंदूधर्मांचें च आचरण केलें**, हें या हकीकती वरून आपल्या सर्वांच्या ध्यानीं येईल च ! त्या वेळीं ताई फार लहान होती. तिच्या पित्यास मीं माझा धाकटा भाऊ च मानी ! ताईला तिच्या आईनें माझ्या व माझ्या पत्नीच्या ओटींत घातलें ! तेव्हां पासून ताईला आम्हीं आमच्या सख्ख्या मुली प्रमाणें वागविलें ! ही **सत्य गोष्ट** दक्षिणेंत फार थोडयांना माहीत आहे. त्यामुळें इकडे तर एक समजूत अशी पसरली आहे कीं ताई ही माझी च बेटी आहे ! या समजुती बद्दल मला कांहीं वाटत नाहीं; उलट अभिमान वाटतो ! पण दुसरी एक जी वार्ता इकडे पसरली आहे, तिचे बद्दल मात्र मला नवल वाटतें; एवढें च नव्हें तर वाईट हि वाटतें...

**पंडितराव**— महाराज ! कसूर माफ ! इकडे अशी वार्ता आहे कीं.... कीं... कीं...

पि— बोला, पंडितराव ! बोला ! आतां तुम्हीं सर्वांनीं **सत्य हकीकत** ऐकली च आहे; तेव्हां लोक काय बाता मारतात, पराचा कावळा कसा बनवितात तें ऐकवा ! मीं हि ती वार्ता ऐकली आहे व मीं तिचा निरास आतां केला च आहे ! तेव्हां सांगा; संकोच करूं नका !

**पंडित**— लोक असें बडबडतात कीं, प्रत्यक्ष महाराजांच्या एका यवन नाटकशाळेच्या पोटीं... क्षमा असावी ! अशी इकडे समजूत... पण आतां महाराजांनीं सर्व सत्य कथा सांगितल्या मुळें, ही इकडील वार्ता म्हणजे पराचा कावळा च होता हें पूर्ण सिद्ध झालें !!

**गुरुदेव**— सर्व मंडळी हो ! महाराज छत्रसालांनीं सांगितलेली **सर्व गोष्ट सत्य आहे** ! मला ही कथा पहिल्या पासून माहीत आहे !

**काकाजी**— मला हि ठाऊक आहे ! महाराजांची कथा **खरी** आहे ! पंडितरावांनीं सांगितलेली वार्ता ज्या लोकांनीं पसरविली, त्यांनीं हें लक्ष्यांत आणलें नाहीं कीं, या गप्पे मुळें, **महाराजांच्या शुद्ध चारित्र्या वर आपण केवढा डाग पाडीत आहों** ! श्रीसमर्थपंथांकित, थोरल्या महाराजांचा शिष्य, हिंदुधर्माभिमानी, शिवप्रभूच्या तुळजेची नित्य पूजा करणारा,

फकीरशाहीचा उपासक, असा हा पुण्यात्मा राजा, यवनी नाटक-शाळेस आश्रय देईल, असें या लोकांना कसें वाटलें? आज राजाजींचें वय ८०।८१ वर्षांचें आहे! ताईस त्यांची बेटी ठरवावयाची तर, राजाजी, ६२।६३ वर्षें पर्यंत म्हणजे उतारवयांत नाटकशाळेच्या मोहांत अडकले गेले होते असें ठरतें! त्यांच्या सारखा धार्मिक व सत्व-शील राजा इतक्या उतारवयांत हि मदनाच्या जाळ्यांत– गर्हणीय जाळयांत–अडकला असें म्हणणें म्हणजे भीष्माचार्य वेश्यासमागमी होते असें च म्हणणें आहे! सारांश दाक्षिणेंत पसरलेल्या या दोन्ही वार्ता बाजारगप्पा आहेत! खरी कथा राजांनीं सांगितली ती च आहे!

हें ऐकून श्रीमंतांना मनांतल्या मनांत फार आनंद झाला. ताईसाहेबांना हीं सर्व च कथा नवीन होती! खरी गोष्ट त्यांना कोणीं हि सांगूं नये अशी महाराजांची सक्त आज्ञा असल्यानें त्यांना ती केव्हां च समजली नाहीं. मूळच्या प्रसंगाला पुष्कळ काळ लोटल्या मुळें व जुनीं माहितगार वृद्ध माणसें बरीचशीं गुजरल्या मुळें, बुंदेलखंडांतील नव्या पिढीस, ताईसाहेब या, महाराजांच्या औरसकन्या, महाराजकुमार हिरदेसा व कुमार जगतराज यांच्या सख्ख्या भगिनी आहेत असें च वाटे! आतां ताईसाहेबांना आपली पूर्वकथा सम-जली! ती ऐकून प्रथम त्यांना वाईट वाटलें पण मागून आनंद झाला!

छ— माझा सुद्धां दुसऱ्या वार्तेवर मुळीं च भरंवसा नव्हता! आतां ताई जरी प्रत्यक्ष महाराजांची कन्या नसली तरी त्यांनीं तिला अगदीं लहान-पणा पासून स्वतःच्या मुली प्रमाणें वाढविलें आहे! शिवाय ती त्यांच्या वंशांतील आहे च!

पि— होय! तेव्हां माझी आपणां सर्वांना विनंती आहे कीं, ताई–माझी ताई–क्षत्रियकन्या आहे! रावसाहेबांना ती द्यावी असा माझा मनोदय आहे! दोघां हि लेकरांचा तो च हेतु आहे! तेव्हां या येथें जमलेल्या सर्वांनीं या विवाहास आपली संमति द्यावी! बाटल्याचा आरोप किती फोल आहे हें मीं सांगितलें आहे. ही नव्हे, हिचे वडील हि नव्हेत तर हिचे आजे बाटले गेले व ते हि नांवापुरते! हिच्या आईचे वडील हि असे च निमित्तमात्र अहिंदू झाले होते! कलमा पढण्याचा च काय तो संस्कार–आणि तो हि जुलुमानें–त्यांना घडला. जुलुमानें मुसुलमानी धर्माचा प्रसार करण्यास

कुराणानें हि बंदी केली आहे ! तशी अल्लाची आज्ञा त्यांत अनेक ठिकाणीं आहे. पन्नासाव्या सुरत मध्यें तर अल्लानें, आँ हजरतां (मुहम्मद पैगंबरां) स स्पष्ट हुकूम केला आहे कीं, " जुलुमानें इतर धर्मपंथियांना आपल्या धर्मांत आणण्या साठीं तुला पाठविलें नाहीं ! " ताईच्या वरील पूर्वजां-खेरीज बाकीची सर्व मंडळी हिंदू च राहिली ! आणि त्या दोघांनीं सुद्धां आपले सर्व आचारविचार व धार्मिक कृत्यें शेवट पर्यंत आमच्या च धर्माचीं आचरिलीं ! त्यांच्या नंतर तर ताई खास माझ्या च राजवाड्यांत असते ! तिचे सर्व आचारविचार व धार्मिक कृत्यें हिंदूधर्मांतर्गत क्षत्रियोचित आहेत !

न्यायाधीश— महाराजांचें म्हणणें असत्य कोण म्हणेल ? पण ब्राह्मण-क्षत्रिय विवाह कसा होणार ?

पि— कां बरें होऊं नये ? त्यास शास्त्राधार आहे; तसें च इतिहासाचा हि आहे. अगस्ती ऋषींची भार्या लोपामुद्रा ही क्षत्रिय राजकन्या होती ! च्यवन ऋषींची पत्नी सुकन्या ही शर्याती राजाची कन्या होती ! कश्यप ऋषींनीं क्षत्रिय कन्या पुलोमेशीं लग्न लावलें ! फार काय, आमच्या घराण्याचे मूळ पुरुष भृगु ऋषि हे तर सम्राट मनूचे जांवई होते ! त्यांची सून दक्षराजाची मुलगी होती ! त्यांचे वंशज ऋचिक यांना गाधीराजानें आपली मुलगी दिली होती ! त्यांचे पुत्र जमदग्नी; यांनीं विदर्भ राजकन्या रेणुकेशीं लग्न केलें ! त्यांच्या पोटीं भगवंतांनीं सहावा अवतार नाहीं का घेतला ? हा इतिहास व हे ऐतिहासिक आधार आपणां सर्वांच्या माहितींतील आहेत ! तेव्हां आतां आडकाठी कोठें राहिली ?

पं— हे आधार लक्ष्यांत घेतल्यास ब्राह्म-क्षात्र विवाहास आडकाठी उरत नाहीं; पण ... ( थोडा विचार करून ) महाराजांना विनंति आहे. ताई-साहेबांच्या पूर्वजांना नाममात्र कां होईना धर्मांतराचा डाग लागला ! तेव्हां या विवाहा पूर्वी त्यांना प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतलें पाहिजे !

छ— होय, पिताजी ! लोकांच्या समाधाना साठीं एवढें करण्यास हरकत नाहीं !

पि— माझी हरकत नाहीं. अशीं उदाहरणें आपण पाहिलीं आहेत. मार-वाडकर अजितसिंह राजे यांनीं आपली मुलगी फर्रुकसियर पातशहास दिली

होती. शहाच्या मृत्यू नंतर ती बापा कडे परत आली; वास्तविक ती बरीं च वर्षे यवनसंसर्गांत होती; पण माहेरीं आल्या वर मारवाडांतील धर्माधिकाऱ्यांनीं तिला **प्रायश्चित्त देऊन परत हिंदूधर्मांत घेतलें** ! ही गोष्ट इकडे फारशी ठाऊक नाहीं ! शिवबा ! पतित पावन करण्याचा अधिकार महाराष्ट्रांत छत्र-पतींचा आहे ! माझा मुद्दा लक्ष्यांत आला काय ?

छ— होय ! मातुश्री जिजाबाईसाहेबांनीं, निंबाळकर घराण्यास पावन करून घेतल्याचें मला माहीत आहे !

श्रीमंत— क्षमा असावी ! मातुश्रींनीं **नुसता शुद्धिसंस्कार केला नाहीं** सरकार ! पण **त्या घराण्यांतील मुलगी आपल्या घराण्यांत करून घेऊन, आपल्या घराण्यांतील मुलगी त्या घराण्यांत दिली आणि असा दोन्हीं घराण्यांचा सोयरीक-संबंध घडवून आणला** !

छ— ( थट्टेनें ) रावसाहेब ! सोयरीक करण्याची फार घाई झालेली दिसते तुम्हांला (श्रीमंतां कडे पाहतात; ते खालीं बघतात) आणि तुला हि घाई झाली वाटतें ताई ? (ताईसाहेबां कडे पाहतात; त्या खालीं बघतात) बरें, पंडितराव ! या **पतितपरावर्तनास** धार्मिक दृष्ट्या तुमची संमति आहे काय ?

पं— आज्ञा ! पूर्ण संमति आहे, सरकार ! महाराजांनीं जी सत्यकथा सांगितली, तिला अनुलक्षून पाहतां, या पतितपरावर्तनास कसली च आडकाठी येऊं शकत नाहीं.

छ— बरें ! ताईनें हें प्रायश्चित्त घेतल्या नंतर रावसाहेबांचा व तिचा विवाह म्हणजे **ब्राह्मक्षात्रिय विवाह** होण्यास धार्मिक दृष्ट्या तुमची संमति आहे काय ?

पं— हा विवाह प्राचीन काळीं प्रचारांत होता, त्या बद्दल शंका नाहीं ! महाराजांनीं त्याचे अनेक दाखले दिले आहेत ! पण अलीकडील काळांत असले प्रसंग घडलेले ऐकिवांत नाहींत...म्हणून थोडासा...विचार पडतो...

छ— मला हें सांगा कीं, यांत अधार्मिक कांहीं नाहीं ना ?

पं— **अधार्मिक** नाहीं पण आजची रूढी तशी नाहीं !

छ— रूढी नसली तर रूढी पाडतां येते ! ती प्रथम कोणीं पाडावी हा प्रश्न येथें येतो; आणि तो सोडविणें बरें च कठीण असतें हें खरें. पण त्याला कोणीं तरी प्रारंभ केला पाहिजे ना ?

नंतर छत्रपति थोडा वेळ विचारांत गढले. मग त्यानी गुरुदेव, काकाजी

व पिताजी यांना एकीकडे घेऊन थोडा वेळ एकांत केला. हे चौघे हि जेव्हां परत आले तेव्हां त्यांच्या सर्वांच्या चेहऱ्यावर आनंद दिसत होता.

छ—– पंडितराव ! या बाबतींत मी एक कल्पना सुचवितों; ती तुम्हांस पटते कां पहा ! ब्राह्मणास ब्राह्मविवाहाप्रमाणें "**गांधर्वविवाह**" हि करतां येतो; क्षत्रियकन्येशीं दुसरा विवाह करणें च अधिक उचित ! सध्यां, तसें पाहिलें तर, रावसाहेब क्षत्रियधर्म च प्रामुख्यानें आचरीत आहेत ! तेव्हां या दोघांचा विवाह **गांधर्वविधीनें** व्हावा म्हणजे क्षत्रियोचित "**खांडेविवाह**" व्हावा ! ताई ही रावसाहेबांची "**खांडाराणी**" व्हावी ! या प्रकारानें रूढीचा प्रश्न आपोआप मिटेल व विवाहाचें धार्मिक स्वरूप हि सर्व प्रकारें सांभाळलें जाईल ! ! गुरुदेवांना, काकाजींना व पिताजींना हि ही योजना मान्य आहे ! ( त्या तिघां कडे वळून ) लेंकराची ही योजना आपणां तिघां वडिलांना मान्य आहे ना ?

तिघांनीं हि "मान्य ! निःसंशय मान्य !" असें म्हटलें.

छ—– काय पंडितराव ! तुम्हांस हा विचार मान्य आहे कीं नाहीं ?

पंडितरावांनीं थोडा वेळ न्यायाधिशाशीं एकांत केला व मग—

पं—– होय, सरकार ! मान्य आहे !

छ—– न्यायाधीश ! तुम्हांस हि मान्य आहे ?

न्या—– आज्ञा ! पूर्ण मान्य आहे !

गुरु—– ( चिकाचे पडद्या कडे पाहून ) बेटी ! सूनबाई ! तुला हि मान्य आहे काय ?

चिकाच्या आड सौ. राणीसरकार बसल्या होत्या ! त्यांनीं म्हटलें—

रा—– वडील मंडळीच्या बाहेर मीं कशी असेन ?

छ—– रावसाहेब ! भाऊसाहेब ! ताई ! आतां फक्त तुमची च संमति पाहिजे आहे ! बोला ! तुम्हांस ही योजना मान्य आहे कीं नाहीं ?

भा—– छत्रपतींची आज्ञा, सेवकास वंद्य च आहे.

श्री—– भाऊ व मी बंधूबंधू च ! अजून आम्ही एकचित्त आहों ! अद्यापि तरी आमच्यांत भाऊबंदकी सुरू झाली नाहीं !

छ—– अस्सें ! संमति देण्यास, राव ! इतका द्राविडी प्राणायाम करावा लागतो वाटतें ! ताई ! आतां तुझी पाळी ! बोल !

**ता—** देवाब्राह्मणांच्या स्वराज्याच्या तक्ताचे छत्रपतीसरकार व महाराणी सरकार यांच्या आज्ञे बाहेर जाण्याची कोणाची प्राज्ञा आहे ?

**छ—** शाबास ! ताई ! पिताजी ! आतां आपल्या मनासारखें झालें ना ! पंडितराव ! न्यायाधीश ! या महत्त्वाच्या कामा साठीं तुम्हांस बोलाविलें होतें ! **धर्मशासनाचा व राजशासनाचा निर्णय** या कामीं घेण्यास गुरुदेवांनीं व पिताजी आणि काकाजो यांनीं आज्ञा केल्या वरून ही सभा भरवून तो निर्णय घेतला. तो अनुकूल लागला ही मोठ्या आनंदाची गोष्ट !

**पि—** होय ! ( उठून छत्रपतीं कडे गेले; छत्रपती हि गादी वरून उठून पुढें आले; त्यांना आलिंगन देऊन गद्गद स्वरानें ) बेटा, शाहु–नव्हे शिवबा– ! तुझे उपकार आहेत हे ! ते मी कसे फेडूं ? बेटा ! तुझी कृति सर्वतोमुखीं होऊन राहील !

छ— पिताजी ! आपण मला तीर्थरूप शंभुराजांच्या ठिकाणीं आहां ! मग लेंकराचे उपकार कसले मानतां ? वडिलांच्या मना सारखें वागणें हें लेंकराचें कर्तव्य च आहे !

नंतर दोघे हि आपापल्या गाद्यां वर जाऊन बसले.

छ— श्रीमंत पंत प्रधान ! इकडे या.

श्रीमंत उठून गादी जवळ आले व वंदन करून उभे राहिले.

छ— ताई ! तूं हि इकडे ये बाळ !

भाऊसाहेब, ताईसाहेबांना घेऊन, गादी जवळ आले. दोघांनीं वंदन केलें व उभे राहिले.

छ— राव ! ताई ! तुमच्या दोघांच्या इच्छे प्रमाणें झालें ?

दोघे लाजून खालीं पाहूं लागले.

छ— ताई ! रावसाहेबांचा प्रतापसूर्य क्रमाक्रमानें अधिकाधिक झळकत चालला आहे ! तो सर्वांचे डोळे दिपवून वरवर चढत आहे ! पण, बाळ ! तुझा हि पराक्रम भाऊसाहेबानें माझ्या कानां वर घातला. तूं **खरी वीरकन्या** ! **धर्मशासनानें व राजशासनानें लवकर च वीरपत्नी होशील** ! माझा–या परम-पवित्र सिंहासनाचा–-आशीर्वाद आहे कीं, तूं **वीरमाता** हि होशील ! राव ! ताई ! तुम्हां दोघांच्या समशेरींनीं या तक्ताची, या दौलतीची सेवा बजाविली आहे. तसा च तुमचा भावी पुत्र हि बजावो ! त्याची हि समशेर या च कर्तव्यांत

चमको! माझी तुम्हां दोघांस आज्ञा आहे कीं, त्याचें पाळण्यांतील नांव "**रामसिंग**" ठेवा, पण लौकिक नांव "**समशेर बहादर**" ठेवा! त्याच्या मुलाचें नांव "**कृष्णसिंग**" ठेवा! बेटी! (गळ्यांतील मोत्यांचा कंठा काढून) लग्नाच्या पूर्वीं च तुझ्या भावाची ही देणगी, हा अहेर घे!

ताईसाहेबांनीं, पिताजी कडे पाहिलें. त्यांनीं घेण्या बद्दल खूण केली. ताईसाहेबांनीं कंठा घेतला. मग तिघांनीं वंदन केलें व तिघे आपापल्या जागीं जाऊन बसले. छत्रपतींनीं चिकाच्या दारा कडे पाहून खूण केली. सौ॰ महाराणीसाहेब व त्यांची दासी बाहेर आल्या! छत्रपति, गुरुदेव व काकाजी खेरीज करून बाकीची सर्व मंडळी उठून उभी राहिली व त्यांनीं महाराणी-साहेबांना वंदन केलें. मग छत्रपति गादी वरून खालीं उतरले व महाराणी सह हात जोडून पिताजी जवळ आले. पिताजी हि गादी वरून उठून पुढें झाले.

छ— बुंदेलखंडाधिपति! पन्नानरेश! महाराज छत्रसालजी! आमच्या चाली प्रमाणें, आमच्या पंत प्रधानां साठीं, आम्हीं उभयतां आपल्या कन्येची मागणी करण्यास आलों आहों!

पि— (हात जोडून) देवाब्राह्मणांच्या राज्याचे छत्रपति शाहूमहाराज! माझी कन्या, आपल्या पंतप्रधानांस देण्यास मी मोठ्या आनंदानें सिद्ध आहें!

इतक्यांत गजरेनें एक सरपोस घातलेलें सोन्याचें तबक महाराणीसाहेबां-च्या पुढें केलें. त्यांनीं सरपोस दूर केला व त्यांतील जडावाचा करंडा हातांत घेऊन, ताईला हांक मारली.

**महाराणी**— बाळ! ताई! पुढें ये.

ताईसाहेब पुढें झाल्या.

**महाराणी**— बाळ! अखंड सौभाग्यवति हो!

असें म्हणून त्यांनीं करंड्यांतील कुंकु घेऊन ताईसाहेबांच्या कपाळास लावलें. तसें च दुसऱ्या करंड्यांतून हळद घेऊन ती हि कपाळास लाविली आणि तिसऱ्या करंड्यांतील शेंदूर घेऊन तो त्यांच्या भांगांत भरला! तबकांत बहुमोल लफ्फा होता, तो घेऊन त्यांच्या गळ्यांत घातला आणि माणकाचीं कर्णफुलें — कुडीं — त्यांच्या कानांत चढवून, भरजरी बादली (अस्मानी रंगाची अत्यंत पातळ) ओढणी अंगा वर घातली! दुसरें एक सोन्याचें

तबक — यांत बहुमोल अलंकार होते – गजरेनें दिलें तें घेऊन ताईसाहेबां-च्या हातीं दिलें. ताईनीं तें घेतलें व रतनच्या जवळ दिलें ! मग ताईसाहेबानीं महाराणीसाहेबांना वंदन केलें.

**महाराणी**— रावसाहेब ! इकडे या.

श्रीमंत पुढें झाले.

**महाराणी**— जाऊबाईना कंठा मिळाला पण तुम्ही तसें च राहिलां ! ( गळ्यांतील पंचरत्नांची कंठी काढून ) वधूचा गळा सजला मग वराचा गळा ओका ओका कसा ठेवावा ? ही कंठी गळ्यांत घाला ! ही मूळची आजे सासूबाईची आहे ! त्यांनीं सासूबाईना व त्यांनीं मला दिली आहे ! ही घ्या !

रावसाहेबांनीं मोठ्या आदरानें ती घेऊन गळ्यांत घातली व मासाहेबांना वंदन केलें ! मग सर्व मंडळी पुन्हां आपापल्या आसनां वर बसली. मासाहेबां-नीं गुरुदेव व काकाजी यांना नमस्कार केले; त्यांनीं आशीर्वाद दिले व मग मासाहेब आपल्या जागीं परतल्या.

छ— पंडितराव ! मुहूर्त फार लांबचा धरूं नका ! ( पिताजीं कडे पाहून, हंसून ) पिताजी ! हें लग्न संपे पर्यंत आपलें पहिलें नातें एकीकडे ठेवून दुसरें अंमलांत आणावें लागणार ! आपण वधूपिते व मी वरपिता, म्हणजे आपण व्याही व्याही होणार ! ( काकाजी कडे पाहून ) काकाजी ! आपला हा अधि-कार मीं घेऊं ना ?

**का**— ( हंसून ) अवश्य ! पोतदारां पेक्षां, छत्रपति वरपिता होणें हें च अधिक योग्य ! पण राजेश्री ! मागें ताईला सांगितलें होतें तें आतां हि सांगतों ! ( हंसून ) आमच्या जोसपणाची लग्नघटिकापात्राची जी काय शिवराई आम्हांस मिळण्याचा हक्क आहे, तो मात्र मीं सोडणार नाहीं !

**गुरु**— ( हंसून ) तो प्रश्न मी सोडवितों ! माझा मुक्काम राजाजीं कडे राहील ! माझ्या हातां खालीं चिरंजीव भाऊ राहील म्हणजे तो कोठीदार – पोतदार – होईल ! काकाजींचा मुक्काम वरपित्या कडे राहील ! मग घटिका-पात्र दक्षणेचा हक्क चुलतापुतण्यांनीं वांटेल तसा मिटवावा !

या नंतर ही छोटी मंत्रसभा संपली.

दुसरे दिवशीं मोठा दरबार भरला. राजवाड्याच्या दिवाण – इ – आम मध्यें हा दरबार भरला होता. दरबाराची मिसल पुढील प्रमाणें होती.

दिवाणखान्याच्या पश्चिमे कडील भिंतीस टेकून पूर्वे कडे तोंड करून छत्र-चामरयुक्त रत्नजडित सिंहासन होतें. त्यावर छत्रपति बसणार होते. सिंहासनाचे मागें मोर्चलें चवऱ्या, पंखे, पानदान इत्यादि सामान हातांत घेतलेले हुजरे होते. तशीं च अकरा विश्वासु व शूर पंचहत्यारी आप्त माणसें होतीं. सिंहासनाचे – महाराजांचे – उजवे हाता कडे अनुक्रमें प्रतिनिधि, पेशवे, अमात्य, सचिव, मंत्रि, चिटणीस, परराज्यांतील वकील, कारभारी, मुत्सद्दी, सुभेदार, नायब सुभेदार, मामलेदार, किल्लेदार इत्यादि मंडळी बसली होती. छत्रपतींचे डावे हाता कडे अनुक्रमें पंडितराव, सेनापति, सुमंत, न्यायाधिश, फडनवीस, सेनाधिकारी, सरदार, शूर एकांडे व धारेकरी ही मंडळी होती. प्रत्येक अधिकाऱ्याचे मुतालीक ( सेक्रेटरी ) व मुख्य कारकून ( चिटणीस ) आपापल्या अधिकाऱ्याचे मागें होते. तसें च दोन्हीं बाजूंस सर्वांच्या मागें अठरा कारखाने ( गजशाळा; पानीयशाळा व उष्ट्र – रत्न – शस्त्र – रथ – शिबीर – मल्ल – जिन्नस – अंबर – यंत्र म्हणजे तोफ – शिकार – लेखन – पाक – नट – नगारा – तांबुल – वैद्यशाळा ) आणि बारा महाल ( अंतःपुर – भांडारद्रव्य – धान्यकोठी – अश्वपागा – गोथट्टी – आरामबाग – टंकशाळा – शिबिकादियानें – इमारत – सौदागिरी – वस्त्रागार – छबिना ) यांचे अधिकारी, हवालदार व नाईक ही मंडळी उभी होती.

या शिवाय नगरांतील शेट सावकार, प्रतिष्ठित मंडळी, वैदिक ब्राह्मण व इतर सरकारी अधिकारी उजव्या डाव्या बाजूंस अर्धचंद्राकार बसले होते. बंदी, भाट, वेत्रधारी, मिर्धे, भालदार, चोपदार उभे होते.

या प्रमाणें दरबार – राजसभा – पूर्ण भरला. थोडया वेळानें भालदार ललकारला—

**भा**— निगाह् रक्खो, महाराज !

सर्व दरबार उभा राहिला ! सिंहासना जवळील पश्चिमेच्या द्वारानें महाराज छत्रपति, महाराज छत्रसालजी, गुरुदेव व काकाजी आले. सर्वांनीं त्यांना मुजरे केले ! गुरुदेव व काकाजी सिंहासना शेजारीं तितक्या उंचीच्या एका च मृगासनावर बसले. छत्रपति व पिताजी, सिंहासना जवळ आले. त्यांनीं सिंहासनास वंदन केलें. छत्रपतींनीं, पिताजींचा हात धरला व दोघे हि सिंहासना वर शेजारीं शेजारीं बसले ! पुन्हां राजसभेनें मुजरे केले. छत्रपतींनीं

खूण केल्या वर सर्व सभासद आपापल्या आसनां वर बसले. मग पहिला चोपदार ललकारला !

चो— निगाह् रक्खो महाराज !

**" मन कवि भूषनको सिवकी भगति जीत्यो । सिवकी भगति जीत्यो साधुजन सेवाने । साधुजन जीते या कठिन कलिकाल । कलिकाल महाबीर महाराज महिमेवाने । जगतमैं जीते महाबीर महाराजन ते । महाराज बावन हू पातसाह लेवाने । पातसाह बावनो दिल्लीके पातसाह । दिल्लीपति पातसाहै जीत्यो हिन्दूपति सेवाने ॥ "**

भूषण— ( उठून ) म्हणजे, भूषणकवीच्या मनास शिवभक्तीनें, शिवभक्तीस साधुजनांच्या सेवेनें, साधुजनांस कलिकालानें, कलिकालास शूर आणि कीर्तिवान राजे लोकांनीं, या राजांना बावन पातशहांस जिंकणाऱ्या दिल्लीपतीनें व त्या दिल्लीपति पातशहास हिन्दूपति शिवाजी ( शाहू ) नें जिंकलें आहे ! !

मग दुसरा चोपदार ललकारला—

चो— निगाह् रक्खो महाराज !

**" शंभु तनै सरजा सिवाकी सभा जामधि है । मेरु वारी सुरकी सभाको निदरती है । भूषण भनत जाके एक एक सिखरते । केते धौं नदी नदकी रेल उतरती है । जोन्हको हंसाति जोति हीरा मनिमंदिरन । कंदरनमैं छवि कुहू कि उछरति है । ऐसो ऊंचो दुरग महाबालिको जामैं । नखतावली सो बहस दिपावली धरति है ॥ "**

भू— म्हणजे, शंभुपुत्र शिवाजी ( शाहू ) ची ही राजसभा मेरु पर्वतावरील देवसभेला हि तुच्छ लेखणारी आहे ! भूषण म्हणतो ह्या ( अजीमताऱ्या ) च्या एकेका शिखरा पासून कित्येक नदीनदांचे प्रवाह धों धों वाहत आहेत. ( किल्ल्या वरील ) मंदिरांतील हिरेमाणकादि रत्नांची प्रभा चंद्रप्रकाशास लाजविणारी आहे ! कारण या प्रभेनें ( गडावरील व भोंवतालील ) दऱ्याखोऱ्यांतील आमावास्येचा अंधार पार पळवून लाविला आहे ! महा बलवान् अशा शिवप्रभूचा ( अजीमतारा ) हा गड इतका उंच आहे कीं, ( आकाशांत चमकणाऱ्या ) तारांगणामुळें त्यावर नेहमीं दीपावलीची शोभा विराजत आहे ! ! गुरुदेव ! काकाजी ! छत्रपति सरकार ! बुंदेला नरेश !

आणि सर्व सभासद हो ! आजची ही सभा मोठ्या आनंदाची आहे ! श्रीमंत पंत प्रधान यांनीं सरदार भाऊसाहेब पोतदार यांच्यांसह, बुंदेलखंडांत, दिल्लीच्या अत्याचारी साम्राज्यावर जो विजय मिळविला त्याच्या आनंद प्रदर्शनार्थ हा दरबार भरविण्यांत आला आहे ! या दोघां महावीरांनीं गुरुदेव, काकाजी यांच्या सल्ल्याप्रमाणें वागून, राजपुतान्यास देवतार्चनांत ओढून त्याच्या मदतीनें दिल्लीच्या अत्याचारी साम्राज्याचा नाश करून तेथें आमचें देवाब्राह्मणांचें राज्य—फकीरशाही—स्थापावयास पातशहास भाग पाडलें ! त्याची कबुली ज्या पातशाही खास पंजाच्या फर्मानांत आहे, तें ( कमरबंदांतून थैली काढून ) हें पहा !

असें म्हणून कविराजांनीं थैलींतून फर्मान काढलें व मुख्य चिटणविसांच्या हातीं दिलें. त्यांनीं प्रथम तें मूळच्या भाषेंत—फारशींत—वाचलें व मग त्याचा मराठी तर्जुमा करून सभेस ऐकविला आणि सिंहासना पुढें जाऊन वंदन करून तें छत्रपतींच्या हातीं ठेविलें.

छ— आपण सर्वांनीं शहाची, ही कबुली ऐकली. आम्हीं शहाची आमच्या नातवाची विनंति मान्य करतों !

काकाजी— या फर्मांना वरून स्पष्ट झालें कीं आमच्या मनोदयाप्रमाणें नव्या दिल्लीस फकीरशाही स्थापन होऊन ती येथल्या फकीरशाहींत पूर्णपणें विलीन झाली ! हिंदूमुसुलमानांची एकी प्रस्थापित झाली ! या फकीरशाहीचें स्वरूप म्हणजे दुष्टांचा नाश व सुष्टांचे पाळण ! हें च थोरल्या महाराजांचें व्रत होतें व तें च आज हि शाहुमहाराज चालवीत आहेत. या व्रताचरणांत जाति–कुल–धर्म याचा संबंध येत नाहीं ! थोरल्या शिवबां प्रमाणें च धाकटे शिवबा हि हिंदुमुसुलमानांना सारखें च लेखतात. हिंदूंच्या सगुणोपासनेला हे जितका मान देतात तितका च मान मुसुलमानांच्या निर्गुणोपासनेला हि देतात ! " चाहत निर्गुण–सगुणको ज्ञानवंतकी बान ! प्रगट करत सगुण–निर्गुण शिवा निवाजी दान ! " श्रींनीं सांगितलें च आहे ना ? " सद्रूप चिद्रूप आणि तद्रूप । सस्वरूप म्हणिजे आपलें रूप । आपलें रूप म्हणिजे अरूप । तत्वनिर्शनाउपरी ॥"

गुरु— श्रींचें म्हणणें सत्य च आहे. " मही निर्मिली देव तो वोळ-

खावा। जया पाहतां मोक्ष तत्काळ जीवा। तया निर्गुणालागीं गुणिं पहावें। परी संग सोडून सूखें रहावें॥"

थोरल्या राजेश्रींचा द्वेष मुसुलमान जातीशीं नव्हता किंवा मुसुलमानी सत्याचरणी राज्यांशीं हि नव्हता. तर त्या समाजांत केवळ अत्याचारी साम्राज्यशाही मुळें शिरलेल्या दुष्ट मनोवृत्तींशीं तथा त्या मनोवृत्ती निर्माण करणाऱ्या त्या असत्याचरणी, हिंसाप्रधान साम्राज्याशीं होता! त्यांनीं मशिदी, कुराण किंवा मुस्लीम स्त्री, या कोणाचा हि अपमान केला नाहीं! त्यांच्या सैन्यांत व अधिकाऱ्यांत मुसुलमान होते. मुसुलमान अधिकाऱ्यांच्या हाताखालील सेवकांनीं त्या अधिकाऱ्यांचा हुकूम मोडल्यास त्यांना शिक्षा करण्यास राजेश्री मागें घेत नसत! तुम्हां सर्वांना माहीत असेल कीं, त्यांचा वजारतमाब (आरमाराधिपति) दौलतखान होता. त्यानें जंजिरेकरांवरील एका मोहिमेंत, प्रभानवल्लीच्या एका ब्राह्मण सुभेदारास एक हुकूम केला असतां, सुभेदारानें त्यांत कुचराई केली! तेव्हां राजेश्रींनीं त्याला जरबेचें आज्ञापत्र पाठविलें! त्यांतील मुद्याचे शब्द मला आठवतात. ते असे होतेः— "... तुम्हांसारखे ऐसे नादान थोडे असतील! ... एवढी, हरामखोरी तुम्हीं केली. ... त्या वरी साहेब (महाराज) रिझतील (गप्प बसतील) कीं काय? हे गोष्ट घडायची नाहीं. .... न कळे! हबशीयांनीं कांहीं देऊन तुम्हांला आपले चाकर केले असतील! ... तरी ऐशा चाकरास ठिकेठीक केलें पाहिजेत! ... ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा (दुर्लक्ष) करूं पहातों? ... गनिमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून, बरा नतिजा (शिक्षा) तुम्हांस पावेल! ...." म्हणजे ब्राह्मण म्हणून त्यास क्षमा केली नाहीं! अथवा मुसुलमान अधिकाऱ्याविरुद्ध हिंदू अधिकाऱ्यास उचलून धरलें नाहीं! तसें च एकदां, एका मराठा म्हणजे क्षत्रिय अधिकाऱ्यानें, एका ब्राह्मणास, विना कारण तरवारीनें जखमी केलें असतां, राजेश्रींनीं, "मराठा होऊन, ब्राह्मणा वरी तरवार चालविली!" म्हणून क्रोधाचे शब्द काढून त्यास शिक्षा केली! या वरून, त्यांना, स्वतःच्या वर्णानें म्हणजे क्षत्रियानें, "आपल्या वर्णाचा छत्रपति आहे, तेव्हां ब्राह्मण वर्णाचा छळ वाटेल तसा व तितका करावा," हें तत्त्व बिलकूल नापसंत होतें हें स्पष्ट ठरतें!! त्यांनीं ब्राह्मण—क्षत्रिय वाद केव्हां च निर्माण केला

**नाहीं, कोणीं केल्यास तो मोडून काढला !** चिटणिसांस हें स्मरत असेल ! जेथें हा वाद नव्हता तेथें ब्राह्मण–ब्राह्मणेतर, हिंदुमुसुलमान असले वाद तरी कसे निर्माण होणार ? **सर्व वर्ण व सर्व जाती–तथा सर्व धर्म–आपआपल्या परी श्रेष्ठ आहेत, हें समजून, त्या सर्वांच्या हस्तें च राजेश्रींनी** ( सिंहासना कडे बोट दाखवून ) **हें सिंहासन स्थापिलें !** म्हणून तुकारामबाबांनीं म्हटलें कीं, " यातायाती–धर्म नाहीं विष्णुदासां । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं । वर्णअभिमानें कोण जालें पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ "

**या सिंहासनाच्या सत्ते खालीं सर्व जनता परस्पर प्रेमानें वागत होती. त्यांच्यांत समझौता होता, कोणत्या हि प्रकारचें भांडण नव्हतें. अल्लानें, " व स्सुलहु खैरुन् "** अशी भांडणा ऐवजीं समझौत्याची च आज्ञा निरनिराळ्या जातींना केली आहे, ती ध्यानांत ठेवा.

**काका— त्यांची राजनीति** कशी होती हें थोडक्यांत सांगतों. चिपळूण येथील पागांच्या जुमलेदारांना त्यांनीं जें आज्ञापत्र पाठविलें त्यांत या राजनीतिचें स्वरूप आढळतें ! **प्रत्येक राजानें, शहानें, हिंदूनें, मुसुलमानानें, ब्राह्मणानें, मराठ्यानें, हरिजनानें तें आज्ञापत्र एकदां तरी वाचून पहावें !** आज्ञापत्र पाठविलें त्या वेळीं मी दरबारांत होतों. येथील राजलेखशाळेंत त्या पत्राची स्थळप्रत आहे. माझ्या आठवणींत त्यांतील निवडक शब्द अजून हि आहेत ! " बेगमी केली पाहिजे ... यादी धरून वर्तणूक करणें ... धुंदी करून नाहींशी झाली म्हणजे उपास पडतील ... घोडीं मरायास लागतील ... मग **विलायतेसी** ( स्वराज्यांतील प्रांतांस ) **तसवीस** ( त्रास ) देऊं लागाल ... म्हणजे कुणबी जाऊं लागतील...कित्येक **उपासी मराया** लागतील ! म्हणजे त्यांना ऐसें होईल कीं, **मोगल, मुलखांत आले, त्याहून हि अधिक तुम्हीं** ( जुलमी ) **! ऐसा तळतळाट होईल ! ! ...** रयतेची व घोड्यांची **सारी बदनामी तुम्हां वरी येईल ! ...... रयतेस काडीचा आजार ( उपसर्ग ) द्यावया गरज नाहीं !** ... ज्या ( शिपाई, अधिकारी ) ला जें पाहिजे तें दाणा ... गवत, फांटे ( लांकूड, जळण ), भाजीपाले व वरकड, तें **विकत** आणावें... **कोण्हां वरी जुलूम अगर ज्याजती ( पीडा ) अगर कोण्हांसी कलागती करावयाची गरज नाहीं !** .... येणें प्रमाणें वर्तणूक करितां, ज्या पासून अंतर पडेल, ज्याचा

गुन्हा होईल, बदनामी ज्या वर येईल, त्यास खळ समजोन जाजती ( सरकारी शिक्षा ) केल्या वेगळें सोडणार नाहीं ! मराठ्यां ( क्षत्रियां ) ची ( कारण ते छत्रपतींच्या जातीचे आहेत म्हणून ) तों इज्जत वांचणार नाहीं ! ! .... हें बरें जाणून वर्तणूक करणें ! " असे हे हिऱ्या प्रमाणें त्या प्रभूचे तेजस्वी शब्द आहेत ! यांत, रयतेची कळकळ, वेठ बेगार न धरणें, लष्करी शिस्त, जुलमी साम्राज्य व हिंदवी स्वराज्य यांतील फरक, दूरदर्शीपणा, अन्याया बद्दल शिक्षा देणें, राज्यकर्त्यांच्या जातीस, अन्याय झाला असतां पाठीशीं न घालणें, हिंदूमुसुलमानादि सर्व धर्मांच्या रयतेस पोटच्या पोरां प्रमाणें वागविणें इत्यादि बहुमोल गुणांचा समन्वय झालेला आहे ! जुलूम नाहींसा करून तेथें शांति प्रस्थापित करणें हें च त्यांचें कार्य होतें ! मीं एकदां त्यांना असें म्हटलें हि होतें कीं:— " तेरी धाक धुंधरि धरामें, अरु धाम-धाम । अंदाधुंद आंधीसी हमेस हहरात हैं । " सारांश, त्यांच्या पराक्रमानें अत्याचारी साम्राज्यांत व त्यांतील घरादारांत जी जुलमाची अंदाधुंद माजली होती ती नाहींशी होऊन तेथें सुख व शांति पसरली ! हें त्यांचें व्रत आजचे छत्रपति पुढें चालवीत आहेत, हें त्यांना भूषणावह आहे.

पिताजी — गुरुदेव, काकाजी व कविराज यांनीं जें थोरल्या महाराजांसंबधीं सांगितलें तें शब्दशः सत्य आहे ! मी त्यांच्या दर्शनास आलों असतां, त्यांनीं असला च उपदेश मला केला होता. त्या उपदेशा प्रमाणें, श्रीमहाकालानें आज पर्यंत माझ्या हातून वर्तन घडविलें. जों पर्यंत दिल्लीदरबार, मोंगल पातशाही सत्याचरणानें वागत होती, तों पर्यंत माझें तिच्याशीं मैत्रीचें नातें होतें. जेव्हां त्या साम्राज्यानें असत्याचरणास, अनीतीस, अत्याचारास प्रारंभ केला व कहर माजविला, तेव्हां त्या जुलमाचा नायनाट करण्या साठीं च मीं तरवार— ही थोरल्या महाराजांनीं प्रसाद म्हणून दिलेली तुळजामाता— हातीं धरिली ! आजचे छत्रपती हि आपल्या पूज्य पितामहांचा च कित्ता गिरवीत आहेत ! त्यामुळें च माझें परवांचें संकटांत त्यांनीं टांकोटांक मला सहाय्य केलें. " जब लग गज बल अपनो बरत्यो, नेक सरो नहिं काम । निर्बल व्है बल राम पुकाऱ्यो, आये आधे नाम । सुनेरी मैनें निर्बल के बल राम ॥ " असे हे छत्रपति बलराम आहेत; शिवाय,

**" बंद कीने बलख सो बेर कीनो खुरासान। कीनी हबसान पर पातसाही पलही ॥ बेदर कल्यान घमसान कै छिनाय लीने। जाहिर जहान उपखान येही चलही ॥ जंग करि जोर सों निजामसाहि जेर कीनी। रनमें नमाय मेरे छलकबल ही। ताके सब देस लूटि शंभूके सिवराज कूटी। फौज अजौं मुगलन हाथ मलही ॥"**

छ— गुरुदेव ! काकाजी ! पिताजी ! कविराज ! आपण सर्वांनीं जी माझी प्रशंसा चालविली आहे, ती अनाठाई आहे. थोरल्या महाराजांची उपमा मला मुळीं च शोभत नाहीं ! कोठें थोरले आबासाहेब व कोठें मी ! **त्यांचें नुसतें नांव घेतल्यानें त्यांची थोरवी येत नाहीं !** योग्यता लाभत नाहीं ! इतकें च कीं, त्यांनीं घालून दिलेले धारे पाळण्याचा शक्य तो प्रयत्न करीत असतों ! पिताजी ! आपण बालकाची स्तुति करून त्यास कां लाजवितां ? आम्हां सर्व हिंदवी–स्वराज्याच्या सेवकांना आपण थोरल्या महाराजांच्या ठिकाणीं आहां ! आमची सेवा घेण्याचा पिताजींचा हक्क च आहे ! आम्ही सेवाचोर झालों तर पतित ठरूं. बुंदेलखंडा वरील संकट म्हणजे महाराष्ट्रा वरील–स्वराज्या वरील–संकट होय. परस्परां वरील संकट वारण्यास परस्परांनीं बद्धपरिकर असलें पाहिजे ! **बुंदेलखंड पूर्ण स्वतंत्र झालें;** आतां शहाच्या विनंतीस मान देऊन **दिल्ली हातां खालीं घालतां येईल म्हणजे तेथें आमचें रामराज्य स्थापितां येईल !**

प्रतिनिधि— ( उठून व छत्रपतींना वंदन करून ) सरकारांचें म्हणणें खरें आहे !

छ— प्रतिनिधि ! आज माझें म्हणणें तुम्हांस खरें वाटलें, पण पूर्वीं वाटत नव्हतें, खरें ना ? पंत प्रधानांचें म्हणणें तरी माझ्या म्हणण्याहून काय निराळें असतें ? पण, त्यांच्या व भाऊंच्या म्हणण्यास आज पर्यंत **तुम्हीं व तुमचा पक्ष** सतत विरोध च करीत आलां ! हे दोघे दूर देशीं मोहीमशीर असले आणि त्यांच्या पराक्रमाच्या वार्ता येथें आल्या म्हणजे तुम्हां मंडळीच्या पोटांत **धस्स** होई ! **आणि तुमच्या हातून तसले पराक्रम होत नसल्यानें तुम्हीं माझा व महाराष्ट्राचा बुद्धिभेद करीत असां ! तुम्हीं व तुमचा पक्ष स्वतःस बुद्धिप्रामाण्यवादी म्हणवितां, पण तुमच्या या बुद्धीचा उपयोग स्वराज्य वाढविण्या कडे झालेला मला फारसा आढळला नाहीं !** राव–भाऊ यांना व त्यांच्या पक्षाला **अपशब्द बोलण्यांत** मात्र आढळला ! **प्रति-**

निधीच्या गादी वर बसून हा च उद्योग करतां काय? पुन्हपुन्हां लोकांत बरळतां कीं, " महाराजांनीं ( म्हणजे मीं ) मला बोलावून आणून प्रतिनिधि-पद दिलें! " पण या बकव्यांत काय अर्थ आहे? तुम्हीं माझा हेतु ध्यानांत धरून त्या प्रमाणें स्वराज्य वर्धिष्णु कराल, निदान जो करणारा आहे त्याचा पाठपुरावा तरी कराल, या आशेनें मीं तुम्हांस प्रतिनिधीचें पद दिलें! पण तुम्ही नादान निघालां, नाकर्ते बनलां! आणि उलट राऊ-भाऊ या महात्म्यांच्या जोडीला नांवें ठेवतां? धिःकार असो तुम्हांला! असलीं कृत्यें करून कोणत्या नरकाचें साधन बनणार? ही जोडी म्हणजे या स्वराज्याची रामलक्ष्मणांची जोडी! थोरले नाना व काकाजी यांनीं च प्रथम मला मदत केली! मुख्यतः त्या दोघांच्या मुळें च ही गादी आम्हांस मिळाली. सेनाकर्ते व धनदाते यांची म्हणजे फौज व पैका यांची जोड लाभली नसती तर खानदेशातून च आम्हांस परत फिरावें लागलें असतें! जोशांनीं पायीं पैजारा बांधोन, आम्हास गादी वर बसविण्या साठीं धनसंचय केला! थोरल्या महाराजां पासून च काय पण शहाजीमहाराजां पासोन या दाघांच्या पूर्वजांनीं आमच्या घराण्याची एकनिष्ठेनें सेवा केली आहे. हे पिढीजाद नकींचे सेवक! तुम्ही अलीकडील! आम्ही औरंगझेबा पाशीं असतांना आमची काळजी कोणीं घेतली? आमच्या सुटकेच्या प्रयत्नांत प्रमुख अंग कोणाचें होतें? सुटके नतर मातबर सरदारांना आमच्या कडे आणण्याचें कार्य कोणीं केलें? दिल्लीहून स्वराज्याच्या सनदा कोणीं आणल्या? मातोश्रींना कोणीं सोडाविलें? निजामास व दिल्लीवाल्यास जेर कोणीं केलें? हिंदूमुसुलमानांची एकी करण्याचें असिधारा-व्रत पार पाडून दिल्लीच्या अत्याचारी साम्राज्याच्या ठिकाणीं आमचें रामराज्य कोणीं स्थापलें? तशी कबुली शहा कडून कोणीं मिळविली? पिताजींचा गजेन्द्रमोक्ष कोणीं केला? या आमच्या भट-जोशांनीं च ना? या महा-त्म्यांनीं च कीं नाहीं? आणि प्रतिनिधि! तुम्हीं? तुम्हीं काय केलें? यांच्या विरुद्ध माझें मन बिघडाविण्याचा सतत प्रयत्न केला! तुम्हीं व तुमच्या पक्षानें नानाप्रकारचे देशबुडवे वाद उत्पन्न केले! त्या पैकीं च देशस्थ-कोंकणस्थ वाद होय! " ही कोंकणस्थ मंडळीं महाराजांना बाजूस सारतील! बाजीराव हे प्रसंगीं आपणांस हि बाजूस सारण्यास चुकणार नाहींत, यांना

मोकळें सोडणें घातक आहे!" असें तुमचें व तुमच्या पक्षाचें सतत म्हणणें! पण मागचा इतिहास काय सांगतो? तुमचे वडील **परशुरामपंत हे देशस्थ** आणि हुकमतपन्हा **रामचंद्रपंत हे हि देशस्थ;** पण त्यांची आपापसांत चुरस होती कीं नाहीं? **तुमच्या वडिलांच्या कारवाईनें, मातोश्री ताराबाईंनीं त्या स्वराज्याच्या एकनिष्ठ अमात्यास चांदीची बेडी घातली कीं नाहीं?** अमात्य तर कोंकणस्थ नव्हते ना? आणि आतांचा इतिहास तरी काय सांगतो? **निजामाकडोन स्वराज्याचें अकल्याण करण्या साठीं वऱ्हाडांत जहागीर उपटणारी व्यक्ति-पंत! प्रत्यक्ष तुम्ही-तर कोंकणस्थ नाहीं ना? निजामाला मिळून घरभेदेपणा करणारी बरीचशी मंडळी तुमच्या पक्षांत आहे** आणि ती बहुतेक देशस्थ आहे! वास्तविक **हा वाद मूर्खपणाचा** आहे. येथें तुमच्या पक्षांतील बरी च मंडळी हजर आहे. **अष्टप्रधानांत हि यां पैकीं कांहीं व्यक्ति आहेत!** मीं प्रत्यक्ष नांवें घेत नाहीं! **ज्याचें त्यानें उमगावें.** वास्तविक तुम्ही रावसाहेबां पेक्षां पोक्त! असें असोन तुम्हीं त्यांना **'आमच्या लाडानें बिघडलेलें पोर' समजतां! तुम्हांस त्यांचा मत्सर वाटतो.** वास्तविक साहसाच्या ठिकाणीं श्री वसते. खरें म्हटल्यास **तुमच्या मुळें त्यांचे हात आंखडले गेले. त्यांना मदत न करतां उलट त्यांचे पाय मागें ओढून "कर्णाटकचा बार फुकट गेला!" अशी त्यांची थट्टा करतां! या बद्दल तुम्हांस लज्जा वाटली पाहिजे!** बरें आम्हीं स्वतः मुलुखगिरी वर निघाल्यास, **स्वतःचा भेदरटपणा झांकला जावा** म्हणोन "प्रत्यक्ष दिल्लीच्या पातशहासीं लढण्याचा प्रसंग येईल तेव्हां च स्वामींनीं मोहीमशीर व्हावें" असा आम्हांस सल्ला देतां, हें काय आम्हीं जाणीत नाहीं? हा दक्षिण-उत्तर वाद तुम्हीं च माजविला! त्यांत रावांचें म्हणणें च योग्य होतें. तें मला पटलें. आजच्या प्रसंगानें-दरबारानें-**जे डोळस असतील, ज्यांच्या डोळ्यांत मत्सराचे वडस वाढले नसतील त्यांना हि तें पटेल!** अस्तु. प्रतिनिधि! व त्यांचे सहाय्यकारी मंडळीनों! तुम्हांस शिक्षा करण्याचा आमचा हेतु नाहीं; पण खरा प्रकार काय आहे, माझ्या अंतरंगांतील प्रेम कोणां वर व कोणत्या गुणां साठीं आहे, हें एकदां स्पष्ट बोलून दाखविणें भाग होतें. **दौलतींतील तमाम कारस्थानें व निरनि-**

**राळया अधिकाऱ्यांची करामत मीं ओळखून आहे !** हें लक्ष्यांत ठेऊन सर्वांनीं **सावधानतेनें** या पुढें वागावें ! !

छत्रपतींचें या प्रमाणें भाषण चालू असतां सर्व राजसभा चित्रवत् स्तब्ध होती ! प्रथम त्यांनीं सौम्यपणें भाषणास सुरुवात केली पण पुढें जेव्हां **स्वराज्यांतील देशबुडव्या व्यक्तींचे कारभार** ते उघड करून दाखवूं लागले तेव्हां त्यांचा स्वर चढीस लागला, आणि त्या व्यक्ती जेव्हां त्यांच्या डोळ्या पुढें बसलेल्या त्यांनीं पाहिल्या तेव्हां त्या डोळ्यांतून आतां अग्नि बाहेर पडून त्यांत त्या **देशद्रोह्यांची रक्षा होणार** कीं काय असें सभेस वाटूं लागले ! पण महाराज छत्रपति आशुतोष सांबाचा अवतार असल्यानें त्यांनीं थोड्या वेळानें पुन्हां शांतपणा अंगीं आणला ! !

**काकाजी— असल्या रिकामटेकड्या वादां पैकीं च साधूसाधूंतील उपदेशभिन्नत्वाचा वाद आहे,** वास्तविक जो सत्स्वरूपीं मिळाला तो **साधु;** आणि **स्वरूप तर एक च** आहे म्हणजे सर्व साधू **अभिन्न** व त्यांचा उपदेश हि **अभिन्न** आहे, असें श्री समर्थांचें च म्हणणें आहे. असें असतां **श्री च्या च दोन पट्ट महंतांच्या उपदेशांत जमीन अस्माना इतकें अंतर आहे असें, श्रीनिवासराव ! तुमचें म्हणणें असून, तें तुम्हीं महाराष्ट्राच्या अविवेकी जनतेंत फैलावण्याचें काम चालू ठेविलें आहे. शहाणी जनता तुमच्या या कारवाईस फशीं पडली नाहीं.** सत्यासत्य, हिंसा-अहिंसा हा तो वाद. तुमचें म्हणणें, "श्रीसमर्थांचे एक पट्ट शिष्य महंत दादाजी यांनीं आपल्या गीते वरील "कर्मयोगशास्त्र" नांवाच्या टीकाग्रंथांत जी नीति सांगितली आहे, ती, श्रीसमर्थांचे दुसरे पट्ट शिष्य महंत बापूजी यांनीं आपल्या गीते वरील च "अनासक्तियोग" नांवाच्या टीकाग्रंथांत जी नीति सांगितली आहे, हिच्याहून सर्वस्वीं भिन्न–अगदीं उलट–आहे !" हें तुमचें म्हणणें खरें कां खोटें हें आपण पाहूं.

**श्रीमंत**— [ उठून ] माझ्या मनांतली च गोष्ट काकाजींनीं काढली. त्यांचे सारखे अधिकारी पुरुष, हा मुद्दा स्पष्ट करून सांगतील ! वरील दोन्ही महंत व काकाजी हे गुरुबंधू च. त्या मुळें आमच्या पेक्षां त्यांची खरी माहिती, त्यांचें खरें अंतरंग यांना अधिक माहीत !

का— होय! ऐका तर. प्रथम महंत दादाजी काय म्हणतात तें पहाः—

"गीतेंत (अ० १६) दैवी संपत्ति सांगितली आहे; तसें च ज्ञान्यांचीं वीस लक्षणें (अ० १३) हि सांगितलीं आहेत. दैवी संपत्तीचीं लक्षणें २६ आहेत. हीं २६ व ज्ञान्याचीं २० वस्तुतः एक च महाभारतांत शांतिपर्वांत (अ० १६० ते १६३) या विषयाचें विवेचन आहे. या लक्षणांत च **सत्य व अहिंसा** हे गुण आले आहेत. तसें च यांचा व इतर गुणांचा केव्हां व कसा उपयोग करावयाचा आणि केव्हां नाहीं हें जाणण्याची "ज्ञानयोगव्यवस्थिति" ही गुरुकिल्ली असून ती हि वरील गुणांत गणली आहे. असुरी संपत्तीचें हि वर्णन त्या च अध्यायांत आहे तींत असत्य व हिंसा आहे. भगवंतांनीं शेवटीं निर्णय दिला आहे कीं, दैवी संपत्ति मोक्षदायक तर आसुरी संपत्ति बंधनकारक होय! सारांश **अहिंसा व सत्य हा धर्म होय.** पण आततायी मनुष्य आपल्या वर चालून आला तर तेथें अहिंसेचा कसा उपयोग करावयाचा? अशा ठिकाणीं सामान्य लोकांना व्यामोह उत्पन्न होतो; कर्माकर्माचा संशय पडतो. भारतांत **अहिंसा, सत्यवचन, सर्वांशीं सरळपणा, क्षमा, सावधानता हे गुण ज्याचे पाशीं असतील तो सुखी होईल,** अशीं वचनें आहेत. तसें च त्यांत सत्याचा महिमा फार वर्णिला आहे. एका कवीनें तर "**सत्यापरता नाहीं धर्म। सत्य तें चि परब्रह्म। सत्यापाशीं पुरुषोत्तम। सर्व काळ तिष्ठत ॥**" असें म्हटलें आहे. पण व्यामोहाच्या काळीं या दोन गुणांचा खरा अर्थ कसा करावयाचा? कसोटी काय? व्यास महर्षींनें एके ठिकाणीं ही कसोटी "**अहिंसा सत्यवचनं सर्वभूतहितं परम्।**" अशी ठरविली आहे! याचे उलट, विरुद्ध वागणें, खरें म्हटल्यास **अपवादात्मक** आहे. **आपद्धर्म** आहे. **हा आपद्धर्म च नित्यधर्म म्हणून सदोदित आचरल्यास जगाची व्यवस्था मोडेल! हा अपवाद मुख्य किंवा प्रमाण नाहीं. शिवाय काल जसा बदलतो तसतसे व्यावहारिक धर्मांत हि फरक पडत जातात** आणि त्यामुळें एकाद्या **प्राचीन** कालच्या गोष्टीच्या योग्यायोग्यते बद्दल निर्णय करणें असल्यास, **तत्कालीन** धर्माधर्म समजुतींचा हि **अवश्य** विचार करावा लागतो! पण ही कार्याकार्यव्यवस्थिति, हें सुदुर्ज्ञेय कोण समजावून सांगणार? तर **शुद्धबुद्धीचा स्थितप्रज्ञ!**

त्याची व्याख्या भगवंतांनीं " मनांतील सर्व वासना सोडणारा, आपल्या ठायीं संतुष्ट, दुःखांत खेद न मानणारा, सुखांत आसक्ती न ठेवणारा, प्रीति – भय – क्रोध सोडलेला, निःसंग मनाचा, यथाप्राप्त शुभाशुभाचा आनंद किंवा विषाद न मानणारा, इंद्रियदमन करून स्थिरबुद्धि झालेला" अशी केली आहे! याला च अंतःप्रेरणा किंवा ज्ञानयोगव्यवस्थिति समजेल व तो च ती जगाला योग्य प्रकारें लावून दाखवील. याला च **निष्कामकर्मयोगी** व **महात्मा** म्हणतां येईल! दुसऱ्या कोणाला तो अधिकार नाहीं. सारांश, ज्ञानमूलक – भक्तिप्रधान – निष्काम – कर्मयोगी महात्मा च याचा अधिकारी!"

आतां महंत बापूजी काय म्हणतात हें पहा:—

" मनुष्याला, ईश्वरस्वरूप झाल्या शिवाय सुख व शांति मिळणार नाहीं! ईश्वररूप होण्याचा प्रयत्न हा च एकमेव पुरुषार्थ आणि आत्मदर्शन. आत्मदर्शनाचा अद्वितीय उपाय, **कर्मफलत्याग**. पण देह आहे त्या ठिकाणीं कर्म आहे! प्रत्येक कर्मांत कांहीं तरी दोष आहे व मुक्ति तर निर्दोष माणसाला मिळते; तेव्हां कर्मबंधनांतून सुटका कशी व्हावी? याचें निश्चयात्मक उत्तर म्हणजे **निष्कामकर्मानें**, कर्मफल-त्याग करून म्हणजे कायावाचामन यांची ईश्वराच्या ठायीं आहुती देऊन! पण हा **त्याग बुद्धीचा प्रयोग नव्हे. हा अंतःकरणाच्या मंथना पासून च उत्पन्न व्हावयाचा असतो!** ही शक्ति उत्पन्न करण्या करितां ज्ञान पाहिजे! एक प्रकारचें ज्ञान तर बहुतेक पंडितांना येतें, पण त्यांच्या पैकीं बहुतेक जण **भोग भोगण्यांत दंग** असतात! **ज्ञानाचा अतिरेक शुष्क पांडित्यानें होऊं नये** म्हणून त्याला भक्तीची जोड पाहिजे. **भक्त म्हणजे च स्थितप्रज्ञ!** दोहोंचीं लक्षणें एक च! हा भक्त, अद्वेष्टा, करुणासागर, पवित्र, ममतारहित, निरहंकारी, सुखदुःख– शीतोष्ण सम मानणारा, क्षमाशील, सदा संतुष्ट, एक–निश्चयी, **मनबुद्धी ईश्वराला अर्पण करणारा**, लोकांना ( त्यांच्या अप्रीतीला ) न भिणारा, लोक ज्याला भीत नाहीं असा, हर्षशोकभयमुक्त, तटस्थकार्यदक्षी, शुभाशुभत्यागी, शत्रुमित्रसमभावी, मानापमानसमानवादी, स्तुतीनें न फुगणारा, निंदेनें खट्टु न होणारा; मौनधारी, एकांतप्रिय व स्थिरबुद्धी असा असतो! **फलत्याग म्हणजे परिणामा-**

विषयीं बेदरकारी नव्हे ! परिणाम व साधन यांचा विचार तथा ज्ञान अवश्य पाहिजे. तें झाल्या वर जो परिणामाची इच्छा केल्या शिवाय, साधनांत तन्मय राहतो तो फलत्यागी ! त्यागी पुरुषाला फळ मिळत नाहीं असें नव्हे. खरें पाहिल्यास त्याला तें अनेक पटीनें मिळतें; मात्र त्याच्या ठिकाणीं फलाचे आसक्तीचा अभाव असतो ! पण जो फळा कडे च एकसारखें लक्ष देतो, तो पुष्कळ वेळां कर्तव्यकर्मा पासून भ्रष्ट होतो व अधीर होऊन, क्रोधाच्या सपाट्यांत सांपडून करूं नयेत त्या गोष्टी करतो ! त्याची स्थिति विषयांधा प्रमाणें होऊन, शेवटीं त्याचे प्रमाणें, हा बऱ्यावाईटांचा व नीतिअनीतिचा विवेक सोडून, फळ मिळविण्या साठीं वाटेल त्या साधनांचा उपयोग करून त्याला च धर्म मानतो ! या साठीं, हा वाईट परिणाम होऊं नये म्हणून, "अनासक्तियोग" पाहिजे ! जें कर्म आसक्ति शिवाय होणें च शक्य नाहीं ते सर्व त्याज्य होय ! त्या अनासक्तकर्मा मुळें माणसाचें जीवन सरळ होतें आणि सरळपणा मुळें शांति मिळते. या विचारपरंपरें प्रमाणें वागलें असतां, ओघानेंच सत्य आणि अहिंसा यांचें पालन करण भाग आहे ! फलासक्ती शिवाय मनुष्याला असत्य बोलण्याची "लालूच" होत नाहीं व हिंसा करण्याची इच्छा होत नाहीं ! वाटेल तें हिंसेचें किंवा असत्याचें काम घेतलें तरी असें समजून येईल कीं, त्याच्या बुडाशीं परिणामाची–फळाची– इच्छा असते च असते. सत्य व अहिंसा यांच्या संपूर्ण पालना शिव य संपूर्ण कर्मफलत्याग असंभवनीय आहे. कार्यअकार्य जाणण्या साठीं अंतःकरणाचें मंथन होऊन अनत्याचारी शुद्धबुद्धी ( इंग्रजी प्रतिशब्द "सोल–रीझन"– लेखक ) ची म्हणजे आत्मसाक्षात्काराची जरूरी आहे! एकाद्या अत्याचारी साम्राज्याच्या दास्यांत रुतलेल्या एखाद्या राष्ट्रानें, केवळ आपल्या च स्वातंत्र्यार्थ नव्हे तर त्या दास्यांत रुतलेल्या इतर राष्ट्रांच्या हि स्वातंत्र्यार्थ, शेवट पर्यंत अत्यंत शौर्यानें व फलासक्ति सोडून, स्वार्थत्याग पूर्वक युद्ध केल्यास, तें जवळ जवळ अनत्याचारी गणलें जाईल ! तसें च चोर, दरवडेखोर, आततायी जर आपल्या वर हल्ला करील आणि त्याचा प्रतिकार करण्यास राजसंस्था असमर्थ असेल तर विधी ( कायद्या ) प्रमाणें त्याचा प्रतिकार करून स्वतःचें रक्षण

करण्यास मुळीं च हरकत नाहीं ! पण हे प्रसंग अपवादात्मक होत, याला नित्यधर्म मानावयाचें नसतें. महावाक्यांच्या अर्थांचा विकास एकसारखा होत च असतो. गीतेंत आलेल्या महाशब्दांचा अर्थ प्रत्येक युगांत बदलेल व विस्तार पावेल पण मूळ मंत्र कधीं हि बदलणार नाहीं ! एकाच्या बाबतींत जें विहित असेल तें दुसऱ्याचे बाबतींत निषिद्ध ठरेल. एका काळीं किंवा एका देशांत जें विहित असेल, तें दुसऱ्या काळीं किंवा दुसऱ्या देशांत निषिद्ध होईल ! निषिद्ध अशी गोष्ट फक्त फलासक्ति असून, विहित गोष्ट अनासक्ति होय ! ! "

या प्रमाणें या महंताचें म्हणणें आहे तेव्हां तात्त्विक दृष्टीनें या अनासक्ती-योग-प्रवर्तक महंताच्या व पूर्वी सांगितलेल्या कर्मयोग-शास्त्रप्रवर्तक महंताच्या मतांत कोठें भेद आहे ? दोघांच्या हि मतें, धर्माधर्माचा निकाल लावणें अत्यंत कठीण असून, तें काम केवळ स्थित-प्रज्ञाला च करतां येतें ! तें तो आपल्या शुद्धबुद्धीनें करतो. एकाच्या मतें त्या बुद्धीचें नांव तारतम्यबुद्धि किंवा कार्याकार्यव्यवसायिका बुद्धि असें आहे तर दुसऱ्यानें तिला च आत्मसाक्षात्कारीबुद्धि असें नांव दिलें आहे ! पण, श्रीपतराव ! तुमच्या सारख्या " लालची लोकांना " एक तर हा अभेदभाव, हें तत्त्व कळत नाहीं अथवा कळल्यास " तत्त्व मान्य पण तपशील अमान्य " असें म्हणून तुम्हीं स्वतःचा व लोकसमाजाचा नाश करीत असतां !

गुरु— आणखी एक वाद या नाकर्त्यालोकांनीं पसरून देण्याची खटपट चालविली आहे; तो म्हणजे त्या माझ्या गुरुबंधूंत " परस्परां विषयीं असहिष्णुता होती ! " ही गोष्ट निखालस असत्य आहे. माझी व दादाजींची गांठ पडली असतां मी हा मुद्दा काढला. तेव्हां ते म्हणाले:—

" माझ्या या बंधूंचें नांव हिंदुस्थानांत कोणास माहीत नाहीं असें नाहीं; त्यांचें चरित्र अद्याप वाढतें आहे. शील किंवा चारित्र्य, ज्या मुळें या कर्ममय भूमींत मनुष्याची सभोंवतालच्या वस्तुस्थिती वर सत्ता चालूं शकते आणि ज्या मुळें निरनिराळ्या गोष्टीं बद्दल केलेल्या प्रयत्नांस सिद्धि प्राप्त होण्याचा संभव उत्पन्न होतो, तें शील व चारित्र्य यांचें आहे. हें च यांच्या चरित्राचें वैशिष्ट्य होय ! त्यांचीं कांहीं मतें कदाचित्

कोणास पसंत होणार नाहींत, पण **शीलचारित्र्याच्या दृष्टीनें यांचे चरित्र खरोखर च आदर्शभूत आहे !** देशाला वाईट स्थिति आली असल्यास तिच्या कारणांचा योग्य उहापोह करून व ती दूर करण्यास कोणते उपाय केले पाहिजेत याचा शक्य तितका खोल विचाराअंतीं निर्णय करून तो निर्णय अंमलांत आणण्याचें काम म्हणजे ती स्थिति सुधारण्याचें काम देशांतील **कर्त्या पुरुषानें** म्हणजे महंतानें केलें पाहिजे. ज्या योगानें जगाचें धारण-पोषण होतें तो **धर्म.** धारण-पोषण म्हटलें म्हणजे, त्यांत सद्यःकालीन परिस्थिति सुधारून, ज्या योगें ती परिस्थिति वरच्या वरच्या पायरीला जाऊन अखेर **पूर्णावस्थेला** पोहोंचेल त्या त्या सर्व गोष्टी स्वतः करणें, आणि लोकां कडून करविणें, याचा प्राधान्यें करून समावेश होतो. हें उच्चतर ध्येय असून त्याची मर्यादा इतकी श्रेष्ठ आहे कीं, मनुष्य या मार्गानें जातां जातां अखेर त्याला या जगाचें पालन पोषण करणाऱ्या **परमेश्वराचें तादात्म्य प्राप्त होतें म्हणजे तो केवळ महात्मा न राहतां देवपणा पावतो !** हा कर्तव्यजागृति ज्याच्या ज्याच्या मनांत ज्या ज्या क्षणीं होईल त्या त्या क्षणीं त्यानें हें आपलें कर्तव्य बजावण्यास निरलसपणानें स्वार्थत्याग करून आणि आपणा वर किंवा आपल्या कुटुंबा वर संकटें येणार किंवा येतील याची पर्वा न करितां परमेश्वरा वर भरंवसा ठेवून निष्कामबुद्धीनें लागलें पाहिजे. **हा च बोध माझ्या या बंधूंच्या चरित्रा वरून** घ्यावयाचा आहे ! देशांतील सर्व सुधारणा घडवून आणण्यास **देशांतील सत्ता, देशांतील कर्त्या व विचारी पुरुषांच्या हातांत असावी लागते.** तिच्या शिवाय शहाणपण फुकट जातें व कर्तत्व हि निर्माल्यवत् होतें. हें च मत **माझ्या बंधूंचें** आहे. तथापि **तें लोकांना समजलें पण उमजलें नव्हतें; आणि उमजलें तरी कार्यांत उतरवत नव्हतें.** या कुचंब्यांतून लोकांना बाहेर काढून त्यांनीं आपल्या उदाहरणानें **खरा मार्ग** दाखविला. एकाद्या ठिकाणची राज्यव्यवस्था अन्यायाची असली तर ती सुधारण्याचा प्रयत्न करणें, हा कांहीं न्यायदृष्ट्या **राजद्रोह होऊं शकत नाहीं.** प्रजेचें कल्याण हें च **राजसत्तेचें खरें ध्येय व सामर्थ्य.** हा सिद्धांत पत्करला म्हणजे मग ज्या ठिकाणीं **अन्याय आहे तेथें**

त्याचा प्रतिकार करून तो दूर करणें म्हणजे एक प्रकारें राज्यसत्तेच्या ध्येयाची अंमलबजावणी करण्यास मदत करणें होय, असा त्या पासून सहज दुसरा सिद्धांत निघतो. पण पूर्वसंचितामुळें आलेले दुराग्रह अगर स्वार्थ यां मुळें प्रजे पैकीं कांहीं विशिष्ट व्यक्ति, वर्ग, जाती कधीं कधीं इतक्या पछाडल्या जातात कीं त्यांना हीं न्यायतत्त्वें दिसेनाशीं होऊन त्यांचा इतर लोकां वर एक प्रकारें जुलूम होऊं लागतो. अशा वेळीं राजकर्त्यांनीं त्यांत एकदम हात घालून अन्यायाच्या गोष्टी बंद केल्यास, ह्या दुराग्रहां, स्वार्थी पण परंपरागत वजनानें प्रतिष्ठित बनलेल्या वर्गास दुखवावें लागतें. त्या मुळें शांतता विस्कळित होते. अशा वेळीं ज्यांचा वर जुलूम होतो त्यांनीं निकराचे प्रयत्न केल्या शिवाय राज्यकर्ते त्यांत मन घालीत नाहींत. जों पर्यंत राज्यकारभार चालण्यांत अडथळा येत नाहीं तों पर्यंत राज्यसूत्रचालकांनीं तरी तिकडे काय म्हणून लक्ष्य द्यावें ? म्हणून प्रजेच्या दुःखाची, गाऱ्हाण्यांचीं किंवा ती वरील जुलमाची स्थिति अशा मजले पर्यंत आणून ठेवणें व शेवटीं राज्यकर्त्या कडून ती सुधारणा घडवून आणणें हें देश-भक्ताचें हरएक प्रसंगीं कर्तव्य आहे. हें माझ्या बंधूंनीं उत्तम प्रकारें बजावल्यामुळें ते सर्व लोकांच्या स्तुतीस व आदरास पात्र झाले आहेत ! आमचा संप्रदाय "स्वरूप-संप्रदाय." आहे. संप्रदायाचें कुलदैवत श्रीराम आहे. संप्रदायाचें मुख्य तत्त्व सत्य व अहिंसा आहे. "प्राण जाई बरु वचन न जाई" असें श्रीरामानें च सांगितलें आहे ! सत्या साठीं च श्रीरामानें चौदा वर्षे अरण्यवास पत्करला आणि सत्यप्रतिष्ठापने साठीं च श्रींनीं आजन्म फकीरी घेतली. सत्याचा आग्रह धरून तें जगात फैलावणें ही श्रींची आज्ञा च आहे. मीं हि तें कार्य अखंड चालविलें; तें च कार्य हे माझे बंधू पुढें चालवीत आहेत. हा सत्याच्या आग्रहाचा मार्ग आतां शास्त्रपूत झाला आहे. त्या मार्गाची योग्यता मोठी आहे. कायद्यानें ठरविलेली मर्यादा धर्ममूलक अगर न्याय-मूलक नसून, कायद्यांतील शासनामुळें ती अंमलांत यावी असा कायद्यांचा परिणाम होऊं लागतो तेव्हां कायद्याचें शासन भोगून धर्म-न्याय तत्त्वां वरची आपली सत्यनिष्ठा कसोटीस लावावी का कृत्रिम काय-

घांतील शासनाच्या भीतीनें ईश्वरनिर्मित न्यायतत्त्वाचा अव्हेर करावा असा शहाण्या माणसां पुढें प्रश्न उभा राहतो. सत्यनिष्ठ व न्यायनिष्ठ माणसें, कायद्याचा कृत्रिम निर्बंध अशा वेळीं पाळणें युक्त नाहीं असें सांगतात. हें सांगणें अंमलांत येण्यास सत्यनिष्ठा व न्यायनिष्ठा इतकी तीव्र पाहिजे कीं, स्वतःच्या किंवा कुटुंबाच्या सुखासुखाचा, बलाबलतेचा विचार हि मनांत न आणतां मनुष्य आपलें कर्तव्य करण्यास झटदिशीं प्रवृत्त होईल. हें च मानसिक धैर्य, खरी सत्यनिष्ठा, सात्त्विक शील व दानत. हें च खरें आत्मबल. तें अभ्यास व वैराग्य यांनीं प्राप्त होतें. या व्यापक दृष्टीनें पाहिल्यास माझ्या बंधूंचें चरित्र असें आहे. त्यांच्या हिंदु-मुसुलमान एकीच्या प्रश्नाबद्दल माझें त्यांच्याशीं एकमत असून व त्यांच्या वर माझा पूर्ण विश्वास असून ते सुच-वितील त्या योजनेस मीं संमति देईन. त्यांचा सत्याच्या आग्र-हाचा मार्ग मला मान्य आहे. मी त्याच्या आड येणार नाहीं. मीं त्यांना अंतःकरणा पासून पाठिंबा देण्यास तयार आहे. कारण ती आमच्या पंथस्थापकाची आज्ञा च आहे. सारांश आमच्यांत तात्त्विक किंवा कोणता हि भेद नाहीं, मग असहिष्णुता असण्याचें कारण काय ?"

पुढें कांहीं दिवसांनीं बापूजींची भेट झाली. तेव्हां हि हा मुद्दा मीं काढला. त्या वर ते म्हणाले:—

"हा वाद स्वार्थसाधू लोकांनीं माजविला. दादाजी माझे गुरुबंधु. त्यांच्या प्रत्येक श्वासोच्छ्वासांत राष्ट्रप्रेम भरलेलें होतें. या राष्ट्र-प्रेमाचा ठेवा त्यांनीं आपल्या स्वाधीन केला आहे. त्याचा प्रतिपाळ करणें ही च त्यांची सेवा. ती करणें असेल तर तिच्या साठीं आम्हीं आपलें हृदय व अनत्याचारी शुद्धबुद्धि अर्पण केली पाहिजे ! त्यांच्या साऱ्या आयुःक्रमणानें साऱ्या भारतांत नव चैतन्य उत्पन्न केलें ! ते या भारतवर्षा साठीं च जगले ! ज्यांना ज्यांना त्यांचा क्षणिक का होईना सहवास घडला असेल, त्यांना हें माझें म्हणणें पटेल. त्यांच्या चरित्रानें च आमचें स्वराज्य टिकविण्याची व वाढविण्याची स्फूर्ति साऱ्या देशास लाभली. त्या मुळें च भारतांतील साऱ्या जनते वर त्यांचें वजन पडलें

होतें. या जनतेंत नुसता वरिष्ठ वर्ग च नसून क्रोडो लोकांचा — सर्व वर्णांचा व जातींचा — **कनिष्ठ वर्ग** हि होता. त्यांचें आयुष्य म्हणजे संपूर्णतया **आत्मत्यागाचें** व त्या मुळें लाभलेल्या पूर्ण **शांतीचें** होतें. **स्वार्थत्याग** व व कार्यसिद्धि साठीं **शिस्तपालन** ही त्यांच्या जनते वरील पकडीची गुरु-किल्ली होय ! आपल्या देशाला कशाची आवश्यकता आहे एवढें च त्यांना टाऊक नसून, **देशा साठीं जगावें कसें व देशा साठीं मरावें कसें** हें हि टाऊक होतें; इतकें च नव्हे तर त्यांनीं तें **प्रत्यक्ष अंमलांत** हि आणून दाखविलें ! **त्यांचें चारित्र** जर कांहीं आम्हांस शिकवीत असेल तर एक अत्यंत उच्चतम धडा शिकवितें आणि तो म्हणजेः— जर आपणांस देशा साठीं कांहीं तरी सेवा करावी असें मना पासून वाटत असेल तर **नुसत्या पांडित्यगिरीच्या, रुबाबदार, जळजळीत व अलंकारादिक भाषेच्या प्रवचनांनीं ती सेवा घडणार नाहीं ! तर त्या प्रवचनांतील प्रत्येक शब्दामागें व आयुष्यांतील प्रत्येक कृत्या मागें स्वार्थ-त्यागाची जोड असेल तर च घडेल ! आपल्या जवळील जें जें उच्च असेल त्या सर्वांचा होम देशाच्या सौभाग्या साठीं व धर्मा साठीं करण्यास आपण सिद्ध-हस्त होऊं तेव्हां च त्या माझ्या भाईच्या चरित्राचें सार आम्हांस समजेल व त्या च वेळीं त्यानीं देशा साठीं केलेल्या स्वार्थत्यागास व भोगलेल्या हालअपेष्टेस फळ येईल !** श्रीसमर्थांच्या मागें, मी त्या माझ्या बंधूंस, श्रीं च्या च जागीं मानून चालत होतों, असें असतां, माझ्या मनांत त्यांच्या बद्दल असूया कशी उत्पन्न होणार ? ”

असे शब्द बापूजींचे आहेत; ते खरे आहेत ! श्रीसमर्थांनीं च आपल्या पश्चात् राजकीय कार्य म्हणजे “ देवतार्चनाचें कार्य ” करण्याचा अधिकार महंत दिवाकरां प्रमाणें महंतश्रेष्ठ दादाजींना देऊन, त्यांच्या आज्ञेंत, या शाखें-तील सर्व सांप्रदायिकांनीं वर्तावें अशी आज्ञा केली होती ! आम्हां सर्व सांप्र-दायिकांत ज्ञानानें व वयानें ते श्रेष्ठ असल्यानें आम्हीं सर्वजण त्यांना “ दादाजी ” च म्हणत असूं ! देशाच्या दुर्दैवानें त्यांचा काळ लवकर झाला. **शेवटच्या दिवशीं** त्यांनीं आम्हां सर्वांस बोलावून आज्ञा केली कीं, “ **या पुढें सर्वांनीं महंत बापूजींच्या आज्ञेनें चालावें !** ” त्या प्रमाणें आज

पावेतों सांप्रदायिकांनीं वर्तन चालविलें आहे. दिव्यानें दिवा लावावा त्या प्रमाणें **श्रीसमर्थांनीं** पेटविलेला महाराष्ट्रधर्माचा नंदादीप, त्यांच्या कडून **दादाजींच्या** हातीं व त्यांच्या नंतर **बापूजींच्या** हातीं आला असून **सांप्रत तो उज्वल प्रकारें तेवत आहे आणि साऱ्या भारताला पूर्ण स्वातंत्र्याचें दर्शन करून देण्याची खटपट करीत आहे !** हा नंदादीप हातीं घेण्याचा अधिकार **आत्मसाक्षात्कारी महंतास** च असतो. **त्याच्या च आत्मसाक्षात्काराला, दिव्य संदेश, अंतःकरणांतील संदेश, अंतर्गत आवाज, ईश्वरी प्रेरणा इत्यादि नांवें आहेत ! हृदयस्थ जनार्दनाची ती हांक आहे !** हा जनार्दन प्रत्येक जनाच्या अंतरीं आहे ! मात्र त्याचा संदेश, श्रीनिवासराव ! **पाप्यांना ऐकूं येत नाहीं ! स्थितप्रज्ञ साधूंना, लोकमान्य महंतांना आणि महात्म्या महंतांनाच ऐकूं येतो ! तेव्हां सर्व देशानें, नव्हे जगानें अशांना च सद्‌गुरु मानून त्यांच्या आज्ञे प्रमाणें वर्तन करावें म्हणजे इहपरलोकीं कल्याण होईल !!**

प्रतिनिधींच्या मनावर आतां पर्यंतच्या — छत्रपति, काकाजी, गुरुदेव यांच्या— उपदेशपर भाषणांचा परिणाम अतिशय घडला. या वाग्गंगेनें त्यांच्या मनांतील असूया, द्वेष, लालूच, मद इत्यादि दुर्गुणांचे ढुडे धडाधड कोसळले. मनाचें क्षेत्र सरल झालें; **महाराष्ट्रधर्माचें बीज** पेरण्यास योग्य झालें. त्यांना पूर्ण पश्चात्ताप झाला व तो त्यांच्या डोळ्यांतून स्रवत असलेला सर्व राजसभेनें पाहिला. त्या वेगांत ते उठले आणि छत्रपतींचे जवळ जाऊन त्यांनीं आपलें मस्तक महाराजांच्या चरणां वर ठेविलें.

प्रति— सरकार ! क्षमा असावी ! महाराज ! दास पूर्ण अपराधी आहें ! हुजुरांच्या मनांत शिक्षा देणें असल्यास सेवक शिक्षा भोगण्यास सिद्ध आहें !

छत्रपतींनीं प्रतिनिधींचें मस्तक, आपल्या चरणां वरून वर उठविलें.

छ— पंत ! तुम्हांस पश्चात्ताप झाला, चांगलें झालें. श्री चें वचन आहे जे, " ऐसे जे पापरूप। दीर्घदोषी वज्रलेप। तयांस प्राश्चीत अनुताप। उद्भवतां आहे ॥ स्वामीद्रोह जया घडे। तो यावश्चंद्र नरकीं पडे। तयास उपावचि न घडे। स्वामी तुष्टल्या वांचुनी ॥ तें हीं पुन्हां शरण जावें। सद्‌गुरूस संतोषवावें। कृपादृष्टी जालियां व्हावें। पुन्हां शुद्ध ॥ " तरी तुम्हीं गुरु-देवांना शरण जा! क्षमेचा अधिकार त्यांचा आहे.

प्रतिनिधी गुरुदेवां जवळ गेले व त्यांच्या पायां पडले.

प्र— गुरुदेव ! पश्चात्तापदग्ध बालकास दयेची पाखर घालावी. यावच्चंद्र नरकवासांतून दासास सोडवावें !

गुरु— श्रीनिवास ! ऊठ ! तुला क्षमा केली आहे. बेटा ! रावसाहेब, भाऊसाहेब यांचा मत्सर करूं नको; आणि जर तुला त्यांच्याशीं चढाओढ करावयाची असेल तर ती राष्ट्रकार्यांत कर ! काकाजींची क्षमा माग.

प्रतिनिधींनीं लगें च काकाजींच्या हि चरणां वर मस्तक ठेवून क्षमेची विनंति केली.

का— गुरुदेवांच्या क्षमेंत माझी हि क्षमा आली ! बाळ ! तुझें नांव व रावसाहेबांचें नांव एक च, विष्णुवाचक; भाऊचें हि विष्णुवाचक ! अरे ! मग या तीन रूपें धारण करणाऱ्या एका च विष्णूनें परस्परांचा मत्सर, द्वेष कां करावयाचा ? एकरूप होऊन, असत्यरूपी, जुलमी साम्राज्याचा तारकासुर ठार करा ! त्या कामीं माझा तुम्हां तिघांना पूर्ण आशीर्वाद आहे !

प्रतिनिधि, पंतप्रधाना कडे वळले; ते खालीं वांकले, इतक्यांत प्रधानांनीं उठून त्यांना वरच्या वर धरून आलिंगन दिलें.

प्र— श्रीमंत, पंत प्रधान ! क्षमा करा ! मी व माझा पक्ष या घटके पासून मावळला ! आपल्या विषयीं, स्वामींचें मन मीं अनेक वार कलुषित करण्याचे प्रयत्न केले ! आपला पाडाव होण्या साठीं अनेक खोटींनाटीं कारस्थानें रचलीं ! शेवटीं स्वामीद्रोह, स्वराज्यद्रोह सुद्धां केला आणि रौरवाचे साधन केलें; पण अखेरीस सत्याचा जय झाला ! त्या सत्याचें आचरण आपल्या सारख्या महानुभांवा कडून च होणार म्हणून मी आपल्यास शरण आहें, मला मना पासून क्षमा करा. वयानें आपल्याहून जरी मी वडिल असलों तरी या पुढें स्वराज्याच्या सर्व कार्यांत, आपण जो जो उद्योग कराल त्या उद्योगांत मीं व माझी सर्व मंडळी, लहान भावां प्रमाणें आपल्यास शपथपूर्वक मदत करतील ! मनांतील अढी काढून टाकावी ही च विनंति ( हात जोडतात ).

श्री— ( पंतांचे हात सोडवून ) श्रीमंत, पंतप्रतिनिधि ! आपला दिल पाक ( शुद्ध ) झाला, आनंद झाला ! ही च वृत्ति शेवट पर्यंत कायम ठेवण्याची तुम्हीं शपथ हि घेतली. मग आतां विनंति व हात जोडणें कशास ?

माझी पूर्वीची काय, आतांची काय किंवा पुढची काय एक च इच्छा आहे व ती म्हणजे ( सिंहासना कडे बोट दाखवून ) **या देवाब्राह्मणांच्या, या महाराष्ट्रराज्याच्या, या फकीरी रियासतीच्या, या हिंदवी स्वराज्याच्या तख्ता खालीं सर्व हिंदुस्थान यावा; अत्याचारी साम्राज्याचें उच्चाटण होऊन तेथें रामराज्य व्हावें; दुष्टांचा नाश होऊन सुष्टांचे पाळण व्हावें !** या कार्यांत आपण मला सहाय्य करण्याचें आश्वासन दिलें च आहे. श्री तुम्हांस सुखी ठेवो ! माझ्या मनांत अढी नव्हती च. या ! बंधू सारखें मला भेटा !

दोघांनीं परस्परांना आलिंगन दिलें. मग प्रतिनिधि, भाऊसाहेबांकडे आले व त्यांनीं हात जोडले पण भाऊसाहेबांनीं ते सोडविले.

**प्र**— भाऊसाहेब ! जी विनंति श्रीमंतांना केली ती च आपणांस करतों. आपला हि मी अन्याई आहें ! आज पासून अन्यथा वर्तन होणार नाहीं, यास श्रीगुरुदेव व काकाजी यांचे चरण प्रमाण !

**भा**— शाबास, पंतसाहेब ! श्रीमंतांनीं सांगितलें तें च मी हि सांगतों. सत्याची कांस सोडूं नका ! व्यक्तिद्वेष मीं कधीं च करीत नाहीं, फक्त व्यक्तींतील दुष्ट, अन्यायी, पापी वृत्तींचा तिरस्कार करतों. ती च व्यक्ति सुष्ट, न्यायी व पुण्याचरणी बनली कीं मी तिचा आदर करतों. **समदर्शी व आत्मत्यागी मनुष्य च स्वराज्य मिळवून टिकवूं शकतो ! " सर्वभूतेषुचात्मानं सर्व भूतानि चात्मनि ! समं पश्यन्नात्मयाजी स्वाराज्यमधिगच्छति ॥ "** असें मनूचें वचन आहे ! हृदयस्थ नारायणाशीं, व्यवसायिका बुद्धीशीं, आत्मसाक्षात्कारी बुद्धीशीं **व्यभिचारी बनूं** नका ! आपण निर्मळ झालां तेव्हां त्या बद्दलचें बक्षिस ( त्यांना आलिंगन देऊन ) या पेक्षां मी काय देऊं ?

**छ**— प्रतिनिधि ! मघाशीं मीं तुम्हांस जरा कडक बोललों, पण तें **केवळ दौलतीच्या– या स्वराज्याच्या–हिता साठीं !** आतां तुम्ही शुद्ध झालां, उत्तम झालें. मूळचे तुम्ही सज्जन व मनमिळाऊ होतां आणि म्हणून च तुमचे राजद्रोहा सारखे भयंकर अपराध पोटांत घालून, मीं आतां पर्यंत तुमचे वर लोभ करीत आलों !

**गुरु**— श्रीं च्या " **अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥** " या वचना प्रमाणें, पंत ! तुम्हांस राजेश्रींनीं ( श्रीसमर्थ, शिवराजांस,

नेहमीं " राजेश्री " या नांवानें संबोधीत; ती च रीत पुढें या दोन्हीं गुरु– शिष्य घराण्यांत चालूं होती. ) क्षमा केली आहे ! आतां मावळलेल्या प्रतिनिधी-पक्षांतील सर्व सदस्य हो ! तुमच्या सारख्या दुर्जनांस, राजेश्रींनीं " **सज्जना परिस आळवावे । महत्त्व देउनी ॥** " असें आतां पर्यंत आळविलें आहे ! माझा शिवबा म्हणजे, " **उदंड धिःकारून बोलती । तरी चळों नेदावी शांती । दुर्जनांस मिळोन जाती । धन्य ते साधु ॥** " असा साधू किंवा " **धिःकारिल्या धिःकारेना । तो चि महापुरुष** " असा महापुरुष म्हणजे महात्मा आहे ! असा महात्मा, असा लोकमान्य, या महाराष्ट्राचा, या स्वराज्याचा राष्ट्रसूत्रधार आहे, हें या राष्ट्राचें, या स्वराज्याचें थोर भाग्य होय ! तुम्हीं सर्वांनीं या पुढें राऊ– भाऊ या जोडीला राष्ट्रकार्यांत सर्वस्वीं साहाय्य करावें ! पूर्वजांच्या नुसत्या कथा सांगूं नका; त्यांचे नुसते सांवत्सरिक उत्सव करूं नका; त्यांच्या चरित्रांचें मर्म लक्ष्यांत घेऊन त्या प्रमाणें स्वतः आचरण करा ! नाहीं तर " **चौदा पिढ्यांचे पवाडे । सांगतां ते शहाणे कीं वेडे । ऐकत्यानें घडे कीं न घडे । ऐसें पहावें ॥** " या प्रमाणें तुमची परीक्षा शेजारचीं राष्ट्रें करतील ! आज, या " स्वराज्या " स, ५४।५५ **वर्षें, स्थापन होऊन झालीं ! याच्या उभारणीस हिंदू प्रमाणें मुसुलमा-नांनीं हातभार लावला आहे.** दौलतखान कोण होता ? पांचशें पठाणांची जात कोणती होती ? श्रीं च्या कृपे प्रमाणें शिवप्रभू वर म्हणजे स्वराज्या वर कृपा करणारे बाबा याकूब हिंदू होते काय ? मुसुलमानांनीं हि या स्वराज्या-साठीं कष्ट केले आहेत ! अहो ! **मुसुलमान भंग्यानें– मदारी मेहेतरानें– आगरा येथील बंदींतून स्वराज्यास मुक्त करण्याची खटपट केली आहे ! ! हिंदूंतील जिवा न्हावी, शिद्नाक महार यांनीं या स्वराज्या साठीं आत्मबलिदान केलें आहे.** जो स्वतःला ईश्वरार्पण करतो, सत्यधर्माचा खिदमतगार बनतो, त्याच्या च हातीं राजधर्माचा, राष्ट्रधर्माचा, मोक्षधर्माचा शाश्वत व अचर असा दंड शोभतो. हा पुरुष ईश्वरस्वरूप बनतो व त्याच्या पासून च जगत्कल्याणाचा उगम होतो. कुराणे शरीफाच्या " **व मन य्युस्लिम वजहआ इला अल्लाहि व हुव मुहसिनुन् फक़्दिअस्तम्सका बिल् उरवतिल् वुस्क़ा व इला अल्लाहि आक़िबतुल् उमूरि** " या आयत मध्यें हा च अर्थ प्रतीत होत नाहीं काय ? हें च

भगवान् " **संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः। मय्यर्पित मनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ।।** " या श्लोकांत सांगत नाहींत काय? सारांश, **आमचें " स्वराज्य " म्हणजे हिंदुस्थानांतील सर्व जातींच्या लोकांचें " लोकराज्य " आहे ! हिंदुस्थानची ती एक " राष्ट्रीय महासभा " आहे ! ती " फकीरशाही " आहे ! तेव्हां सर्व तंटे-भांडणें, मद-मत्सर विसरून त्या महासभेशीं, त्या स्वराज्याशीं एकरूप व्हा** व त्याच्या खेरीज दुसरे जे प्रांत दिल्लीच्या साम्राज्यांत अडकले असतील त्यांना पूर्ण स्वातंत्र्य मिळवून देऊन या फकीरशाहींत सामील करण्याचा नेटाचा प्रयत्न करा.

छ— अशा कालांत -मतामतांच्या गलबल्यांत-या असल्या स्वराज्यास एका **हुक्मतपन्हा** ( डिक्टेटर ) **ची जरूरी असते** ! आमच्या " स्वराज्याचे हुक्मतपन्हा " म्हणजे महात्मा श्रीगुरु श्रीप्राणनाथ प्रभु शुक्ल आहेत! त्यांच्या आज्ञेंत सर्वांनीं वर्तावें !! ही हुक्मतपन्ही गुरुदेवांनीं आपल्या कडे **सत्ता-लोभानें घेतली नसून, सर्व देशानें, जाणत्या देशसेवकांनीं विनंति करून त्यांना अर्पण केली आहे.**

प्रति— आज्ञा ! या पुढें माझे स्वतःचे किंवा माझ्या पक्षाचे-माझा पक्ष मोडला च आहे-हातून सरकारांच्या आज्ञे प्रमाणें च वर्तन घडेल! ( छत्र-पतींच्या पायां वर हात ठेवून ) त्या बद्दल हे चरण साक्ष !

पिताजी— उत्तम ! उत्तम ! सर्वांचीं मनें निर्मळ झालीं ! चांगलें झालें. माझें हि एक कार्य उरकवून घ्यावयाचें आहे. माझ्या **गजेंद्रमोक्षाची** सर्व उभारणी-संचणी मुख्यतः चिरंजीव भाऊसाहेबांची आहे ! त्यांनीं माझ्या ताईस पाठची बहीण मानलें असून, तिचा हि **गजेंद्रमोक्ष** केला आहे हें सर्वांना समजलें च आहे. तिचा व पंतप्रधानांचा विवाह व्हावयाचा आहे त्यास पंडितरावांनीं व छत्रपतींनीं म्हणजे धर्मशासन व राजशासन यांनीं अनुज्ञा दिली आहे ! या लग्नांत भाऊसाहेबांनीं वधूबंधूचें कार्य पत्करलें आहे. तो त्यांचा हक्क च आहे ! या सर्व सत्कृत्याबद्दल त्यांना बक्षिसी म्हणून नव्हे तर-ते मला तीर्थरूपांच्या, तात्यासाहेबांच्या, ठिकाणीं मानतात व मी हि त्यांना कुमार हिरदेसा प्रमाणें लेखतों म्हणून-दूधभाता साठीं, घरचा अहेर म्हणून कांहीं देणगी देतों ! सध्यां गुरुदेवांच्या कृपेनें माझें राज्य दोन

कोटी वसुलाचें आहे ! कुमार हिरदेसा व कुमार जगतराज यांचे समान वांटे ५०।५० लाखांचे काढून, उरलेल्या एक कोटींचे दोन वांटे करून त्यांतला निम्मा म्हणजे ५० लाखांचा वांटा, मी चि० भाऊसाहेबांस दिल्याचें या राजसभेंत जाहीर करतों ! उरलेला ५० लक्षांचा प्रांत, माझ्या जामातास म्हणजे चिरंजीव रावसाहेब पेशवे यांना, लग्नाची वरदक्षणा म्हणून दिला आहे ! रावसाहेब हि मला वडिलां–नानासाहेबां–प्रमाणें मानतात व मी हि त्यांना मुला सारखें लेखतों ! त्यांत हें नवीन नातें जडलें आहे ! तेव्हां या हि चिरंजीवांच्या श्रमसाहसा कडे मला पाहणें जरूर च आहे ! या वांटपास माझ्या दोघां कुमारांनीं पूर्वी च मोठ्या आनंदानें संमति दिली आहे ! त्या प्रमाणें या दोघां हि कुमारांनीं अवश्य संमति द्यावी अशी माझी त्यांना विनंति आहे. गुरुदेव–काकाजी व छत्रपति यांना ही योजना मान्य आहे ना ?

**गुरु**— राजाजी ! मला तुमची योजना पूर्ण मान्य आहे.

**का**—दुधभात वगळून बाकीची मला हि मान्य आहे.

**छ**— काकाजींचा श्लेष मला मान्य नसून गुरुदेवांची व पिताजींची आज्ञा, अंमलांत आणण्यास मीं सिद्ध आहे.

या वर भाऊसाहेब उठले व त्यांनीं सिंहासनास नमन करून म्हटलें—

**भा** — पिताजी ! लेंकरास क्षमा असावी. ही योजना स्वीकारण्यास मी असमर्थ आहें ! आपल्या सारख्या वडिलांच्या आशीर्वादानें आतां पर्यंत नियत कर्म च अनासक्तीनें करीत आलों,– क्षमा असावी, असें आत्मश्लाघेचें वाक्य उच्चारल्या बद्दल ! पण प्रसंग च आला म्हणून उच्चारलें–मग त्याची परतफेड कशी घेऊं ? आपण माझ्या संबंधीची ही वांटणी परत—

**पि**— ( निश्चयानें ) घेणार नाहीं ! भाऊसाहेब ! जशी ही माझी इच्छा आहे तशी च ती गुरुदेव व छत्रपतींची हि इच्छा आहे. आम्हां तिघांच्या मनोभंग–नव्हे आज्ञाभंग–तुम्हीं करणार काय ? ( गादिवरून ) बेटा, बाबूराव ! बाळ विश्वनाथ ! ( बाबूजी नाईक यांचें मूळ नांव विश्वनाथ उर्फ विसाजी होतें. त्यांच्या चुलत आजाचें नांव " विश्वनाथ–विसाजी–उर्फ बाबूराव " होतें; तें च त्याचे पश्चात् यांना ठेवण्यांत आलें ! –**लेखक** ) तुला आम्हां तिघांची शपथ आहे ! ही जहागीर तूं स्वीकारली च पाहिजेस !

या वर गुरुदेव व छत्रपतींनीं हि " हो ! हो ! " असें म्हटलें. त्या च वेळीं

भाऊ काय उत्तर देतात तें पाहण्या साठीं काकाजी त्यांच्या कडे काळजी-पूर्वक पाहूं लागले. भाऊंनीं आठ दहा पळें विचार केला, त्यांचा कांहीं निश्चय झाला. मग—

भा — वडिलांची आज्ञा शिरोधार्य करतों ! पण, माझी हि एक आळ वडिलां जवळ आहे, ती त्रिवर्ग वडिलांनीं पुरविली पाहिजे.

त्या वर त्या त्रिवर्गांनीं "अवश्य ! अवश्य, पुरविली जाईल !" असें म्हटलें.

भा — आज्ञा ! जहागीर माझी झाली म्हणजे मी तिचा पूर्ण मालक झालों ना ?

त्रिवर्ग म्हणाले — "निःसंशय !"

भा — आज्ञा ! मग मीं माझ्या जहागिरीची व्यवस्था, माझ्या मना प्रमाणें लावण्यास कुलमुखत्यार आहे ना ?

त्रिवर्ग म्हणाले — "हो ! हो !"

भा — आज्ञा ! त्रिवर्ग वडिलांनीं तींत मग मुळीं च हस्तक्षेप करतां कामां नये अशी विनंति आहे.

असें म्हणून त्यांनीं हात जोडले. त्या वर त्रिवर्गांनीं म्हटलें — "नाहीं ! नाहीं ! आम्हीं हस्तक्षेप करणार नाहीं !"

भा — आज्ञा ! उत्तम झालें ! आतां मी माझ्या जहागिरीची व्यवस्था लावतों ! ही सर्व जहागीर मीं माझ्या बहिणीस–ताईसाहेबांस–या क्षणा पासून चोळीबांगडी करितां देणगी म्हणून, त्रिवर्ग वडिलांच्या व या सिंहासनाच्या साक्षीनें देऊन टाकली आहे !

भाऊसाहेबांचें हें वाक्य ऐकून सर्व राजसभा आश्चर्यानें मुग्ध बनली; सर्वांच्या तोंडून "वाहवा ! शाबास !" अशीं अक्षरें निघूं लागलीं !

काकाजींच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले.

का — विसूबाळ ! केळशीकरांचे घराण्यांत जन्मून तूं घराण्याची लाज राखलीस ! माझें तोंड उजळ केलेंस. धन्य ! शतायुषी हो !

पिताजी, सिंहासना वरून खालीं आले व त्यांनीं भाऊंना आलिंगन दिलें !

पि— ( गहिंवरून ) बेटा ! तूं औदार्यांत मला लाजविलेंस ! असो, तुझी इच्छा प्रमाण !

छ— धन्य ! भाऊ ! तुम्हीं कर्णास हि मागें टाकलें.

**गुरु**— शाबास, बेटा ! तूं खरा श्रीसांप्रदायीक ! "**रामे वीण जे जे आस । तितुकी जाणावी नैराश ॥** " हें श्रीवचन तुझ्या अंगीं पूर्ण भिनलें आहे ! तूं आज पासून साधा सांप्रदायी नसून **महंत** बनला आहेस ! कारण "**जैसें बोलणें बोलावें। तैसें चि चालणें चालावें । मग महंत-लीळा स्वभावें । अंगीं बाणे ॥**" असा तूं आतां **महंत** झाला आहेस. आज, तूं माझ्या पूर्ण परीक्षेस उतरलास ! आज पासून मीं तुला माझ्या हातीं श्रींनीं सोंपविलेल्या आनंदवनाच्या-काशीच्या-मठाचा, माझ्या पश्चात् **मठपति नेमीत आहें !**

असें म्हणून त्यांनीं भाऊंना पुढें बोलाविलें ! ते गुरुदेवांच्या जवळ गेले. त्यांनीं गुरुमाऊलीचे चरणां वर मस्तक ठेविलें. गुरुदेवांनीं त्यांना उठविलें, त्यांचें मस्तक अवघ्राण केलें व त्यांच्या हातीं आपली-श्रीसमर्थांनीं दिलेली सांप्रदायिक-कुबडी दिली आणि उजवा हात त्यांचे मस्तका वर ठेवून—

**गुरु**— सर्व मंडळी हो ! हा विश्वनाथ सदाशिव जोशी केवळ राजकार्य-धुरंधर नसून श्रीरामदासपंथांकित **महंत विसाजीबाबूराय** आहे ! आमच्या पंथांतील महंत पद लाभण्यास अनेक जन्मांची तपश्चर्या लागते; ती यानें केलेली आहे. असल्या महंताची थोरवी श्रींनीं च गायली आहे. ऐका—

**मदें मच्छरें सांडिला स्वार्थबुधी । प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी ।**
**सदां बोलणें नम्र वाचा सुवाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥**
**जय, जय, रघुवीर समर्थ !**

सर्व राजसभेनें हि जय, जय, रघुवीर समर्थांचा एकमुखें गजर केला !

इतक्यांत श्रीमंत उठले.

**श्री**— गुरुदेव ! पिताजी ! छत्रपतीसरकार ! माझी हि एक विनंति आहे.

असें म्हणून त्यांनीं तिघांना वंदन केलें.

**गुरु**— काय ? राऊ ! कर्ण तुमच्या हि अंगांत संचरला काय ?

**पि**— रावसाहेब ! बुंदेलखंडांत अशी **सनातनी चाल** आहे कीं, वधू कडील देजाची विल्हेवाट लावण्याचा अधिकार वरास नाहीं !

**छ**— छत्रपती म्हणून, पंतप्रधान ! आम्हीं तुम्हांस आज्ञा करतों जे, या बाबतींत तुम्हीं कांहीं हस्तक्षेप करूं नये !

**का**— माझा वृद्धाचा हि असा च सल्ला आहे.

**श्री**— आज्ञा ! मीं मुळीं च हस्तक्षेप करीत नाहीं. आतां च सरकारनीं "पंतप्रधान" म्हणून अधिकाराचा पदवीनें मला संबोधिलें ! अर्थात् पंतप्रधानास मिळालेली कोणती हि लहान मोठी देणगी **राज्याची** च असते, **खासगी म्हणून त्याला स्वीकारण्याचा हक्क नाहीं !** ( पिताजी कडे वळून ) अशी **या महाराष्ट्रराज्याची सनातनी चाल आहे !** तिला अनुसरून, पिताजी ! आपण मला दिलेली देणगी, माझी खाजगी म्हणून स्वीकारण्यास मला अधिकार नाहीं. ती **दौलतीच्या राजभांडागांत च** सामावली जावयाची; म्हणून मीं, राजकोशागारांत म्हणजे या फकीरशाहीच्या दौलतींत समाविष्ट केली आहे !

राजसभेस पुन्हां आश्चर्याचा धक्का बसला ! सर्वांच्या तोंडून "धन्य ! धन्य !" शब्द निघाला.

**का**— शाबास ! रावसाहेब ! विसाजी बाळ ! ( थोरल्या बाजीराव साहेबांचें मूळ नांव **विश्वनाथ** ऊर्फ विसाजी होतें—**लेखक** ) तूं व भाऊ दोघांनीं आपापलीं नांवें सार्थ केलीं ! भट घराण्यांत जन्मून त्वां हि त्या घराण्याची लाज राखलीस व थोरल्या नानांचें – माझ्या मित्राचें – तोंड उजळ केलेंस !

**छ**— पंतप्रधान ! ( हंसून ) माझ्या वर मात करावयास पाहिलेंत, पण तरुणां पेक्षां प्रौढांना बुद्धि व अनुभव जास्त असतो बरं कां ? पेशवे ! तुम्हीं तुमचें काम केलें; आतां छत्रपतींना त्यांचें कर्तव्य करूं द्या ! राजभांडारांतील वस्तूंची विल्हेवाट लावण्याचा हक्क राजास असतो. त्याच्या या हक्काचे आड त्याचा सेवक, त्याचा पेशवा, येऊं शकत नाहीं ! ही या देवाब्राह्मणांच्या स्वराज्याची **सनातन चाल** आहे ! भाऊ ! ताईस इकडे आणा.

सिंहासनाचे वर सज्जांत, महाराणी व त्यांचा परिवार बसण्याची जागा असे. त्या जागे पुढें चिकाचे पडदे सोडलेले असत. आतां हि दरबार पाहण्या साठीं त्या जागेंत सौ० महाराणीसाहेब व त्यांचा सर्व परिवार बसला होता; त्यांचे जवळ ताईसाहेब बसल्या होत्या. सिंहासनाच्या मागून तिकडे जाण्यास रस्ता होता. त्या रस्त्यानें भाऊसाहेब वर गेले व ताईसाहेबांना घेऊन सिंहासना पाशीं परत आले ताईसाहेबांचें मुख अवगुंठित होतें. त्यांनीं सिंहासनास, गुरुदेव, पिताजी व काकाजी यांना वंदन केलें व त्या सिंहासना जवळ उभ्या राहिल्या;

त्यांचे भाऊ त्यांचे जवळ उभे राहिले. पुढें काय चमत्कार घडतो तें पाहण्यास सर्व राजसभा चित्रासारखी स्तब्ध राहिली.

छ— ताई ! बाळ ! तुझ्या पिताजींनीं वरास वरदक्षिणा दिली, वरानें ती राजभाग म्हणून राजभांडारांत जमा केली ! पण, त्या राजभांडाराचा हा छत्रपति, ती वरदक्षिणा, या **महाराष्ट्रराज्या तर्फे अहेर** म्हणून तुझ्या हवालीं करीत आहे ! आज पासून, जावत्काल हें आमचें स्वराज्य कायम आहे, तावत्काल ही जहागीर, बेटी ! तुझ्या च वंशजां कडे कायम चालेल ! ( हंसून ) आतां तूं तरी आपल्या भावा प्रमाणें व पती प्रमाणें कांहीं चमत्कार करूं नकोस बाळ !

शुद्ध चांदीच्या घंटेच्या आवाजा प्रमाणें किंवा राजहंसाच्या कोमल आवाजा प्रमाणें ताईसाहेबांचा मृदु पण स्पष्ट आवाज जो राजसभेस ऐकूं आला तो असा:—

ता— ( हात जोडून ) महाराज ! मी अबला ! मीं काय चमत्कार करणार ? फक्त महाराजांचें वचन मात्र तंतोतंत पाळीन ! ( गुरुदेव–काकाजी–छत्रपति–पिताजी यांच्या कडे पाहून ) या चौघां परम पूज्य महात्म्यांच्या पवित्र चरणकमलांना साक्षी ठेवून, मी माझ्या भावी वंशजांना आज्ञा करतें कीं, त्या सर्वांनीं या **शिवशाहीचें** रक्षण करावें; प्रसंगीं प्राण देऊन हि तिची सेवा करावी ! पण दुर्दैवानें ती स्मृतिशेष झाल्यास, **या जहागिरी वर पाणी सोडावें** व भगवंताची सेवा करण्यांत आयुष्य घालवावें !

या प्रमाणें बोलून व पुन्हां चौघांना वंदन करून ताईसाहेब परत गेल्या.

या वेळीं राजसभेस नुसतां च आश्चर्याचा धक्का न बसतां, ती आश्चर्य-सागरांत पार बुडून गेली. पांच दहा पळें सर्वत्र " धन्य ! ताईसाहेब !... पिताजींना शोभणारी खरी कन्या !....**फकीरशाहीच्या फकीर प्रधानाची फकीरीण पत्नी** ! ..धन्य, धन्य ! " असे प्रशंसोद्गार झडत होते !

**गुरु**— शाबास, बेटी ! बाळ ! तूं तर आपल्या भावा वर व पती वर हि कडी केलीस ! दरबारी मंडळी हो ! ज्या देशांत विसाजी प्रधान व विसाजी पोतदार अशा सारखीं नररत्नें व बाळ मदयंती ताई सारखीं स्त्रीरत्नें निपजतात, तो देश धन्य होय ! असल्या स्वसुखनिरभिलाष माणसांच्या नव्हे रत्नांच्या हातून देशास सौभाग्य प्राप्त होतें. अशांच्या कृतीनें, सर्वस्वीं दुर्बळ झालेल्या,

परकीय सत्तेच्या टांचे खालीं पिचलेल्या, पारतंत्र्य कर्दमांत रुतलेल्या देशाचें आनंदवनभुवन बनतें ! म्हणून आतांच्या या प्रसंगा वरून आपण सर्वांनीं धडा घ्यावा. शिवबा ! आतां मी एक विचार सांगणार आहे, तो येथें जमलेल्या सर्वांनीं लक्ष्यांत घ्यावा व त्या प्रमाणें आचरण ठेवावें.

तुम्हां बहुतेकांना ठाऊक च आहे जे, श्रीमहाराष्ट्रराज्यगुरु श्रीसद्‌गुरु श्रीसमर्थांनीं कृपा करून या देहास अनुग्रह दिला ! ज्या वेळीं श्रीं ची स्वारी काशी कडे तीर्थयात्रा निमित्तें आली होती, त्या वेळीं मी त्यांना शरण गेलों. सद्‌गुरुंनीं माझ्या वर कृपा केली ! महाराष्ट्रधर्म वाढविण्यास आज्ञा करून काशीस मठस्थापना करून तेथील महंतपद माझ्या हवालीं केलें. श्रीं ची आज्ञा शरीर वृद्ध होई पर्यंत पाळली. आतां ती आज्ञा पाळण्याचें काम चिरंजीव भाऊ वर सोंपविलें आहे.

तुम्हांस महाराज छत्रसालां बद्दल थोडीशी अधिक – तुम्हांस ठाऊक आहे त्या पेक्षां अधिक – माहिती देतों. पन्ना राज्याचा संस्थापक मूळचा काशी येथील एक सूर्यवंशी क्षत्रिय वीर होता. त्याचा वंशज रुद्रप्रताप. हा अत्यंत शूर होता. त्यास बारा पुत्र असून ते सर्व शूर होते. बुंदेलखंडांत जीं सध्यां छोटीं राज्यें आहेत त्यांचे संस्थापक हे च पुत्र होत. रुद्रप्रतापाचा एक पुत्र मधुकर हा अत्यंत स्वतंत्र वृत्तीचा असल्यानें त्याचे व अकबराचे झगडे सतत होत. पण मधुकराचा पराभव न झाल्यानें अकबरानें त्याच्याशीं मैत्रि केली. त्याचे दोन पुत्र रामचंद्र व वीरसिंह यांच्याशीं हि जहांगीरची मैत्रि होती. वीरसिंहाचा चुलत भाऊ चंपतराय हा महोबास राज्य करीत असे. चंपतरायास मीं लहानपणीं पाहिलें होतें. त्याच्या कथा व मनिषा मला माहीत होती. श्रीं नीं जशी या बालका वर कृपा केली तशी च चंपतराया वर केली. श्रींच्या आज्ञे वरून चंपतरायांनीं शहाजहांच्या राजवटींत सर्व बुंदेले राजांना एकत्र करून दिल्लीशीं झगडा आरंभला. साम्राज्यशाहीच्या बाकीखान या शूर सरदाराचा त्यांनीं पराभव केला. या वेळीं रायांचा वडील पुत्र धारातीर्थीं पडला. शहानें, रायांस जिंकण्याचे अनेक प्रयत्न केले पण ते फुकट गेले. शेवटीं महाबतखान, खानजहान लोदी यांना प्रचण्ड फौजे सह रायां वर पाठविलें; पण येथील मावळ्यां प्रमाणें रायांच्या बुंदेल्यांनीं डोंगरांचा आश्रय करून गनिमी लढायांनीं मोंगलांस जर्जर केलें, "मी मी" म्हणणारे मोंगल सरदार

मारले गेले. अखेरीस शहाजहांनें, चंपतरायांशीं सल्ला केला ! औरंगझेबास चंपतरायांनीं सहाय्य केलें त्या बद्दल औरंगानें रायांना श्रेष्ठ पद दिलें. परंतु औरंग कपटी; त्यास रायांचें स्वातंत्र्य सहन न झाल्यानें कांहीं खुसपट काढून त्यानें रायांचा अपमान केला. राय परत आले व औरंगाशीं युद्ध सुरू झालें. तें अनेक वर्षें चाललें. अशा एका समयीं गृहभेद करून औरंगानें, राय बेसावध असतां त्यांचे वर हल्ला केला. त्या शूर पुरुषानें धैर्य न सोडतां शेवट पर्यंत लढून अखेरीस धारातीर्थीं शयन केलें. **महाराष्ट्र व बुंदेलखंड, मराठे व बुंदेले, शहाजीराजे व चंपतराय, शिवप्रभु व छत्रसाल या जोड्यांत विलक्षण साम्य आहे !** स्वदेशाचे स्वातंत्रसंपादनाची जिवापाड खटपट दोन्हीं देशांत झाली. **राय व राजे या दोघांनीं या खटपटीचें कंकण हातीं बांधले होते. दोघांचे हि पुत्र स्वराज्यसंस्थापक निघाले !**

छत्रसालाचें बालपणचें शिक्षण सुद्धां शिवप्रभूच्या सारखें च होतें. आग्रयाची शिवप्रभुची सुटकेची मसलत ठरविण्यास, श्रीं ची स्वारी, "न लागेल जावें, तेथें चि लागेल जावें" अशी सांकेतिक खूण महाराष्ट्रांतील महंतांना सांगून, काशी–आग्रया कडे आली. मसलत ठरवून ती सिद्धीस गेली. तींत या देहा कडून व काकाजी कडून थोडीशी कामगिरी घडली. त्या वेळीं मीं श्रीं ना छत्रसाला बद्दल विचारलें असतां, त्यांनीं छत्रसालास संप्रदायी बनविण्याची आज्ञा मला च केली. राजाजी तेव्हां लहान होता पण श्रींच्या म्हणण्या प्रमाणें **तीक्ष्ण बुद्धीचा व सखोल** होता, आणि तो चंपतरायजींच्या सोयऱ्याधाइऱ्याचें मूल नसून त्यांचें च मूल होता. अर्थात् त्याला एकांतीं नेऊन मंत्र सांगण्याचें काम माझ्या कडे आलें. पुढें श्रींच्या निरोपा वरून याला घेऊन मी इकडे आलों. शिवप्रभूचा मुक्काम त्या वेळीं भीमेच्या कांठीं होता. तेथें त्यांची व याची गांठ घालून दिली. **ती श्रीराम–भरताची भेट होती !** महाराजांनीं याला काय काय राजकारण सांगितलें तें तुम्हांस सांगण्याची आवश्यकता नाहीं. कारण बुंदेलखंडांतील प्रत्येक पर्वत, प्रत्येक दरी व चंबळचा दरेक फटा ( दरड ) त्या राजकारणाचे शब्द, सर्वांना ऐकूं जातील इतक्या गंभीर व अनहत शब्दांनीं कथन करीत आहे !

औरंग जसा शिवप्रभूच्या मागें हात धुवून लागला पण शेवटीं रंजीस आला, तसा च याच्या हि मागें लागून हतप्रभ झाला. यानें शाही सरदार

फिदाईखानाची रेवडी उडविली व सर्व बुंदेलखंड एका छत्रा खालीं आणून शिवप्रभूनें आशीवार्दा सह दिलेल्या "तुळजा" समशेरीचें नांव गाजविलें! पुढें नांवाजलेला रणदुल्ला चालून आला, पण यानें गड कोटा येथाल रणांत त्याची राळ उडवून व रणदुलहन बनवून पळावयास लावलें! राजाजी दिल्ली घेणार अशी भीति वाटून शहानें तुहव्वरला प्रचंड सेन्या सह धाडलें पण त्याचा हि नाश झाला, त्या मुळें व अत्याचारी साम्राज्यास कंटाळलेले सत्वशील अनेक मुसुलमान जहागीरदार राजाजींच्या फकीरशाहींत सामील झाले! तेव्हां जास्त चिडून औरंगानें, शेख अन्वरास पाठविलें. पण त्याची पोळजत्रा होऊन उलट त्या लंडीनें सव्वा लाखांचा दंड भरून स्वतःची सुटका करून घेतली! शहास हा अपमान फार बोंचला, त्या भरांत "राजाजींचें पारिपत्य करणारा एक हि इसम आपल्या दरबारांत नाहीं;" असें त्यानें अजीजीचें भाषण केलें! तेव्हां मीर्झा सदरुद्दीन हा शूर सरदार पुढें होऊन त्यानें पैजेचा विडा उचलला; शहानें हि त्याला अनेक युक्त्या शिकविल्या. त्याचा सेनासागर, राजाजी वर आपटला. पण या अगस्तीनें तो भस्मसात् केला! पुढें हि अनेक सरदार आले व लाजेनें खालीं माना घालून परत गेले. शेवटीं शिवप्रभु जसे अजिंक्य राहिले तसा हा त्या प्रभूचा शागीर्द हि अजिंक्य राहिला; आणि अपमानानें काळवंडलेल्या तोंडानें औरगानें, याच्याशीं दोस्तीचा संधि केला.

बहादूरशहानें तो तह चालविल्यानें यानें त्याला अनेक वार मदत केली. पुढें काळ बदलला. दिल्लीपातशाही पुन्हां अत्याचारी बनली; पुन्हां शाही सरदार, राजाजी वर येऊं लागले. पुन्हां झगडा सुरूं झाला. त्यांत हि हा विजयी होत गेला. शेवटीं निर्वाणीची इंद्राची शक्ति म्हणून, बंगष आला; पण चिरंजीव राजेश्रींनीं, राव व भाऊ यांना पाठवून त्या शक्तीच्या ठिकऱ्या उडविल्या! गजेंद्रमोक्ष केला! "**गजको जब ग्राह ग्रस्यो, दुःशासन चीर खस्यो। सभा बीच कृष्ण कृष्ण द्रौपदी पुकारी॥ दीनन-दुख-हरन देव संतन-हितकारी॥**" असा हा माझा शिवबा आहे!

प्रत्येक अकरा वर्षांनीं श्री चरण दर्शन व केलेल्या कार्याचें श्री चरणां पाशीं कथन करण्याचा संप्रदायाचा दंडक असल्यानें, ती सेवा बजावण्यास पूर्वी एकदां मी हि श्रीं च्या पायां पाशीं गेलों होतों. त्या नंतर त्या चरणांचें दर्शन (गर्हिवरून) मला अभाग्यास घडलें नाहीं! परवां, माझ्या गुरुदेवांच्या

जागृत स्थानीं त्या श्रीसज्जनगडा वर माझे गुरुबंधु काकाजी, शिष्य राजाजी व इतर मंडळीं सह गेलों. श्रीसमाधीचें दर्शन–पूजन–अर्चन केलें. मध्यरात्रीं मला व काकाजींना श्रीं नीं साक्षात् रूपें दर्शन दिलें व जी आज्ञा केली ती च मीं आतां आपणां सर्वांना सांगणार आहे.

श्रीं चीं वरदी वचनें अशीं:—

**" देवाब्राह्मणांचीया या स्वराज्याचें चढतें वाढतें सामर्थ्य वृद्धीतें पावत आहे ! तें पाहून बहुत आनंद होतो. सर्वत्रांहीं एकचित्तें राज्याची अभिवृद्धि होय तें करणें. अभक्त – दुष्ट – रजनीचर यांचा नाश करणें. महाराष्ट्रधर्माच्या आड जीं जीं विघ्नें सर्वत्र उठिलीं आहेती तीं तीं अनासक्तीनें लाटून, कुटून, दापून, कापून काढिजे ! सज्जनांचीयां बंदाविमोचना साठीं व त्यांसीं सौख्य मिळवून देण्या साठीं, मोठया मोहिमा काढुनियां, त्रैलोक्यीं फौजा धाडिजे. मोठा कल्पांत घडवून आणणाऱ्या दुर्जन – दैत्यांसीं बुडविजे. अभक्तांचा क्षयो करून, सत्यधर्म स्थापुनियां हिंदुस्थान बळाविजे! शाहू म्हणजे शिवबाचा अवतार; अपुरें कार्य पूर्ण कराया तो पुनरपि आला आहे. विसाजी भट तथा विसाजी पोतदार हे श्री रघुपतींनीं तथा आम्हीं भीम–अंगद ची धाडिले आहेती ! त्यांसीं मद–मत्सर सोडोन सर्वें एकचित्त होणें; म्हणजे वैभव धांव घेईल, बंड–पाषांड मोडून शुद्ध अध्यात्म–रामराज्य – वाढेल ! तुमचीया सहाय्यासी श्रीरामवरदायिनी माता गुर्दा घेउनी उठिली आहे ! श्रीराम कर्ता, श्रीराम भोक्ता ऐसें चित्तारूढ आणुनी भूमंडळीं सर्वत्र हिंदवी स्वराज्य, फकीरशाही, रामराज्य पसराविजे ! आमचा पूर्ण आशीर्वाद असे ! ! जयजय रघुवीर समर्थ !!!."**

अशी आज्ञा करून कंठांतील सुवर्णचंपकाची पुष्पमाला प्रसाद म्हणून दिली ! तरी शाहु छत्रपति, राजा छत्रसाल, अष्टप्रधान आणि सर्व सरदारदरकदार मंडळी हो ! तुम्हां सर्वांस, महाराष्ट्रराज्यसद्गुरु श्रीसमर्थ श्रीरामदासस्वामींचा चरणरज हा प्राणनाथ गोसांवी, काकाजींच्या संमतीनें ( काकाजी कडे पाहतात, ते मानेनें होकार भरतात ), अशी आज्ञा करतों जे—

गुरुदेव आसना वरून खालीं उतरले. छत्रपती सह वर्तमान सर्व राजसभा

आपापल्या आसनां वरून खालीं उतरून उभी राहिली. गुरुदेवांनीं आपल्या मेखळेच्या खिशांतून एक छाटीची पुरचुंडी काढली. भाऊसाहेबांनीं आंतून एक सोन्याचा लहान चौरंग आणला व तो सिंहासना वर ठेवला. गुरुदेवांनीं त्या वर आपली पुरचुंडी सोडून तिची छाटी हंथरली. पुरचुंडींत ती पुष्पमाला होती. अजून हि ती टवटवीत होती. तिला वंदन करून त्यांनीं ती त्या छाटी वर ठेविली !

**गुरु**— ही श्रीं ची प्रसादमाला ! श्रीं चीं प्रसादपुष्पें आहेत ! तरी त्यांचे वरी हस्त ठेवून श्रीं च्या आज्ञे प्रमाणें वागण्याचें, प्रत्येकानें शपथप्रमाण करणें ! फार पूर्वी श्रीचरणां वर हात ठेवून असें च शपथप्रमाण मीं व काकाजींनीं केलें होतें च, परवां हि केलें; पण तुम्हां सर्वांच्या देखत आतां हि करतों.

असें म्हणून गुरुदेव सिंहासना जवळ गेले व त्यांनीं आपला उजवा हात श्रीपुष्पां वर ठेवला—

**गुरु**— श्रींच्या आज्ञे प्रमाणें प्राणत्याग होई पर्यंत वागेन !

अशी शपथ घेऊन व नमस्कार करून ते बाजूस सरले. मग काकाजींनीं हि तशी च शपथ घेतली. त्या नंतर अनुक्रमें पिताजी, छत्रपति, अष्टप्रधान, भाऊसाहेब व सर्व हिंदूमुसुलमान सरदारदरकदार या सर्वांनीं वरील प्रमाणें शपथा घेतल्या व नमस्कार केले.

सर्व मंडळी उभी च राहिली.

**काका**— राजेश्री ! श्रींची आणीक एक आज्ञा आहे. थोरल्या राजेश्रींची, आग्र्याहून सुटका व्हावी, म्हणून श्रींनीं श्रीकाशी विश्वनाथास काशी येथें गंगेस घाट बांधण्याचा आणि श्रीकाशी व श्रीप्रयाग हीं तीर्थे स्वराज्यांत आणण्याचा नवस नवसला होता ! राजेश्रींची सुटका झाली पण त्यांच्या धकाधकीच्या मामल्यांत ती गोष्ट राहून गेली. तेव्हां पासून आज पर्यंत रजनीचरांचीं बंडें वारण्यांत काळ गेला. आतां शांतता प्रस्थापित झाली. दिल्लीचा शहा, शिवबा ! तुमचा अंकित झाला. म्हणून परवां श्रीं नीं आज्ञा केली जे " आमचा पूर्वींचा हा नवस फेडावा ! " तरी शिवबा ! आज्ञे प्रमाणें वर्ता.

**छ**— ( हात जोडून ) श्री आज्ञा प्रमाण ! ( हात सोडून ) रावसाहेब विश्वनाथपंत पेशवे ! सरदार विश्वनाथपंत पोतदार ! भगवान विश्वनाथाची काशी व भगवान भरद्वाजाचें प्रयाग यवनांचे हातून सोडवून स्वराज्यांत आणा

व विश्वनाथाच्या गंगेस घाट बांधा, अशी आम्हीं तुम्हां उभयतांस आज्ञा करतों. त्या साठीं लागणारा सर्व पैका राजभांडारांतून मिळेल! घाट असे व्हावेत कीं, त्रिपुरी पौर्णिमेचा तेथें दीपसमारंभ होऊन, जणूं कैलास खालीं उतरला असें दिसावें!

या वर श्रीमंतांनीं व भाऊसाहेबांनीं हात जोडून "आज्ञा प्रमाण" म्हटलें. मग—

**भूषण**— उभयतां महाराजसरकार! व राजसभेंतील सर्व सभासद हो! श्रींच्या वरदानांतील एकूण एक शब्द महत्त्वाचे आहेत; पण त्यांत हि "**सर्वत्रांहीं एकचित्तें राज्याची अभिवृद्धि होय तें करणें,**" हे शब्द अधिक महत्त्वाचे आहेत! एकचित्ता ऐवजीं, एकी विना, अनेकविध चित्तांनीं, बेकीनें राज्याचा संकोच च काय पण नाश होईल! आपसांतील फुटीनें व अनीतीनें सर्व नाश होतो! ऐका—

"**आपस की फूट ही ते, सारे हिन्दुवान टूटे। टूटयो कुल रावन, अनीति अति करते। पैठिगो पताल बलि, बज्रधर ईरषाते। टूटयो हिरनाक्ष, अभिमान चित्त धरते॥ टूटयो शिशुपाल, बासुदेव जूं सो बैर करी। टूटयो है महिष दैत्य, अधम बिचरते। रामकर छुवन ते, टूटयो ज्यों महेषचाप। टूटी पातसाही, सिवराज संग लरते॥**"

म्हणून एक-चित्त व्हा!

**काकाजी**— बेटा, भूषण! तूं हि श्रीरामदासीपंथाकित च आहेस! सभासद हो! गुरुदेवांच्या या शिष्याची तुम्हांस फारशी माहिती नाहीं. याचें नांव मणिराम असून, आडनांव भूषण आहे. भोंसले घराण्या प्रमाणें याचें कुलदैवत देवी आहे. त्या देवीचें नांव रत्नाकरी उर्फ भूइया. याचें गांव तिकमापूर; त्या गांवा शेजारीं देवीचें स्थान आहे. हा वत्सगोत्री ब्राह्मण. याचा एक भाऊ चिंतामणी, हा शहाजादा सूजा व त्याचा पुत्र जैनुद्दीन महमद यांच्या आश्रयास प्रथम होता. पण मणिरामाच्या सांगण्या वरून त्यानें तो आश्रय सोडला व परवांच्या आपल्या फकीरमंडलांत सामील झालेल्या बुंदीनरेशाचा आश्रय धरला! याचा दुसरा भाऊ नीलकंठ. तो आपल्या फकीरमंडळांतील गढवालनरेश फत्तेशहा याचे दरबारीं आहे! त्या दोघां भावांनीं त्या दोघां राजांचीं मनें आमच्या कडे येण्यास अर्धी अधिक वळवून ठेवल्या मुळें च,

आपल्याला, त्यांना पूर्णपणें फक्कीरशाहींत सामिल करतां आलें. मणिराम हि तेजस्वी आहे. हा लहानपणीं फार हूड असे. लिहिण्या वाचण्या कडे याचें लक्ष्य नसे. घरांत कोणाशीं हि याचें पटत नसे. एकदां जेवते वेळीं यानें मीठ मागितलें असतां, याची भावजय यास टोंचून बोलली. तें यास लागून हा घरा बाहेर पडला. मग रत्नाकरी पुढें यानें खडतर तप केलें. देवी प्रसन्न होईना म्हणून हा स्वतःची जीभ कापून वाहण्यास सिद्ध झाला असतां, श्रींच्या आज्ञे वरून, माझे गुरुबंधु तेथें प्रकट झाले, व यांनीं याचा हात धरला. याचे हातून हिमालयाच्या भोटा पासून, कृष्णाथडीच्या सह्याद्रीच्या घाटां पर्यंतच्या हिंदुस्थानांत लोकजागृति करावयाची असा श्रीं चा मनोदय होता ! म्हणून याला वरील कृत्या पासून परावृत्त करून गुरुदेवांनीं श्रीसंप्रदायाची दीक्षा दिली. त्या नंतर जागृती करीत करीत हा इकडे आला असतां, चिरंजीव भाऊनें, याची राजेश्री शिवबांशीं (शाहूशीं) गांठ घालून दिली. यानें राजेश्रीस थोरल्या शिवप्रभूचें वर्णनपर "शिवा बावनी" काव्य, तेथल्या तेथें रचून म्हणून दाखविलें ! तेव्हां या धाकल्या शिवबांनीं याला पुष्कळ बक्षिसी दिली व "राज-कवि" म्हणून राजसभेंत राहण्यास सांगितलें ! परंतु याच्या हातून व्हावयाचें कार्य अपुरें राहिलें होतें म्हणून त्या वेळीं गुरुदेवांनीं मोडता घातला ! आतां तें कार्य पूर्ण झालें आहे. तेव्हां, राजेश्री ! आतां तुम्हीं याला सुखेनैव राज-सभेंत ठेवावें.

**गुरु**— होय ! माझी पूर्ण संमति आहे.

छ— "राजकवि–भूषण" ! भूषणजी ! गुरुदेव व काकाजींच्या आज्ञे प्रमाणें आपणांस या राजसभेंत निरंतरचे नेमण्यांत आलें आहे. राजकवीचीं वस्त्रें व वृत्तीपत्र ( तैनात–जाबता ) आपणांस आतां च देतों.

असें म्हणून छत्रपतींनीं चिटणीसां कडे पाहिलें. त्यांनीं एक सरपोसानें आच्छादिलेलें तबक आणून छत्रपतींच्या हातीं दिलें. तें छत्रपतींनीं, भूषणच्या हातीं देऊन म्हटलें—

छ— "राजकवि" ! या वस्त्रांचा व वृत्तीपत्राचा स्वीकार करा.

भूषणनें तबक घेतलें व छत्रपतीमहाराजांना तीन वेळ वंदन केलें व पुढील कवित्तें तेथल्या तेथें रचून तत्काळ म्हटलीं:—

**" कामिनि कंत सों, जामिनि चंद सों, दामिनि पावस मेघ घटा सों, । कीरति दान सों, सूरति ज्ञान सों, प्रीति बडी सनमान महा सों, ॥ भूषण ! भूषण सों तरुनी, नलिनी नव पूषन देव प्रभा सों । जाहिर चारिहु ओर जहान लसै, हिन्दुवान खुमान सिवा सों ॥ "**

ज्याप्रमाणें स्त्री पतीच्या योगानें, रात्र चंद्रानें, वीज वर्षाकालीन मेघपटलानें, कीर्ति दानानें, रूप किंवा श्रुति ज्ञानानें, प्रीति सन्मानानें, तरुणी भूषणानें, कमलिनी सूर्याच्या नवप्रभेनें जशी शोभते, त्या प्रमाणें जगांत हा हिंदूंचा समुदाय, आयुष्मान शिवराजा मुळें चहूं कडे शोभत आहे ! तसें च—

**" राखी हिंदुआनी, हिंदुआनको तिलक राख्यौ, अस्मृति-पुरान राखे वेदविधि, सुनी मैं । राखी बुंदेली राजधानी राखा छत्रकी, धरा में धरम राख्यौ, राख्यौ गुन गुनी मैं ॥ भूषन सुकवि, जीति हद्द मरहट्टन की, देस देस कीरति बखानी तव सुनी मैं । शंभू के सुपूत सिवराज समसेर तेरी, दिल्लीदल दाबिकैं दिवाल राखी दुनी मैं ॥ "**

या नंतर छत्रपतींनीं भालदारास खूण केली. पहिला भालदार म्हणाला—

भाल— क्षत्रियलज्जारक्षक पन्नानरेश ! छत्रसाल महाराज ! निगाह् रक्खो सरकार—

**" भुज भुजगेस की वै संगिनी भुजंगिनी सी खेदि खेदि खातीं दीह दारुन दलके । बखतर पाखरिन बीच धसिजाति मीन पैरि पार जात परवाह ज्यों जलनके । रैया राय चंपति को छत्रसाल महाराज भूषन सकत को बखानि यों बलन के । पच्छी पर- छीने ऐसे परे पर छीने बीर तेरी बरछी ने बर छीने हैं खलन के ॥ "**

दुसरा भाल— निगाह् रक्खो महाराज छत्रसालजी देव !

**" चाक चक चमू के अचाक चक चहूं ओर चाक सी फिरति धाक चंपति के लाल की । भूषन भनत पातसाही मारि जेर कीन्हीं काहू उमराव ना करेरी करबाल की । सुनि सुनि रीति बिरदैत के बडप्पन की थप्पन उथप्पन की बानि छत्रसाल की । जंग जीति-लेवा ते वै ह्वैकै दामदेवा भूप सेवा लागे करन महेवा महिपाल की ॥ "**

दरबार बरखास्त ! निगाह् रक्खो महाराज !

---

# गजेन्द्रमोक्षाचें भरतवाक्य ! [ पाकळी अकरावी ]

श्रीमंत विसाजी पंतप्रधान व राजकुमारी मदयंती ताईसाहेब यांचा ( खांडा ) विवाह ठरल्याप्रमाणें झाला ! त्याचें वर्णन काय करावयाचें ? एकीकडे महाराष्ट्रराज्याचे छत्रपति तर दुसरीकडे बुंदेलखंड—राज्याचे अधिपति ! छत्रपतींचा आवडता— बंधुतुल्य— प्रधान वर एका बाजूस, तर महाराजांजींची लाडकी— मानलेली असली तरी— कन्या वधू दुसऱ्या बाजूस ! मग तेथें कशाची उणीव असणार ? सोनें व सुगंध एकवटला ! " जेथें वसे छत्रपति । आणि छत्रसाल क्षितिपति । तेथें अष्ट महासिद्धी राबती । काय म्हणोनीं वर्णावें ? ।। " वरघोडयाचें— त्या स्वारीचें— वर्णन केल्यास असें होईलः—

" पुढें निशाणें कर्णे भेरी । कडक गाजे वाजंतरी । संख्ये वीण बहु परी । अनेक वाद्यें वाजतीं ।। १ ।। पुढें गजांचे गजभार । शृंगार मंडित अपार । वीर बैसले थोर । वाजीमंडित वऱ्हाडी ।। २ ।। जांबुनदाचा वोतला । चित्र विचित्र ठसावला । रत्नमंडित निघाला । रथ पंत प्रधानजी कारणें ।। ३ ।। छत्रें पताका लखलखीत । मेघडंब्रे तगतगीत । मुक्त चांदोवे झमकत । घोसमणी रत्नांचे ।। ४ ।। त्रैलोकीचे नवाजी । अणसुट निर्मळ च्यारी वाजी । स्वेतवर्णी तेजःपुंजी । तया रथासी शोभले ।। ५ ।। जेथें अश्ववाहकु आपण । केळशीचा विसाजी जाण । तेया रथाचे गुण । काई वर्णू ? ।। ६ ।। ध्वजे वरी सिद्धेश्वरु । तो मूर्त्तिमंत शंकरु । सारथ्थीं

बाबुरावु। पंत प्रधानें सीं ॥ ७ ॥ देखां नवल तेया भाऊचें। अद्भुत प्रेम मित्राचें। जें सारथ्य प्रधानाचें। करितु असे ॥ ८ ॥ वर– पूजेची सामग्री। छत्रें त्राहाटलीं तया वरी। रुखवत परोपरी। छत्रसालें चालविलें ॥ ९ ॥ कनक तारें अपारा। अक्षता हातवे सुंदरा। आरतिया बाजी वीरा। वधुसिबिका चालल्या ॥ १० ॥ तया मागें सिबिका। वऱ्हाडणी मंगळिका। समस्त मुख्य नायिका। राजवल्लभा चालिल्या ॥ ११ ॥ तया पाठिसीं सिबिका। उपाध्ये ब्राह्मणांच्या अनेका। तयामागें रत्नखाचित शिबिका। छत्रपतींची चालली ॥ १२ ॥ कनकमणी रथ बरवे। खचित मुक्तांचे चांदोवे। राजे– प्रधान– सरदार थवे। वरां वेष्टित चालले ॥ १३ ॥ वरघोडा चालला विराजमान। बाजीराया लागोन। पाहाती आश्चर्यानंदें करोन। पुरवासी जन नरनारी ॥ १४ ॥"

वराची स्वारी वधूमंडपीं आली. पिताजींनीं जांवयाचें यथासांग पूजन केलें. छत्रपतींनीं वधूची पूजा केली.

"मुक्तमंडित पीतांबर। मुक्त– कंचुकी परिकार। छत्रपतीनें समर्पिला सुंदर। राजतनयेतें शोभला ॥ १ ॥ जें तानवडें सुंदरी। रायें वाहिलें राजकुमरी। त्याच्या तेजा पुढें थोरी। सूर्य– प्रभेची झांकली ॥ २ ॥"

छत्रपतींनीं वधूस वस्त्रालंकार जे दिले ते असे होतेः— पिवळी पैठणी पिंवळी कंचुकी, पिवळा शेला, पाटाव, हीं सर्व रेशमी जरीचीं व मोत्यें जडलेलीं; शिवाय अनेक रंगांचीं व अनेक पेठांचीं रेशमी लुगडीं, अलंकारांत तानवडें, शीसफूल, शीसजाळी, शीसमणी, फरा, नागर फणी, वेणी– गोंडे, गोफ, मोत्यांच्या माळा, बिजवरा, मोहनमाळ, चांपेमाळ, नथ, वांकी, बाजुबंद, बांगड्या, कांकणें, तोडे, पोंवची, अंगठी, कमरपट्टा, वाळे, सांखळ्या, जोडवीं, विरवल्या, हे सर्व रत्नजडित अलंकार होते.

पिताजींनीं वरास दिलेलीं वस्त्रें, मंदील, शेला, पीतांबर, अंगरखा, निमस्तनी, विजार सर्व जरींचीं होतीं. वर भीकबाळी, कुडक्या, चौकडा, करदोडा, सलकडीं, आंगठी, पोहोंची, कंठा हे सर्व जडावाचे अलंकार होते.

गुरुदेवांनीं भाऊसाहेबांच्या हस्तें काकाजींना रत्नजडित सुवर्णाचें एक घटिकापात्र देऊन त्यांची जोसपणाची दक्षिणा हि दिली !

पंतप्रधानांचें व ताईसाहेबांचें लग्न लागलें ! " दिव्यासनीं बाजीराज । वाम भागीं मदयंती भाज । सर्व भूषणें तेजःपुंज । वधूवरें शोभलीं ॥ " तो वधूवरांचा जोडा कसा होता ? " तें वोहर अलौकिक । पाहतां निवाले सर्व लोक ॥ " छत्रपती–पिताजींनीं मग देकार वाटला. तो " दोन्ही पक्षांचे ईडे पाडे । देकार मांडला चढें चढें । सर्व पौर पुढें पुढें । निकट अंतरें दाटला ॥ " असा होता; आणि भोजनसमारंभ तर " जैं तृप्तीचें तृप्तपण । त्याचीं जालीं भोजनें ॥ " असे घडत होते. हा सर्व समारंभ आठ दिवस चालला होता.

पिताजींनीं ताईसाहेबांना प्रधानांच्या हातीं निरविलें. त्यांच्या डोळ्यांत अश्रु आले ! काननवासी, कौपीनधारी, कंदमूलफलभोजी, कण्व, अशा क्षणीं गंहिवरले च होते कां नाहीं ? मग पिताजी तर राजे होते. ते, जांवयास म्हणाले— " माझ्या प्राणाची प्राणकळा । सुखदायक सुसीळा । परम स्नेहें कृपाळा । ईचें पाळण करावें ॥ सकळ कीर्तीची गजगजा । निरोपम्य हे अवनिजा । ईचें पाळण सुखें वोजा । बहु प्रकारें करावें ॥ ". जामातानें तसें वागण्या बद्दल श्वशुरास भाक दिली !

या गोष्टीस आठ दहा दिवस झाले. सायंकाळची वेळ असून, स्थळ पंत प्रधानांच्या वाड्याच्या ( आजचा अदालतीचा वाडा ) मागील अशोक वाटिका होती. त्या बागेंत एका संग मर्मरी चौरंगावर बसून रतन फुलांचे हार गुंफित होती. जवळ गुंफलेले हार बरेचसे ठेवलेले होते. गुंफतां गुंफतां रतन गात होती.

( राग बहार )

**" बहार आई बेलरीया, फुली रही अमरैया मोरा रे । बाग बाग मलीया बोले, लांबे थांबे थांबे, किनीवाले लाल, बेलोवाले राम ॥ धृ० ॥ डार डार और पात पात पर, भंवर फिरत मन लाये... ! "**

इतक्यांत तिच्या मागल्या बाजूनें हळूं च मानसिंह आला. ती गात आहे असें पाहून तो तेथून हळूं च निसटला व थोड्या अंतरा वरील एका कुंजांत बसून त्या च पदाचा पुढील अंतरा गाऊं लागला !

**अमरैयन पर बैठी कोयलिया, कूकत सबद सुनाई । पीऊ पीऊ करत पपीयरा, चहूं ओर हंसत, बसंत फुलाये ॥ अत मन भाये...**

मानसिंहाचे सूर ऐकून रतन दचकली. ती इकडे तिकडे पाहूं लागली.

पहिल्यानें तिला मानसिंह दिसला नाहीं. गाणें लक्ष्य लावून ऐकल्या वर त्या दिशेस ती वळली व कुंजांत येऊन मानसिंहाच्या पाठीं उभी राहिली. मानसिंहानें तें पद संपविलें व त्या च रागांतील दुसरें पद म्हणण्यास प्रारंभ केला.

**नई बहार आयी, मन भाई, ब्रजकी नार। सब बन बन मिल मिल, फुलवा बीनन को धाई ॥ धृ० ॥ डारी डारी रस लेत भंवरवा, कोयलिया बोल रही। अंबुआ मौल रहे, सब शीतल मंद सुगंध मारुत बहे ललित लता द्रुम छाई ॥ १ ॥ बोलत सारस, मोर, कोकिला, नाना पंछी शब्द सुनाई। चलो न बेग कुंवर कुंजन में, फूल रही फुलवारी प्यारी ॥ २ ॥ तोहिं श्याम बुलावत, लेहु प्रेमरस, कृष्णदास मन भाई ॥ ३ ॥**

रतननें हळूं च हांक मारली; ती मानसिंहानें ऐकली पण मुद्दाम च तिकडे त्यानें दुर्लक्ष केलें. पुन्हां—

र— अहो, बेलेवाले राम !....अहो, कुंजांतील श्याम ! प्रेमरसांत आपादमस्तक बुडून गेलां वाटतें ?

तरी हि मानसिंहानें तिच्या कडे पाहिलें नाहीं तो गाण्याचे चरण गुणगुणत होता. " अमरैयन पर बैठी कोयलिया, कूकत सबद सुनाई... "

रतन आतां त्याच्या पुढें आली व तिनें त्याला हालवून म्हटलें—

र— कां ? कोणत्या कोकिळेनें इतकें मन बेभान केलें आहे ? माझे शब्द हि ऐकूं आले नाहींत ? ( कृत्रिम क्रोधानें ) इतका कोणत्या कोकीळेचा ध्यास लागला होता ?

मा— ( दचकल्या सारखें दाखवून ) आं ? काय ?... काय म्हणतेस ? कुंजविहारी श्यामकुंवरनें तुला नाहीं कांहीं बोलाविलें ! मग तूं कां आलीस ?

र— ( संशयानें ) मग श्याम कोणाला बोलावीत होता ?

मा— " अमरैयन पर बैठी कोयलिया " तिला.

र— ( मत्सरानें ) कोठली ही कोकिळा ?

मा— आहे या परळखोऱ्यांतील काळ्या रंगाची !

र— म्हणजे बुंदेलखंडी कोकिळेस विसरलां वाटतें ?

मा— ( थट्टेनें ) आतां बुंदेलखंडी कोकिळेस काय करावयाचें ? बुंदेले फार भांडखोर ! सदोदित एकमेकांचीं डोकीं फोडणारे ! खून-खराबा

करणारे. यमुनेच्या दक्षिणेस वाघेलखंड आहे ना? तेथले लोक म्हणे वाघा सारखे क्रूर आहेत; पण भांडखोरपणांत ते हि बुंदेल्यां पुढें हात टेकतील. आपल्या कडे म्हण च आहे ना? " सो बाघेलखंडी तो एक बुंदेलखंडी!" शंभर वाघ्यांना एक बुंदेला पूरा पडतो.

र-- बरें मग?

मा-- अग, ऐकून तर घे! हें झालें पुरुषां संबंधीं; आमच्या बायका तर बोलावयास च नको. " अकेली नार बुंदेलखंडी। हराई देत सो शत चंडी!" अशी बुंदेलणी बद्दल म्हण आहे. दहा हजार क्रूर चंड्यांना एक बुंदेलखंडीण भारी आहे! मग असली भांडकुदळ बुंदेलखंडी कोयल काय करावयाची? नको रे बाबा! ती भांडून भांडून आपल्या जिभेच्या कुदळीनें माझें शरीर च काय पण प्राण हि कुदळून काढावयाची!

र-- ( रागानें ) पहा बरें कां? माझी ही नालस्ती मला खपावयाची नाहीं. मीं ताईसाहेबांना सांगून इकडे शिक्षा करावयास लावीन!

मा-- अं:! आतां तुझ्या रागाची पर्वा कोण करतो? आतां आपलें लग्न होऊन गेलें आहे! अग! अलीकडे अशी रीत निघाली आहे कीं, लग्ना पूर्वीं आपल्या भावी वधू पुढें – लोकांना चोरून – गोंडा घोळावयाचा पण लग्ना नंतर तिला कोंपऱ्यांत सारून दुसऱ्या च प्रिय पात्राच्या–अधार्मिक–भानगडींत गुंतावयाचें! ताईसाहेबांना तरी तुझी तक्रार ऐकण्यास आतां वेळ कोठें आहे? विवाह झाल्या पासून श्रीमंत सरकार तर सारखें येऊन जाऊन त्यांच्या च महालांत असतात! तेथें तुला कोण जाऊं देणार? आणि समज तुझी व त्यांची गांठ पडली आणि त्यांनीं तुझ्या त्या " इकडे "–काय हेंगाडी मराठी भाषा आहे बोवा!–शिक्षा फर्माविली तर मीं तिकडे – त्या कोयले कडे –पळून जाईन! समजलीस?

र-- ( रागानें ) आज फार तोंड सुटलें आहे? कांहीं अंमलबिंमल केला आहे काय?

म-- छट्! दिल्लीच्या राज्यांत दारू सकट सगळ्या अंमलपाण्याचा अंमल करतां येतो! आपल्या तिकडे हि भांग – कुसुंबा – चरस चालतो! पण या डोंगरी राज्यांत या सर्व जळत्या पाण्यांना बंदी आहे; आणि ती इतकी कडक आहे कीं, हुकूम मोडणाऱ्याच्या तोंडांत शिशाचा रस ओतण्याची शिक्षा

दिली जाते! हे मरगट्टे फार च अरसिक बोवा! मदिरा – मदिराक्षी यांना मानवत नाहीं! दारू पिण्यास कायद्यानें बंदी? रतन! ती तर चौदा रत्नां पैकीं एक रत्न आहे! हे मराठे कांदाभाकरी खाणारे त्या मुळें यांच्या डोक्यांत सर्व प्याज च भरले आहेत. नाहीं तर आमच्या कडील दिल्ली–दरबार पहा! क्वचित् दारूबंदी करणारा एकादा शहा निघतो. पण त्यांत सुद्धां जहांगीरा सारखा एकादा स्वतः च पितो ना? दिल्लीदरबारास या दारूखात्याचें उत्पन्न तरी कांहीं कमी मिळत नाहीं! अग! त्या मुळें राज्यकारभाराचा बराचसा खर्च भागला जातो ना? परंतु येथील दरबारानें असलें सहजासहजीं मिळणारें उत्पन्न, मुळीं उत्पन्न च करावयाचें नाहीं असें कायद्यानें ठरविलें आहे! काय म्हणे हें पापी उत्पन्न आहे. अग! शेरी सुद्धां बंद. ज्यांचा जीव तडफडत असेल त्यांना फक्त नीरा पिण्याची सवड ठेविली आहे! मोठी च सवलत! अग! गुरुदेव झाले म्हातारे! त्यांनीं छत्रपतींना आज्ञा केली व त्यांनीं पंत प्रधानांना केली आणि त्यांनीं लेखणीच्या एका फटकाऱ्या सरशीं, हा पूर्वीचा च कायदा पण कडकपणें पुन्हां जारी केला. त्या मुळें दारूबाजांना ममईस त्या टोपकर इंग्रे-जाच्या वखारींत जाऊन चोरून दारू प्यावी लागते!

र— मग त्यांत काय वाईट झालें? शराब झोकून स्वतःच्या बायकोस झोडपण्याचें वा मदिरा पिऊन परक्याच्या मदिराक्षीला भ्रष्ट करण्याचें पुण्य तरी, हें सरकार इकडील पुरुषांना लाभूं देत नाहीं! हें चांगलें का वाईट?

मा— वाईट, वाईट! अग! असुर वृषपर्व्याच्या राज्यांत म्हणजे पूर्वीच्या पर्शु देशांत म्हणजे हल्लींच्या इराणांत, सर्व प्रजेस मनसोक्त सुरा पिण्याची मोकळीक होती. खुद्द त्यांचे भार्गव शुक्राचार्य सुद्धां मद्य पीत! त्या घोटाळ्या मुळें तर ययातीच्या गळ्यांत देवयानी पडली! त्या राज्यांतील प्रत्येक माणूस निदान एक जामभर तरी मद्य पिई. ही वाडवडिलांची देणगी पारश्यांनीं जपून ठेविली होती. पण आमचे प्रधान पडले विचित्र! त्यांनीं या पारश्यांना सुद्धां दारूबंदी केली! दिल्लीरियासतींत ही पीडा नाहीं. अग! या मुसुलमानांचीं बहुतेक गाणीं शराबा वरचीं असतात; त्यांत इष्काला तर सररहा शराबाची च उपमा असते! फार काय सूफी अवलिये, सांई यांच्या काव्यांत सुद्धां भक्तीला शराबाची उपमा दिल्या वांचून त्यांना राहवत नाहीं. सराज नांवाचा सांई काय म्हणतो ऐक--

( राग -- सोहनी )

**" खबरे तहय्युरे इशक सुन, न जुनूं रहा न परी रही । न तो तू रहा, न तो मैं रहा, जो रही सो बेखबरी रही ॥ वह जो होशो अकलो हवास थे, तेरी थूं निगह ने उडा दिये। कि शराबे सद कदहे आर्जू खुमे दिल में थी, सो भरी रही ॥ "**

इसका मायना ये है कीं, " इश्ककी अजब खबर सुननेसे, न तो दुनिया का पगलापन रहा, न संसारकी, खुबसुरती रही; और इस इश्कके आनेसे, न तो तूं रहा और न मैं रही ! जो कुच्छ रहा वह बेखबरी ( आत्मैक्य ) रही ! ऐ यार [ आत्मा ] ! वह जो होश अरु अक्कल अरु हवास थे, तेरी नगहसे उड गये ( आत्मानुभवसे अक्कल इत्यादि भाग गई ) और सैंकडों किस्मकी ख्वाहशरूपी प्यालों की शराब, जो दिलरूपी मटकेमें भरी हुई थी, वह यूं की त्यूं भरी रही ! " समझी, रतन ?

**र**— हां समझी, उमर खय्याम ! पुरे झाला तुमचा वात्रटपणा. तुम्हांला एवढी शराबीची आवड असेल, तर या राज्यांतून उठून जा त्या दिल्लीसरकारच्या राज्यांत.

**मा**— तिकडे कशाला ? इकडे च मला शराब वाटेल तेव्हां व वाटेल तितक्या वेळां घेतां येते !

**र**— खोटें ! कोठें शराब घेतां हो ? यवतेश्वराच्या डोंगरांत रात्रीं जाऊन चोरून पितां कीं काय ?

**मा**— यवतेश्वर कशाला ? येथें पेशवेसरकारच्या वाड्यांत, दिवसां, आणि तें हि त्या परळखोरी कोयलेच्या संनिध !

**र**— ( रागावून ) लाज वाटते काय ? येथें येऊन हे ढंग सुरूं केलें वाटतें ? थांबा ! मीं हे सर्व चाळे ताईसाहेबांच्या कानीं घालून—

**मा**— मला सजा देवविशील, ही मला खात्री च आहे बघ ! पण ती मराठी कोयल तर सुटी च राहील कीं नाहीं ?

**र**— ( चिडून ) तिच्याहि झिंज्या पकडून तिला ताईसाहेबां पुढें उभी करून तिची धिंड काढीन, तर च मी—

**मा**— खोटी ! खरी नव्हे ! तुझी काय शहामत आहे तिला पकडायची ?

**र**— मला ती नकटी दिसूं द्या म्हणजे शहामत आहे कीं नाहीं तें प्रत्यक्ष च दिसेल !

**मा**— अग दहा हजार चंडयांना हरविणा-या तुझ्या सारख्या बुंदेलिणीला हि. ही मराठीण भवानी एका क्षणांत गप्प बसवील ! माझी पूरी खात्री आहे कीं, तिला पाहिल्या बरोबर तूं जागच्या जागीं थंड होशील. इतकें कशाला ? मीं तिला आतां बरोबर घेऊन च आलों आहे—

**र**-- कोठें आहे ती हडळ ? ( त्याचा हात धरून ) दाखवा मला. ( त्याला उठवून ) दाखवा ! चला—

**मा**--. अग. पण हो ! इतकी घाई, आपल्या लग्नाच्या वेळीं बोहल्या वर चढतांना हि तूं दाखविली नाहींस ! कां माझी शराब तुला चढली ?

**र**-- मीं आतां ऐकणार नाहीं. मला या गप्पांत अडकावून, तिला तिकडे पळून जाण्यांस सवड देतां काय ? [ त्याला ढकलीत ] चला.

**मा**-- बरें बोवा चल, दाखवतों...पण जातां जातां तुझ्या प्रतिज्ञेचे शब्द घोकीत चल...तिच्या झिंज्या पकडावयाच्या...ताईसाहेबां पुढें उभी करावयाची...धिंड काढावयाची...नकटी करावयाची...हडळ बनवावयाची....

असें म्हणून मानसिंह चालूं लागला; त्याच्या मागून रतन निघाली. चालतां चालतां मानसिंह एका कुंजाजवळ उभा राहिला.

**मा**— या कुंजांत ती बसली आहे चल !

दोघे आंत गेले. आंत एक पुष्करणी होती. कुंजांत इकडे तिकडे पाहून मानसिंह म्हणाला—

**मा** —अरेच्या ! पळाली वाटतें ? ... हो ! ती आहे मराठीण ... या मराठणी पोंहोणाऱ्या असतात ... चल ! तूं ... या पुष्करणींत दडून बसली असेल ... दुर्योधना सारखी जलस्तंभन विद्या तिला येत असेल !

दोघे पुष्करणीच्या कांठा वर आले व आंत पाहूं लागले.

**मा**—पाहिलेंस ... माझें म्हणणें खरें झालें ... ती बघ आंत लपून बसली आहे ... ती आपल्या दोघां कडे रागानें पाहते आहे.

**र**—( चिडून ) हा काय फाजीलपणा चालविला आहे ? पाण्यांत आपल्या दोघांच्या पडछाया आहेत ! ती कोठें आहे ?

**मा** — अग, ती ! ... ती ... ती ... दिसत नाहीं तुला ? ती तर

तुला रागावून पहाते आहे ! आणि तूं हि तिला पहाते आहेस ... आतां दोघींत फरक काय राहिला ?

र— ( विरमून ) म्हणजे माझी च पडछाया मला दाखवितां होय ?

मा— नाहीं तर काय माझी दाखवूं ? अग वेडे ! मी काय उल्लू आहे, लग्नाच्या बायकोस फसवून असले पापी चाळे करावयास ? भाऊसाहेब सरकारांच्या संगतीस इतके दिवस राहून हें च काय सार्थक करावयाचें ? मीं केवळ इतका वेळ तुझी थट्टा केली !

र— ( आनंदून ) खरेंच ?

मा— खरें, खरें, अगदीं तुझी शपथ खरें !

र— आतां माझें समाधान झालें ! पण तुम्ही शराब कोठली पितां ?

मा— अग तुझ्या डोळ्यांतील लहरींची आणि ... आणीक सांगूं कोठली ती ? ... तुझ्या—

र— ( खालीं मान घालून ) कांहीं नको सांगायला ! बरें, मी रजपुतीण असून मला मराठीण कां म्हटलें ?

मा— आतां तूं महाराष्ट्रांत आलीस, महाराष्ट्रराज्याची प्रजा झालीस नव्हे एक सरदारीण झालीस मग तूं आतां मराठीण नाहीं तर कोण ? या राज्यांतील एकूण एक रयत—मग ती कोणत्या हि जातीची, धर्माची किंवा पंथाची असो, ती एकजात – मराठा च आहे ! हें तत्त्व तूं आतां पर्यंत अनेक वेळां ऐकलें च आहेस. बरें, पण काय ग ? त्या मराठीण हडळीस पकडून, ताईसाहेबां कडून तिला व मला शिक्षा देण्याच्या तुझ्या त्या प्रतिज्ञेचें काय ?

र— प्रतिज्ञा होय ? जाऊं द्या ! त्या हडळीच्या, भवानीच्या मागें कोणीं लागावें ? तिला मीं क्षमा केली ! कशी झाली तरी ती स्त्री ! स्त्रियां वर हत्यार उचलावयाचें नाहीं असा येथील राज्याचा नियम आहे ना ? आणि आम्ही बुंदेलणी हि स्त्रियांना शिक्षा करीत नाहीं हो ! पण इकडे बरीक शिक्षा करणार आहें !

मा— आला कां तुझा हा मरगट्टा " इकडे " ? कर बोवा त्या " इकड्या "ला शिक्षा ! काय करील बिचारा तो " इकडे ? " एका

हडळीच्या तडाक्यांतून सुटला तर दुसऱ्या शतचंडीच्या हातांत सांपडला ! हं ! काय शिक्षा फर्मावणार ?

र— त्या तिकडे फुलांचे हार करून ठेवले आहेत ना ? ते तेवढे वाडयांत घेऊन चलावयाचें !

मा— अग ! फार तर तीन चार हार असणार; आणि ते तिकडे घेऊन जाण्यास इकडयाला सांगतेस ? तूं च ने ना !

र— तीन चार नाहींत पुष्कळ आहेत ! आज, ताईसाहेब, श्रीमंत सरकारांची वसंतपूजा बांधणार आहेत ! तेवढ्या करितां हे इतके हार करावे लागले. या समारंभास सौ० थोरल्या वहिनीबाईसाहेब ( काशीबाईसाहेब ) हि हजर राहणार आहेत ! खरें च एक इकडे सांगण्याचें राहिलें—

मा— ए, घरधनीण मी तुला हात जोडतों, तुझा तो " इकडे " हुसकावून दे तिकडे ! " इकडे, इकडे " काय ? चांगलें माझें नांव घेऊन बोलत जा ना ?

र -- वाः ! लग्न झाल्या नंतर कोणीं नांव घेऊन हांका मारतें काय ?

मा— अरेच्या ! त्यांत काय अवघड आहे ? अलीकडे या परळखोऱ्यांतील हरिजनांच्या मुली तर लग्न झाल्या वर नवऱ्यांना त्यांच्या नांवांनीं व ते हि एकेरी नांवानें, फटाफट हांका मारीत सुटतात ! जणूं काय नवरा म्हणजे चाकर च ! मग तुला च काय शरम वाटते ?

र— जवळ शरम आहे म्हणून ! तें जाऊं दे. खरें च ! वहिनीसाहेब, ताई-साहेबांशीं किती प्रेमानें वागतात ? अगदीं सख्खा धाकट्या बहिणी सारखें ! मला प्रथम भीति वाटत होती कीं, हें कसें काय जमणार ? पण वहिनीसाहेबांचे वर्तन पाहिलें म्हणजे वाटतें कीं, त्या देवी द्रौपदी सारख्या थोर मनाच्या आहेत ! द्रौपदी व सुभद्रा जशा सख्ख्या बहिणींप्रमाणें वागत, तशा या दोघीं वहिनी-साहेब वागतात ! भगवान् महाकाल यांच्या भगिनीप्रेमास सतत भरती च देवो !

मा— नाहीं तर तूं ! शतचंडीचा अवतार ! नाहीं नाहीं प्रत्यक्ष भैरवी च ! नवऱ्याला फाडफाड बोलतेस काय ? त्याचे वर कट्यार काय उगारतेस ? थट्टेंतील सवत हि तुला सहन होत नाहीं ! त्या वेळचा तुझा अवतार पाहून मला वाटलें, सवतीच्या वेणीचा पाठी वर सोडलेला शेंपटा सोडून तूं माझी च

शेंडी पकडून, धिंड काढणार ! बाकी थोडीफार अक्कल ( डोक्यास हात लावून ) येथें आहे बरें कां ? आम्ही म्हणजे अगदीं च कांहीं महादेवापुढचे–

र— ( हंसून ) असावयाचें बरें का ? आणि म्हणून च तें हारांचें ओझें आपल्या माफक असल्यानें तें वाडयांत वाहून न्यावयाचें !

मा— ( हंसून ) काय करावें बोवा ! अडला नारायण—

दोघेजण, रतननें जेथें हार ठेविले होते, तेथें गेले व दोघांनीं हार गोळा करून वाडयांत नेले.

या नंतर अकरा घटकांनीं पुढील प्रसंग घडला.

भगवान ज्योत्स्नापतीची ज्योत्स्ना, ब्रह्मांडाच्या वरील कटाहांत व खालील कटाहांत एकसारखी च तळपत होती ! जणूं आकाशगंगेच्या धवल प्रवाहानें ब्रह्मांडास स्नान घालून पुनीत केलें आहे ! प्रधानांच्या वाडयांतील तिसऱ्या मजल्या वरील शुक्ती–सुधाचा सौध, सुधांशूच्या सुधेनें सुस्नात होऊन सुशोभित दिसत होता ! गच्ची वर एक मेघडंबरीचें छोटेसें, चारी बाजूंनीं मोकळें असलेलें दालन होतें ! त्याचें छत पांढऱ्या शुभ्र हस्तीदंताच्या वेलपत्तींनीं मढविलें होतें. तें, चार सुरूच्या पांढऱ्या रंगाच्या नक्शीदार खांबां वर उभारलें होतें. छतां मध्यें, खांबांना व चाऱ्ही पानपटयांना शुभ्र फुलांचे अनेक हार लटकावले होते. पूर्वे कडे तोंड करून एक चांदीचा चौरंग असून, त्या वर, ताईसाहेबांची आवडती, चांदीच्या चौकटींत बसविलेली, गजेन्द्रमोक्षाची तसबीर ठेवली होती. ती त्यांनीं पन्नाहून आपल्या बरोबर आणली होती ! चौरंगाच्या चारी बाजूंस, चार, चांदीच्या कमरे इतक्या उंचीच्या समया, सहा सहा वाती घातलेल्या तेवत होत्या ! तेवण्या साठीं तिळीचें तेल घातलें नसून, कनोजहून मुद्दाम मागविलेलें जुईचें फुलेल ( अत्तर ) घातलें होतें. दालनात दोन्ही बाजूंस मिळून आणखी सहा समया होत्या.

तसबिरी कडे तोंड करून, सर्व दालन भर पसरलेल्या शुभ्र गालिचा वर एक मश्रूची गादी असून तिच्या पाठीशीं वेलपत्ती काढलेला मश्रूचा लोड होता. त्याच्या दोन्हीं बाजूंस जरी–किनखाबाच्या दोन हात उशा होत्या.

गादी वर श्रीमंत बाजीरावसाहेब बसले होते. त्यांच्या अंगांत प्रथम एक लांब सदरा, त्या वर अर्ध्या दंडा पर्यंत व छाती पर्यंत असलेली जरीबुटयाची निमस्तनी व त्या वर पायघोळ बंदांचा झगा होता. पायांत घोट्या पर्यंत

जरीची किनखाबी घट्ट विजार होती. डोईस जरीचें बुट्टेदार पैठणी लहान पागोटें होतें, कपाळास आडवें एकबोटी केशरी गंध होतें. कानांत दोन मोत्यांचा चौकडा, गळ्यांत फेनधवल मोत्यांची कंठी व दुसरी कमरे पर्यंत लोंबणारी एक टपोरें मोत्यें व एक पाचूचा टपोरा मणी असे एका खालीं एक असलेली व प्रचंड हिऱ्याच्या खोडाचा मदनाईक ( मधलें पदक ) असलेली एकावली होती. दोन्हीं मनगटांत असल्या एकावलीच्या जातीचे गजरे होते.

त्यांच्या उजव्या हाता कडे भाऊसाहेब बसले होते. त्याचा पोषाक व अलंकार साधारणतः असे च होते. श्रीमंतांच्या डाव्या हाता कडे प्रथम सौ० काशीबाईसाहेब व त्यांच्या जवळ सौ० ताईसाहेब बसल्या होत्या. श्रीमंतांच्या लोडाच्या मागें, रतन, हातांत चवरी घेऊन उभी होती.

ताईसाहेबांनीं प्रथम **गजेन्द्रमोक्षाच्या** तसबिरीची पूजा करून मग श्रीमंतांची वसंतपूजा यथासांग केली. मग भाऊसाहेबांनीं, ताईसाहेबांना गाणें गावयास सांगितलें. रतननें ताईसाहेबांच्या हातीं तंबोरा आणून दिला. त्यांनीं तो लावला, व पुढील अष्टपदी म्हणण्यास प्रारंभ केलाः——

( राग वसंत )

**" विहरति हरिरिह सरस वसंते । नृत्यति युवतिजनेनसमंसखि, विरहि जनस्य दुरंते ॥ ध्रु० ॥ ललित लवंगलता परिशीलन कोमल मलय समीरे । मधुकर निकर करंबित कोकिल कूजित कुंजकुटीरे ॥ १॥ उन्मद मदन मनोरथ पथिक वधूजन जनित विलापे । अलिकुल संकुल कुसुम समूह निराकुल बकुल कलापे ॥ २ ॥ मृगमद सौरभ रभस वशंवद नवदल माल तमाले । युवजन हृदयविदारण मनसिज नखरुचि किंशुकजाले ॥ ३ ॥ मदन महीपति कनक दंडरुचि केशर कुसुम विकासे । मिलित शिलीमुख पाटलिपटल कृत स्मर तूण विलासे ॥ ४ ॥ विगलित लज्जित जगदवलोकन तरुण करुण कृत हासे । विरहिणि कृंतन कुंत मुखाकृति केतकि दंतुरि ताशे ॥ ५ ॥ माधविका परिमल ललिते नव मालिक जाति सुगंधौ । मुनि मनसामपि मोहन कारिणि तरुणाकारण बंधौ ॥ ६ ॥ स्फुरदति मुक्तलता परिरंभन मुकुलित पुलकित चूते । वृंदावन विपिने परिसर परिगत**

**यमुनाजल पूते ॥ ७ ॥ श्रीजयदेव कवेरिद मुदयति हरिचरण स्मृति सारं । सरस वसंत समय वन वर्णनमनुगत मदन विकारं ॥ ८ ॥ "**

वसंतऋतु, रात्रीची शांत वेळ, अमृत स्रवणारें चांदणें, एकतानतेचें गायन, समोर भगवान् विष्णु गजेन्द्रास संकटांतून सोडवीत असलेला भक्तिपर उदात्त प्रसंग ( चित्र ), चौरंगा पुढील धूपाच्या सुवासांत आसपासच्या हारांतील फुलांचा गंध मिसळून उत्पन्न झालेल्या कोमल व मधुर सुवासाची दरवळ, अशा समयीं सर्वांची शुद्धबुद्ध हरली ! ती यामिनी शुभ्रज्योत्स्नापुलकित होती, दालनांतील हार शुभ्र पुष्पाचे होते, वाड्याच्या अशोकवाटिकेंत शुभ्र फुल्ल कुसुमित द्रुम होते, दालनांतील सर्व सामान शुभ्र होतें ! त्यांतील व्यक्ती गौर होत्या आणि त्यांचीं वस्त्रेंभूषणें हि शुभ्र होतीं ! शुभ्र रंग हा सत्त्वगुणाचा दर्शक आहे; म्हणजे तेथें सर्वत्र सत्त्वगुणाचें साम्राज्य पसरलें होतें ! त्या गुणांत च समाधीसुख अनुभवितां येतें ! तेथली सर्व मंडळी पुष्कळ वेळ त्या सुखांत देहभान हरपून गेली होती. प्रथम श्रीमंत, वृत्ती वर आले.

**श्री** — वाहवा ! फार छान ! उत्तम ! फार उत्तम गाणें झालें ! काय भाऊ ?

**भा**— खरें च उत्तम ! पण, राव ! गायकास बक्षीस नको का ?

**श्री**— गायक व श्रोता अभिन्न असल्यानें कोणीं कोणास बक्षीस द्यावयाचें ?

**भा**— पत्नीच्या बाबतींत पतीला अशी पळवाट काढतां आली तरी ( हंसून ) बहिणीच्या बाबतींत भावाला तशी काढतां येत नाहीं !

**श्री**— ( हंसून ) मग भाऊ, बहिणीस काय बक्षीस देणार ?

**भा**— तुम्हीं पुण्यास एक सरकारवाडा बांधणार आहां ना ? त्यांत ईशान्य दिशेच्या कोपऱ्यांत मीं माझ्या बहिणीस एक महाल बांधून देईन ! झालें आतां ?

**श्री**— सदोदितचा बंधू पण सध्यांचा मेव्हणा, येथून अहेरा विना कसा जाऊं द्यावा ? आपल्याला पुणें नवीन वसवावयाचें आहे च ! त्यांतील तीन पेठा तुम्हीं वसवाव्या. त्यांची चौधरिकी तुम्हांस वंशपरंपरा देईन ! ( सौ० काशीबाईसाहेबां कडे पाहून ) तुम्हांस गाणें आवडलें ?

**का**— ( हर्षानें ) फार फार आवडलें. ताईचा गळा म्हणजे रंभेचा च गळा ! बाकी आजच्या साऱ्या समारंभास साजेसें च हिचें हें गाणें झालें बरें. ताई ! तूं येथें आल्या पासून माझ्या मनास किती समाधान वाटूं लागलें आहे ?

**श्री**— खरें च ? कां मत्सर वाटतो ?

**का—** मुळीं च नाहीं ! ती, मला माझ्या पाठच्या धाकट्या बहिणी प्रमाणें वाटते. तिच्याशीं माझें वर्तन कसें असतें, हें आतां पर्यंत समक्ष पाहणें झालें च असेल ? तथापि, शंका असल्यास तिला च विचारणें व्हावें !

**भा—** ( थट्टेनें ) काय ग ताई ? खरें सांग हो ! नाहीं तर वहिनींच्या धाकानें मनांत एक ठेवून वर दुसरें च सांगशील !

**ता—** पण, अशी स्थिती च येथें नाहीं ! अक्कासाहेब खरोखर च मला धाकट्या बहिणी प्रमाणें वागवितात ! ( गंहिवरून ) वास्तविक माझी योग्यता काय ? कोठें तुळशीची मंजरी व कोठें पारिजातकाचें फूल ?

**का—** अग ! पण श्रीविष्णूला दोन्ही प्रिय आहेत ! फार काय, पहिलें दुसऱ्या पेक्षां अधिक प्रिय आहे ! ( ताईसाहेबांना जवळ घेऊन, त्यांच्या डोई वरून व पाठी वरून हात फिरवीत ) ताई ! तूं तुळशीची मंजरी आहेस म्हणून तुला कोणीं सांगितलें ? आणि असलीस तर साध्या तुळशीची नसून बुंदेलखंडी तुळशीची, वैजयंतीची मंजरी आहेस ! भगवान विष्णु, पारिजाताचें फूल काना वर ठेवतात तर वैजयंतीची माळ गळ्यांत धारण करतात ! समोरची ती तसबीर पहा ! ताई ! आपण दोघींनीं हि एकमतानें वागून आपल्या आराध्य-देवतेस सदोदित सुखी ठेवणें हें च आपलें कर्तव्य आहे ! मीं पहिल्या पासून तुझ्याशीं पाठच्या धाकट्या बहिणी प्रमाणें–ताई प्रमाणें–वागत आलें. तूं हि मला सख्या वडिल बहिणी प्रमाणें–आक्का प्रमाणें–मानीत आली आहेस ! मग बहिणीबहिणींत उच्चनीच भाव कां करतेस ताई ? आपल्या या भगिनी-प्रेमा बद्दल महाराजांच्या राजवाड्यांत, आपल्या वाड्यांत आणि साऱ्या नगरांत सर्वत्र वाखाणणी चालत असते, असें माझ्या ऐकण्यांत आलें आहे ! पुढची पिढी कांहीं म्हणो ! वर्तमानकाळ व भविष्यकाळ यांत फार अंतर पडतें ! अजून पर्यंत तुझ्या मनांत माझ्या बद्दल थोडासा धाक, थोडासा दूरीभाव आहे, तो या क्षणा पासून काढून टाक ! या समारंभांत, मी तुझ्या जवळ एवढी मागणी मागत्यें !

**ता—** अक्का ! अक्का ! तुझी मागणी मीं मस्तकीं धारण करत्यें !

असें म्हणून ताईसाहेबांनीं, वहिनीसाहेबांचा उजवा हात आपल्या मस्तका-वर ठेवला व आपलें मस्तक त्यांच्या हृदया वर टेकलें !

**भा—** अहाहा ! अशी बहीण मला लाभली ही सिद्धेश्वराची कृपा !

**श्री**— त्या बहिणीला, भाऊ! तुमच्या सारखा भाऊ लाभला ही सुद्धां त्याची कृपा! तुम्हीं सांगितलें नाहीं तरी तुम्हीं उज्जनीस तिला संकटमुक्त करून **गजेंद्रमोक्ष** घडवून आणल्याचें मला मागें रतन कडून व आतां हिचे कडून समजलें! श्रीसमर्थांचें एक नांव "सज्जन" आहे आणि म्हणून च त्यांच्या समाधीस्थानाचें पूर्व नांव परळीगड बदलून पुढें "सज्जनगड" पडलें! त्या सज्जनपंथांतील तुम्ही! म्हणून च —

सौजन्यामृतसिंधवः परहितप्रारब्धवीरव्रताः । वाचालाः परवर्णने निज-
गुणालापे च मौनव्रताः ॥ आपत्स्वप्यविलुप्तवीर्यनिचयाः संपत्स्वनुत्सेकिनो ।
माभूवन् खलवक्त्रनिर्गतविषज्वालातताः सज्जनाः ॥

असें मी हि म्हणतों! (हंसून) लहानपणीं तुमची बहीण म्हणे फार खोडकर, मत्त होती! बाकी बुंदेलखंडाच्या सीमे वरील यमुना नदी प्रमाणें **मदयंती** हि अशी खट्याळ व मत्त असणार च म्हणा! म्हणून पिताजींनीं असलें नांव ठेवलें असावें!

**भा**— कां राऊ! माझ्या बहिणीची थट्टा करतां काय? कालिंदी खट्याळ असली तरी ती दुष्टांना, सुष्टांना नाहीं. कालीयाला तिनें बुडविलें पण अत्याचारी साम्राज्याच्या बंदिगृहांत जन्मलेल्या त्या स्वातंत्र्याला, गोकुळप्रवेश करून देण्यास दुभंगून तिनें वाट करून दिली च कीं नाहीं? माझ्या ताईचा बाळपणींचा निर्व्याज मत्तपणा तरुणपणीं बुंदेलखंडाचें रक्षण करणाऱ्या–त्या भैरव खिंडींत–शौर्यांत उतरला बरें का? आणि काळ – घाटांतील तिचा शौर्याचा उन्माद तर तुम्हीं च स्वतः पाहिला! मग **मदयंती** नांव सार्थ आहे कां नाहीं? कोसलाधिपति मित्रसह राजाच्या पत्नीचें मदयंती हें च नांव होतें. त्याच्या संकटकालीं तिनें च त्याचें संरक्षण व सेवाशुश्रूषा केली. वायु–स्कंद–पद्मपुराण व रामायणांत ही कथा आली आहे.

**का**— ताईचा आणखी एक सहजगुण उत्कट आहे.

**श्री**— तो कोणता?

**का**— तो इतरांच्या लक्ष्यांत आला कीं नाहीं, मला माहीत नाहीं; पण मला कधीं च ठाऊक झाला आहे. ती अत्यंत सुंदर आहे. तिची त्वचा अत्यंत नितळ आहे—

**श्री**— यांत नवीन तें काय सांगितलें?

**का**— पण मला पुरतें बोलूं देणें होईल तेव्हां ना? ती रतीची प्रत्यक्ष मूर्ती च असल्यानें तिचा कंठ अत्यंत सुंदर आहे. विडा खातांना त्याचा पींक त्या तेजस्वी व नितळ कंठातून खालीं उतरतांना स्पष्ट दिसतो! असल्या देव-दुर्लभ सौंदर्याचा तो सहज गुण उत्कट आहे. म्हणजे जशी ती शौर्यांत तशी सौंदर्यांत व इतर सर्व सात्त्विक गुणांत हि मत्त आहे! **मदयंती** आहे!

**श्री**— खरें आहे! हा उत्कट गुण माझ्या लक्ष्यांत आला नव्हता!

**का**—माझी एक इच्छा आहे. (श्रीमंतां कडे पाहून) ऐकावयाचें होईल?

**श्री**— अवश्य! कोणती इच्छा?

**का**— वधू सासरीं आली म्हणजे तिचें माहेरचें नांव सुटतें, तिला सासरचें दुसरें नांव ठेवावें लागतें. ताईचें माहेरचें नांव **मदयंती**! पण आपल्या कडचें नवें नांव आतां नको कां ठेवावयाला भाऊसाहेब?

**भा**— मग कोणतें ठेवावयाचें वहिनी?

**श्री**— आम्हीं ठेवण्या पेक्षां तिच्या अक्कानें च तें ठेवावें!

**ता**— होय, अक्का! तूं च ठेव माझें या घराण्यांतील नांव!

**का**— माझ्या वर च आली का पाळी! बरें तर. (विचार करून) आतां पर्यंत "नांवा प्रमाणें कीर्ति" अशी म्हण आहे पण आतां मीं "कीर्ती प्रमाणें नांव" अशी नवी म्हण बनविणार! ताईच्या सर्व उत्कट सद्गुणांचें कारण तिच्या **मदयंती** या नांवांतील मत्तपणा आहे, असें (श्रीमंतां कडे पाहून) म्हणणें आहे ना?

**श्री**— होय!

**का**— म्हणून तो तिचा सहजगुण ज्यांत प्रतित होईल असें "**मस्तानी!**" हें नांव, मीं तिचें ठेवत्यें! सर्वांना मान्य आहे?

**श्री**— (आनंदानें) मान्य! पूर्ण मान्य!

**भा**— ताईच्या सासरच्या या नांवांत तिचें माहेरचें हि नांव कायम ठेवून व त्यांत तिची मातृभाषा गोंवण्याची समयज्ञता दाखवून, वहिनी! तुम्हीं तुमचें चातुर्य हि प्रगट केलें!

**श्री**— भाऊ! हें सर्व ठीक झालें! तुम्हां सर्वांत तहनामा पूर्ण होऊन गेला, पण माझें—

**भा**— एकादें कलम उगवून घ्यावयाचें राहिलें आहे काय?

**श्री**— होय !

**भा**— कोणतें तें ?

**श्री**— पण "मंजूर करण्यांत येईल," असें आश्वासन मिळाल्या विगर त्याची परिस्फुटता कशी करावी ?

**भा**— कलम हिसाबी असल्यास मंजूर होईल ! गैर हिसेबी रुजु करण्यांत येणार नाहीं ! असें च ना ग ताई !

**ता** — (हंसून) होय !

**श्री**— मीं सांगणाऱ्या कलमास हिसाबी किंवा गैरहिसेबी ठरविणार कोण ?

**का**— ( श्रीमंतां कडे पाहून ) कां ? पंतप्रधानकीचा दर्प आला वाटतें ? ( भाऊसाहेबां कडे पाहून ) पण, भावोजी ! तो दर्प या वाड्यांत चालत नसतो ! तो, दिल्लीच्या चकत्या जवळ, श्रीरंगपट्टणच्या नायका किंवा यवना जवळ, भागानगरच्या निजामा जवळ, गोंव्याच्या फिरंग्या जवळ अथवा मुंबईच्या त्या लालतोंडया टोपीवाल्या जवळ चालेल ! या वाड्यांतील व त्यांत हि अंतःपुरांतील प्रत्येक कृत्य हिशेबी अगर गैरहिशेबी ठरविण्याचा अधिकार तेथल्या राज्ञीचा असतो, बरें का भावोजी !

**भा**— हें सत्य च आहे, वहिनी ! बरें तर, राऊ ! आतां तुमचें कलम कळवा.

**श्री**— बरें बोवा ! ( चौरंगा वरील तसबिरी कडे पाहून ) भाऊ ! तुमच्या ताईस या तसबिरीचें फार वेड आहे ! या चित्रा वर तिची फार भक्ति आहे ! म्हणून हें पन्नाहून येथें आणलें. चित्राचा कथाप्रसंग हि तिला फार आवडतो म्हणे. त्या कथे वरचें तिचें एक फार आवडतें पद आहे. तें तुम्हीं ऐकलें आहे; पण मीं ऐकलें नाहीं. तरी तें मला एकदां ऐकवावें ! एवढें च आमचें कलम आहे !

**भा—मदयंती ताई** ! कलम अवघड नाहीं ! मंजूर कर !

**का**— खरें च, **मस्तानी ताई** ! मीं ही तुझें तें आवडतें पद तुझ्या तोंडून ऐकलें नाहीं ! मग म्हण च एकदां ! मंजूर कर कलम !

**मस्तानी**— सर्वांच्या इच्छे बाहेर मीं नाहीं.

असें म्हणून मस्तानी ताईसाहेबांनीं पुन्हां तंबोरा हातांत घेऊन तें पद म्हटलें.

**" हे गोविन्द ! राखो शरण, अब तो जीवन हारे ! ॥ ध्रु० ॥ नीर पिवन हेत गयो, सिंधु के किनारे, । सिंधु बीच बसत ग्राह, कर धरी पछारे. ॥ १ ॥ चार प्रहर जुद्ध भयो, ले गयो मंझधारे; । नाक कान डुबन लाग्यो, नाथ को पुकारे ! ॥ २ ॥ द्वारका में शब्द भई; गरुड पर सिहारे । नक्र को मारके, गजराज को उधारे ! ॥ ३ ॥ सूरदास शरण आयो, दास हौं तिहारे ! । अबकी बेर पार करो ! नंद के दुलारे ! ॥ ४ ॥ "**

इतक्यांत जिन्यांत " जय जय रघुवीर समर्थ ! " असा शब्द झाला ! गुरुदेव येत आहेत असें समजून सर्व मंडळी उभी राहिली. श्रीमंतांनीं आपली पूजा उतरून ठेवली व ते गादीवरून उतरून बाकीच्या मंडळींत उभे राहिले !

गुरुदेव व काकाजी दालनांत आले ! रावसाहेब — भाऊसाहेबांनीं त्या दोघांना साष्टांग नमस्कार घातले. स्त्रियांनीं त्यांच्या चरणां वर मस्तकें ठेविलीं. दोघांनीं प्रत्येकाच्या मस्तकीं हात ठेवून त्यांना उठविलें. पुन्हां सर्व उभे राहिले.

**काकाजी**— बाळांनो ! सुखी असा ! **गजेन्द्रमोक्षाचा** सर्व प्रसंग श्रीकृपेनें यशस्वी प्रकारें पार पडला ! " अधुना मधुकर-पतिना गिलितोप्यपकार-दंपती येन । त्रातः स पालये त्वां विकाररहितो विनायकोलक्ष्म्याः ॥ " धु अक्षररहित जो मधुकर–पति म्हणजे मकरपति म्हणजे नक्र, त्यानें पकार-रहित दंपती म्हणजे दंती म्हणजे गजेंद्र यास गिळिलें असतां, त्यास ज्यानें रक्षिलें तो वि अक्षररहित असा लक्ष्मीचा विनायक म्हणजे नायक तुम्हां सर्वांचें संरक्षण करो ! !

**गुरु**— खरें आहे ! **हिंदुस्थानरूपी गजेन्द्राच्या पूर्ण स्वातंत्र्यास, दिल्लीच्या अत्याचारी साम्राज्यशाहीरूपी नक्रानें ग्रासलें असतां, विसाजी भटरूपी सत्यस्वरूपा विष्णूनें, विसाजी जोशीरूपी निष्कलंकशीलाच्या गरुडाच्या साह्यानें, निग्रहानुग्रहाच्या सुदर्शनानें, नक्रास विदारून गजेन्द्राचा मोक्ष केला ! त्या गजेन्द्ररूपी हिंदुस्थानच्या पूर्ण स्वातंत्र्याचें स्वरूप, त्यानें आपल्या सोंडेत धरलेल्या " सत्यं–शिवं-**

**– सुंदरम् ” या तीन कमळां प्रमाणें आहे ! हें च हिंदवी– स्वराज्य ! हें च देवांब्राह्मणांचें राज्य ! हें च महाराष्ट्रधर्मराज्य, आणि हें च श्रीरामराज्य !** बाळांनों ! त्या श्रीरामराया जवळ सर्व हिंदुस्थाना कारणें एक चि मागणें आतां मागूं या !

सर्वांनीं तसबिरी पुढें हात जोडून म्हटलें:–

[ राग— सारंग ]

**“ देवराया कल्याण करी । जनहेत विवरी ॥ ध्रु० ॥ तळमळ तळमळ होत चि आहे । हे जन हातीं धरी ॥ १ ॥ अपराधी जन चुकत चि गेले । तुझा तूं चि सांवरी ॥ २ ॥ कठीण त्या वरी कठीण जालें । आतां न दिसे उरी ॥ ३ ॥ कोठें जावें काय करावें । आरंभिली बोहरी ॥ ४ ॥ दास म्हणे आम्हीं केलें पावलों । दयेसि नाहीं सरी ॥५॥”**

भगवन् श्रीरघुपति ! तूं कसा आहेस ?—

**“ शैवांना शिव वाटतो, गमतसे तो ब्रह्म वेदांतिकां, । बौद्धां बुद्ध गमे, अहूर भगवान् त्या पारसी नैष्ठिकां, ॥ मासीहा यहुद्यांस हि, जिन बने जैनांचियां मंदिरीं, । येशु ख्रिस्तजनां, मुहम्मद नटे तुर्कां सर्वे श्रीहरी ॥ ”**

हे श्रीहरी ! तुझ्या—

**“ यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ ”**

या आज्ञे प्रमाणें आमचें सर्व जीवन तुझ्या श्री चरणीं अर्पण असो ! श्री रामराया ! हें चि दान दे—

**“ सर्वेऽपि सुखिनः संतु । सर्वे संतु निरामयाः । सर्वे भद्राणि पश्यन्तु । मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ ”**

**“ सहनाववतु । सहनौभुनक्तु । सहवीर्यंकरवावहै । तेजस्विनावधीतमस्तुमाविद्विषावहै ॥ ”**

**॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥**

**॥ जय ! जय ! रघुवीर समर्थ ॥**

**श्रीसमर्थचरणार्पणमस्तु !**